ॐ

# लघुरामायण

[ संक्षिप्त वाल्मीकि-रामायण ]

वामन नारायण देशपांडे

स्वाध्याय मण्डल, पारडी [ सुरत ]

प्रकाशक :
वसंत श्रीपाद सातवळेकर, बी. ए.,
स्वाध्याय मंडल, आनंदाश्रम,
किल्ला-पारडी ( जि. सुरत )

रामनवमी : शके १८७७ : सन १९५५

प्रथमावृत्ति

मूल्य तीन रुपये

मुद्रक :
व. श्री. सातवळेकर, बी. ए.,
भारत मुद्रणालय, आनंदाश्रम,
किल्ला-पारडी ( जि. सुरत )

# प्रस्तावना

भारताच्या प्राचीन साहित्यांत ' वाल्मीकि–रामायणा ' चें महत्त्व असनन्य-साधारण आहे. भारतीय संस्कृतीचें परमोज्ज्वल स्वरूप जर कुठें प्रकर्षानें प्रगट झालें असेल, तर तें ' वाल्मीकि-रामायणां ' त प्रगट झालें आहे, असें म्हटल्यास ती खचित अत्युक्ति होणार नाहीं. केवळ काव्यदृष्ट्या पाहिलें, तरी हें आर्ष महा-काव्य अजोडच ठरतें. व्यक्तिदर्शन, रसपरिपोष, कल्पनावैभव, भाषासौंदर्य—वगैरे काव्यगुणांचा इतक्या मोठ्या प्रमाणांत समन्वय झालेला अन्यत्र क्वचित्‌च आढळेल. विशेषतः, ' जीवंतपणा ' व ' ओघ ' हे या आदिकाव्याचे गुण तर स्वतः मला थक्क करणारे वाटले !

अशा या श्रेष्ठतम काव्यकृतीचा गद्यसंक्षेप म्हणजे प्रस्तुत ' लघुरामायण ' ऊर्फ ' संक्षिप्त वाल्मीकि रामायण ' होय. हा संक्षेप तयार करतांना मीं एकच उद्दिष्ट समोर ठेवलें होतें. तें हें कीं, सर्वसामान्य वाचकांस सुमारें दोनशें पृष्ठांत मूळ ग्रंथाचा जास्तींत जास्त प्रमाणांत परिचय करून द्यावा. हें उद्दिष्ट साधण्या-साठीं मुळांतील मुख्य कथाभाग तर कायम ठेवलाच आहे, पण त्याचबरोबर आणवितील तितकीं सौंदर्यस्थळेंहि आणलेलीं आहेत. तसेंच, मुळांतील कित्येक विशेष गोष्टी या संक्षेपांत समाविष्ट केल्या असून त्यांतील किती तरी शब्दप्रयोग वगैरे जसेचे तसे ठेवले आहेत. तात्पर्य, मूळ ग्रंथाची वाचकांस ओळख पटावी, या दिशेनें मीं आटोकाट प्रयत्न केलेला आहे. संगमरवर, संजिरा वा साबण यांवर ताजमहालाची चिमुकली प्रतिमा कोरावी, त्या धर्तीचा हा नम्र प्रयत्न होय, असेंहि म्हणतां येईल. आतां, मीं निवडलेलें ' माध्यम ' अगर ' साधन ' संगमरवर आहे, संजिरा आहे, कीं केवळ साबण आहे आणि मीं कोरलेल्या

*

आकृतीचें मुळाशीं साम्य उतरलें आहे कीं नाहीं, याचा निर्णय रसिकांनींच करावयाचा आहे !

'वाल्मीकि-रामायणा'चा संक्षेप करण्याची कल्पना दीर्घकाळ मनांत घोळत होती. पण कांहीं-ना-कांहीं कारणांमुळें ती सत्वर अमलांत येऊं शकली नाहीं. अखेर, तो योग १९५३ च्या उन्हाळ्याच्या सुट्टींत आला. माझा सर्वांत धाकटा मुलगा चि. सुधाकर यानें मीं तोंडानें सांगितलेला मजकूर लिहून घेण्याचें काम हौशीनें करून माझा तेवढा भार हलका केला, या गोष्टीचा येथें उल्लेख करणें अवश्य वाटते.

हें 'लघुरायण' प्रथम 'पुरुषार्थ' मासिकांत जून १९५४ ते जानेवारी १९५५ या महिन्यांच्या दरम्यान क्रमशः प्रसिद्ध झालें आणि आतां तें स्वतंत्र पुस्तक-रूपानें प्रसिद्ध होत आहे. या उभयविध प्रसिद्धिकरणाबद्दल 'पुरुषार्था'चे संपादक व प्रस्तुत ग्रंथाचे प्रकाशक यांचे आभार मानणें अवश्य आहे.

टिळकवाडी,
यवतमाळ (म. प्र.)
ता. ८-२-१९५५

वा. ना. देशपांडे

# शुद्धिपत्र

[ किरकोळ व सहज लक्ष्यांत येणारे मुद्रणदोष दुरुस्त केले नसून फक्त महत्त्वाचे मुद्रणदोष तेवढेच दुरुस्त केले आहेत. ]

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६ | १० | सिंहासनवार | सिंहासनावर |
| १३ | २४ | यंत्र- | मंत्र- |
| ४४ | १३ | शोकाचा | शोकास |
| ४९ | १४ | सीतेसह | सीता यांसह |
| ५५ | ८ | लक्ष्मणासह | लक्ष्मण यांसह |
| ६५ | १३ | घेऊन | घेऊन तो |
| ६८ | ४ | त्रास्त | त्रस्त |
| ८४ | १२ | याला | त्याला |
| १२४ | १० | कंभ | कुंभ |
| १४० | ८ | विदारण शरीर | शरीर विदारण |
| १६६ | १ | सर्व | तें सर्व |
| १६७ / १६८ | २७ / ५ | मानस | मावस |
| १८४ | २४ | गेल्यानें | गेल्यानें रामास |



# वामन नारायण देशपांडे यांचीं पुस्तकें

१. **आद्य मराठी कवयित्री**- संशोधन ग्रंथ. प्रथमावृत्ति समाप्त. द्वितीयावृत्ति लौकरच प्रसिद्ध होईल.

२. **आराधना**- काव्य-संग्रह. तृतीयावृत्ति. किं. रु. २।.

३. **स्मृति स्थळ**- संशोधन ग्रंथ. किं. रु. २.

४. **विचार समीक्षा**- लेखसंग्रह. किं. रु. २.

५. **अनामिका**- काव्यसंग्रह. किं. २॥.

६. **लघुरामायण**- वाल्मीकि - रामायणाचा गद्यसंक्षेप. किं. रु. ३.

७. **कोरकू**- आदिवासी जीवनावरील अभिनव खंडकाव्य. किं. रु. १.

# अनुक्रमणिका





[ चित्रसंख्या एकूण सोळा ]





श्रीरामपञ्चायतन

THE GITA PRESS. GORAKHPUR.

# बालकांड



## १. नारदांना वाल्मीकींचा प्रश्न

तप व वेदाभ्यास यांत तत्पर आणि तपस्वी व वाग्वेत्ते यांत श्रेष्ठ-अशा नारदमुनींना वाल्मीकि ऋषींनीं प्रश्न केला, " हे मुनिश्रेष्ठा, सांप्रत पृथ्वीवर गुणवान्, पराक्रमी, धर्मज्ञ, कृतज्ञ, सत्यवचनी, क्रोधाला जिंकणारा व युद्धांत कोपला असतां देवांनाहि भीति उत्पन्न करणारा-असा गुणसंपन्न पुरुष कोण आहे, हें कळण्याची मला फार उत्कंठा आहे. असा पुरुष जाणण्यास आपण समर्थ आहांत, तेव्हां त्याची माहिती आपण मला सांगावी." – यावर नारदमुनि म्हणाले, " हे महर्षे, तुम्ही विचारलेले गुण जसे पुष्कळ आहेत, तसेच ते दुर्लभहि आहेत. तथापि, त्या गुणांनीं संपन्न असा एक पुरुष माझ्या लक्ष्यांत येतो, त्याची मी तुम्हांला माहिती सांगतों. हा पुरुष इक्ष्वाकु वंशांत जन्मलेला रामचंद्र हा होय. तो निग्रही, महाबलवान्, जितेंद्रिय व शुभलक्षणांनीं युक्त असा आहे. त्याचप्रमाणें, तो धर्मज्ञ, सत्यवचनी, प्रजाहिताबद्दल दक्ष, वेद-वेदांगांत पारंगत व धनुर्विद्येंत प्रवीण आहे. तो सर्वांशीं सारखें वागणारा असल्यामुळें समुद्राकडे जशा नद्या धांव घेतात, तसे सज्जन लोक त्याच्याकडे जात असतात ! कौसल्येचा आनंद वाढविणारा तो राम सर्वगुणसंपन्न आहे. गांभीर्यांत तो समुद्रासारखा असून वीर्यांत विष्णूसारखा आहे !— त्याचें दर्शन चंद्राप्रमाणें सर्वांना आनंद देणारें असून क्रुद्ध झाला असतां तो प्रलयाग्नीसारखा वाटणारा आहे !— क्षमा करण्यांत तो पृथ्वीच्या तोडीचा आहे !" याप्रमाणें नारदांनीं रामचंद्राचें गुणवर्णन केलें आणि त्याचें संपूर्ण चरित्र साररूपानें वाल्मीकि ऋषींना कथन केलें.

## १. क्रौंचवध

नारदांचें हें भाषण ऐकल्यावर वाल्मीकींनीं त्यांचें पूजन केलें आणि नंतर त्यांचा निरोप घेऊन नारदमुनि आकाशमार्गानें निघून गेले. ते गेल्यावर क्षणभर आश्रमांत बसून महामुनि वाल्मीकि गंगेच्या जवळच असलेल्या तमसा नदीवर भरद्वाज नांवाच्या शिष्यासह गेले. तमसेचें कर्दमरहित उदक अवलोकन करून वाल्मीकि भरद्वाजास म्हणाले, " हे वत्सा, हें निर्मल तीर्थ पहा. तें सज्जनांच्या मनासारखें स्वच्छ असून रमणीय दिसत आहे ! हे भरद्वाजा, कलश खालीं ठेव व मला परिधान करण्यासाठीं वल्कल दे." भरद्वाजानें दिलेलें वल्कल हातांत घेऊन स्नानसंध्या करण्यास योग्य अशी जागा तमसा तीरावर शोधण्यासाठीं वाल्मीकि मुनि विशाल वन पहात पहात चालूं लागले. क्रौंच पक्ष्याचें एक जोडपें विहार करीत असतांना त्यांच्या दृष्टीस पडलें. त्याचवेळीं एका दुष्ट व अकारण वैर करणाऱ्या निषादानें त्या जोडप्यापैकीं नराला बाण मारून खालीं पाडलें ! मस्तकावर तांबुस तुरा असलेला व पंख पसरून आपल्याशीं क्रीडा करणारा आपला सहचर सर्वांग रक्तानें भरलें जाऊन धुळींत लोळत पडलेला पाहिल्यावर त्या क्रौंच पक्ष्याची मादी करुण स्वरानें ओरडूं लागली ! – हें दृश्य पाहून वाल्मीकिऋषींना अपार दया आली व त्यांच्या तोंडून पुढील श्लोक सहजगत्या बाहेर पडला —

मा निषाद ! प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ।
यत्क्रौंचमिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥

"हे निषादा, तूं या भूतलावर फार दिवस राहणार नाहींस !— कारण, तूं काममोहित अशा क्रौंच पक्षाच्या जोडप्यापैकीं एकाचा वध केला आहेस !"— हा श्लोक तोंडाबाहेर पडतांच तपश्चर्येचा नाश करणारी ही शापवाणी आपल्या मुखांतून कशी बाहेर पडली, या विचारानें वाल्मीकींचें चित्त चिंतातुर झालें ! परंतु थोडें चिंतन केल्यानंतर त्या महाबुद्धिमान् मुनिश्रेष्ठाला एक विचार सुचला व ते भरद्वाजाला म्हणाले, " चरण व सम अक्षरें असलेला आणि वीणेवर गातां येण्यासारखा जो श्लोक शोकामुळें माझ्या तोंडांतून बाहेर पडला, तो वाया जाणार नाहीं. तो श्लोक मला कीर्तिप्रदच होईल ! " हें भाषण ऐकून भरद्वाजानें संमति दाखविण्यासाठीं आपली मान डोलविली व तें पाहून वाल्मीकिऋषीहि संतुष्ट झाले.

नंतर तमसा तीर्थांत स्नान करून ते त्याच गोष्टीचें चिंतन करीत आश्रमास परतले.

## ३. रामायणाची रचना

आश्रमास आल्यावर वाल्मीकि मुनि आसनावर बसले आणि ते जरी इतर गोष्टी बोलत होते, तरी त्यांच्या मनांत श्लोकाचाच विचार चालला होता! इतक्यांत त्रिलोक निर्माण करणारे, स्वयंसिद्ध व चतुर्मुख असे ब्रह्मदेव वाल्मीकींना भेटण्या-साठीं तेथें आले. त्यांना पाहतांच वाल्मीकिमुनि एकदम आसनावरून उठले आणि हात जोडून नम्रतेनें व अतिशय विस्मित होऊन उभे राहिले. त्यांनीं पाद्य, अर्घ्य-वगैरे अर्पण करून ब्रह्मदेवांचें पूजन केलें आणि त्यांना कुशल प्रश्न विचारले ब्रह्मदेव आसनावर बसल्यानंतर वाल्मीकींनीं त्यांना तो श्लोक म्हणून दाखविला आणि शापवाणी मुखावाटें बाहेर पडल्याबद्दल ते दुःख दर्शवूं लागले! तेव्हां ब्रह्मदेव हास्य करून वाल्मीकींना म्हणाले, " हे ऋषिश्रेष्ठा, तुझा हा श्लोक तुला कीर्ति प्राप्त होण्यास कारणीभूत होईल. कारण, तुझ्याठायीं सरस्वती आविर्भूत झाली आहे. तूं संपूर्ण रामचरित्राचें वर्णन कर. जोंपर्यंत पर्वत व नद्या भूतलावर राहतील, तोंपर्यंत तुझी रामकथा लोकांमध्यें प्रचारांत राहील!" इतकें म्हणून ब्रह्मदेव अंतर्धान पावले. नंतर आनंदित झालेल्या मुनि--शिष्यांनीं '**मा निषाद**' हा श्लोक पुनः म्हटला व ते अत्यंत आश्चर्यचकित होऊन म्हणाले, " सम अक्षरें व चार चरण यांनीं युक्त अशा वाक्यांत वाल्मीकींनीं क्रौंच पक्ष्याविषयींचें आपलें दुःख प्रकट केलें, यामुळें त्यांच्या हृदयांतील शोक श्लोकत्व पावला आहे!" नंतर अशा प्रकारच्या श्लोकांनीं युक्त असें संपूर्ण रामकथापर काव्य ग्रथित करावें, अशी इच्छा वाल्मीकींच्या मनांत उत्पन्न झाली. त्याप्रमाणें त्यांनीं त्या काव्याची रचना केली.

चोवीस हजार श्लोक, पांचशें सर्ग, सहा कांडें व सातवें उत्तरकांड यांनीं युक्त असें '**पौलस्त्य-वध**' नांवाचें महाकाव्य वाल्मीकींनीं लिहिल्यानंतर सभेमध्यें तें कोण गाऊन दाखवील, असा विचार त्यांच्या मनांत उत्पन्न झाला. शुद्ध अंतःकरणाच्या महर्षींच्या मनांत हा विचार येतांक्षणींच मुनिवेष धारण करणारे कुश व लव हे कुमार धांवत त्यांच्याकडे आले आणि " आम्हीं हें काव्य गाऊन दाखवितों!" असें म्हणून त्यांनीं वाल्मीकींचे चरण धरले. धर्मज्ञ, यशस्वी,



मुनिवेषधारी कुश-लव महाकाव्य गातात.

मधुरस्वरानें युक्त व बुद्धिमान् असे ते आश्रमवासी राजपुत्र कुश-लव असल्याचें ध्यानांत घेऊन वाल्मीकींनीं त्यांना तें ' पौलस्त्य-वध ' किंवा ' रामायण ' नांवाचें काव्य शिकविलें. पठण व गायन होत असतां मधुर लागणारें, द्रुत-मध्य-विलंबित हीं तीन प्रमाणें व सात स्वर यांनीं युक्त असलेलें, तंतुवाद्यांचा मेळ असणारें आणि शृंगार, करुण, वीर-इत्यादि रसांनीं भरलेलें तें काव्य कुश-लवांनीं

एकदां ऋषींच्या सभेमध्यें गाऊन दाखविलें. तें ऐकून सर्व ऋषींच्या डोळयांत अश्रु आले व त्यांनीं "साधु ! साधु !"– अशी कुश व लव यांची प्रशंसा केली. संतुष्ट झालेल्या त्या ऋषींपैकीं कोणी कुशलवांना कलश दिला, तर कोणी वल्कल दिलें ! कोणी कृष्णाजिन दिलें, तर कोणी यज्ञोपवीत दिलें ! ज्यांच्याजवळ देण्यास कांहींच नव्हतें, त्यांनीं "तुम्हांस दीर्घायुष्य प्राप्त होवो !" असे नुसते आशीर्वादच दिले !

कुश व लव यांच्या रामायण-काव्याच्या गायनाची कीर्ति अयोध्येंत सर्वत्र पसरली. ती रामाच्याहि कानांवर गेली. रामानें कुशलवांना आपल्या गृहास पाचारण केलें आणि मुनिकुमार जाणून त्यांची यथाविधि अर्घ्य-पाद्यानें पूजा केली. मग राम सिंहासनवार बसला आणि जवळ बसलेल्या लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न या भ्रात्यांना म्हणाला, " अद्भुत शब्द व अर्थ यांनीं युक्त असलेलें हें आख्यान तुम्ही सर्वजण श्रवण करा. " याप्रमाणें म्हणून रामानें सर्व सभेंत रामायण-काव्य गाऊन दाखविण्याची कुश व लव यांना सूचना केली. त्यांचें गायन सुरू होण्यापूर्वी राम पुनः लक्ष्मणादिकांना म्हणाला, " राज-चिन्हांनीं युक्त असे हे मुनिकुमार काव्य गात आहेत, तें ऐकल्यानें माझाहि अभ्युदय होईल, असें वडील मंडळी सांगत आहे. तेव्हां तुम्ही हें काव्य आदरानें श्रवण करा. " यानंतर कुश-लवांनीं काव्य गायनास आरंभ केला व तें राम लक्ष्यपूर्वक ऐकूं लागला.

## ४. दशरथाचा पुत्रेष्टि-यज्ञ

सरयू नदीच्या कांठीं कोशल नांवाचा एक विस्तीर्ण देश होता. तो धनधान्यानें समृद्ध होता. त्या देशांत मानवांचा अधिपति मनु यानें स्वतः वसाविलेली अयोध्या नामक प्रसिद्ध नगरी होती. ती बारा योजनें लांब व तीन योजनें रुंद होती. तिला दशरथ राजानें पूर्वीपेक्षां अधिक शोभा आणली. अयोध्या नगरीला सर्व बाजूंनीं वेशी व कमानी होत्या. सर्व प्रकारचीं यंत्रें, आयुधें व शतघ्नी यांनीं ती युक्त होती. भव्य राजमार्ग, मोठ्या बाजारपेठा व उंच वाडे यांनीं त्या नगरीला शोभा आली होती. वेदपारंगत ब्राह्मण, उदार क्षत्रिय व श्रेष्ठ ऋषि त्या नगरींत वास्तव्य करीत होते.

अशा त्या अयोध्या नगरीमध्यें इक्ष्वाकु कुळांतील दशरथ राजा राज्य करीत होता. शौर्य व संपत्ति या गुणांत इंद्र व कुबेर यांची क्रमशः बरोबरी करीत असून मनूप्रमाणें तो लोकरक्षण करीत होता. अशा त्या दशरथाच्या राजनगरींत दुष्ट, अविद्वान् व दरिद्री असा एकहि प्रजाजन नव्हता ! दशरथाचे आठ मंत्रि असून ते शुद्धाचरणी व राजकार्यतत्पर असे होते. त्यांतील सुमंत हा एक मंत्रि असून शिवाय तो राजघराण्याचा सारथीहि होता. तसेंच, वसिष्ठ व वामदेव हे दशरथाचे मुख्य ऋत्विज् होते. हे मंत्रि व ऋत्विज् यांच्या साहाय्यानें दशरथ राजा राजधर्म व मोक्षधर्म यांचें यथोचित पालन करीत होता.

दशरथ इतर सर्व बाबतींत भाग्यवान् असूनहि त्याला वंश चालविणारा पुत्र नसल्यामुळें तो दुःखी होता. म्हणून त्यानें पुत्रप्राप्तीसाठीं अश्वमेध यज्ञ करण्याचें ठरविलें. सुमंत अमात्याकडून त्यानें वसिष्ठादि पुरोहित व अन्य द्विजश्रेष्ठ यांना पाचारण केलें. त्यांना तो म्हणाला, " पुत्राशिवाय माझ्या मनाला समाधान नाहीं ! तेव्हां पुत्रप्राप्तीसाठीं अश्वमेध यज्ञ करण्याचा माझा विचार आहे, तरी कोणत्या प्रकारानें माझी पुत्रप्राप्तीची इच्छा सफल होईल, याचा आपण विचार करा. " यावर वसिष्ठ प्रभृतींनीं " उत्तम ! उत्तम ! " असे संमतिदर्शक उद्गार काढले. त्यावेळीं दशरथ संतुष्ट होऊन त्याचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले. सर्वांना निरोप दिल्यानंतर दशरथ आपल्या अंतःपुरांत गेला आणि त्यानें कौसल्या, सुमित्रा व कैकेयी या आपल्या प्रमुख राण्यांना यज्ञाचा विचार सांगून योग्य वेळीं यज्ञदीक्षा घेण्यास तयार राहण्याबद्दल सुचविलें.

अश्वमेध यज्ञासाठीं ऋष्यशृंग ऋषीला आणावें, अशी सुमंतानें दशरथाला विनंति केली. ऋष्यशृंग हा महातपस्वी मुनिश्रेष्ठ होता. तो विभांडक ऋषीचा पुत्र असून अंग देशाचा राजा रोमपाद यानें आपली शांता नामक कन्या त्यास देऊन त्याला स्वतः जवळ ठेवलें होतें. रोमपाद राजा दशरथाचा मित्रच होता. दशरथ त्याच्याकडे गेला आणि त्यानें ऋष्यशृंगाला पत्नीसह यज्ञासाठीं पाठविण्याची विनंती केली. रोमपादानें आनंदानें संमति दिली. मग दशरथ ऋष्यशृंग व शांता यांना घेऊन अयोध्येस आला. ऋष्यशृंगाच्या नेतृत्वाखालीं अश्वमेध यज्ञास सुरवात झाली. वसंत ऋतु पाहून यज्ञाचा शुभलक्षणी अश्व सैन्य बरोबर देऊन

मोकळा सोडण्यांत आला. एका संवत्सरानंतर दुसरा वसंतऋतु प्राप्त झाला असतां प्रत्यक्ष यज्ञविधीस प्रारंभ झाला. यज्ञाची सर्व तयारी आधींच झाली होती. सरयू नदीच्या उत्तर तीरीं यज्ञभूमि सिद्ध केली. तेथें विशाल यज्ञमंडप उभारला. यज्ञासाठीं येणाऱ्या दूरदूरच्या राजांसाठीं राजवाडे आणि अश्वशाला वगैरे इतर गृहें बांधलीं. अन्य जनांसाठींहि वसतिस्थानें उभारलीं. एकंदरीनें यज्ञाला लागणाऱ्या सर्व गोष्टींची व्यवस्था आधींच केलेली होती. ऋष्यशृंगाला ब्रह्मत्व देऊन द्विजश्रेष्ठांनीं अनुष्ठान सुरू केलें. अश्वमेध यज्ञासाठीं नियुक्त केलेला अश्व तीन तरवारींनीं फाडून त्याची वपा यथाशास्त्र शिजविण्यांत आली. पापाचें क्षालन होण्यासाठीं दशरथानें त्या वपेच्या धुराचा वास घेतला. अश्वाच्या हवनीय अंगांचें अग्नींत हवन झालें. अशा प्रकारें अश्वमेध यज्ञ यथासांग झाल्यानंतर दशरथानें सर्व ब्राह्मणांना व याचकांना अपार संपत्ति देऊन संतुष्ट केलें.

यानंतर दशरथ राजा ऋष्यशृंगाला म्हणाला, " हे महर्षे, आतां माझा वंश जेणेंकरून वृद्धिंगत होईल, अशा कर्माच्या अनुष्ठानास आरंभ करावा. " तेव्हां ऋष्यशृंग म्हणाला " हे राजा, तुला पुत्रप्राप्ति होण्यासाठीं मी अथर्ववेदाच्या मंत्रांनीं पुत्रकामेष्टि यज्ञ करवितों. " मग पुत्रकामेष्टि यज्ञाला सुरवात झाली. या यज्ञांत अग्नीमध्यें आहुति देणें सुरू होतांच आपापला भाग ग्रहण करण्यासाठीं देव, गंधर्व-वगैरे यज्ञस्थानीं गोळा झाले. परंतु ते अदृश्यरूपानें तेथें उपस्थित असल्यामुळें कोणास दिसले नाहींत.

देव ब्रह्मदेवास म्हणाले, " हे भगवन्, रावण नामक राक्षस आम्हां सर्वांस अत्यंत त्रास देत आहे !— देव, गंधर्व, यक्ष व राक्षस यांना अवध्य असण्याचा वर आपण त्याला दिल्यामुळें तो अतिशय उन्मत्त झाला आहे ! तेव्हां या राक्षसापासून आम्हांस उत्पन्न झालेलें भय आपण निवारण करावें. " हें ऐकून ब्रह्मदेव म्हणाले, " हे देवांनो, तुमचें म्हणणें योग्य आहे. रावणानें देवादिकांपासून अवध्य असण्याचा वर माझ्यापासून मिळविला आहे ! मनुष्याला तो कःपदार्थ समजत असल्यामुळें या वरांत त्यानें मनुष्याचा मात्र अंतर्भाव केला नाहीं. तेव्हां मनुष्याकडूनच त्याचा वध करण्याचा उपाय योजावयास पाहिजे ! " इतक्यांत गरुडावर आरूढ होऊन विष्णु त्याठिकाणीं आला. त्याची स्तुति करून

देव म्हणाले, " हे विष्णो, दुरात्म्या रावणाचा वध करण्यासाठीं तूं पृथ्वीवर मनुष्यरूपानें अवतार धारण कर. " -- यावर विष्णु म्हणाला, " देवांनो, तुम्ही भिऊं नका. तुमच्या कल्याणासाठीं मनुष्यजन्म घेऊन मी रावणाचा परिवारासह निश्चित वध करतों. " असें म्हणून दशरथ राजा व त्याच्या भार्या यांच्या उदरीं आपले चार अंश करून जन्म घेण्याचें विष्णूनें ठरविलें. तेव्हां सर्व देवांना अतिशय आनंद झाला.

नंतर पुत्रकामेष्टि यज्ञाच्या अग्नींतून एक महापुरुष प्रगट झाला. तो कृष्णवर्ण असून त्याचें मुख व वस्त्रें आरक्त वर्ण होतीं. तो दिव्य भूषणांनीं अलंकृत झालेला होता. त्याच्या हातांत चांदीचें झांकण असलेली सोन्याची स्थाली होती. त्या स्थालींत देवनिर्मित पायस होतें. ती स्थाली दशरथाला देऊन तो महापुरुष म्हणाला, " हे राजा, हें पायस तूं ग्रहण कर आणि आपल्या प्रिय पत्नींना तें सेवन करण्यास दे. म्हणजे, तुला तुझ्या पत्नींच्या ठायीं पुत्र प्राप्त होतील व तुझ्या यज्ञाचा हेतु सफल होईल. " हें ऐकून दशरथानें ती स्थाली नम्रपणें ग्रहण केली आणि त्या महापुरुषाला प्रणाम करून प्रदक्षिणा घातली. मग तो महापुरुष अंतर्धान पावला.

## ५. दशरथपुत्रांचा जन्म

तें देवनिर्मित पायस प्राप्त झाल्यामुळें दशरथास व त्याच्या राण्यांस पराकाष्ठेचा आनंद झाला. दशरथानें संपूर्ण पायसांतील अर्धें पायस कौसल्येला दिलें व तिला दिलेल्या पायसाचा चौथा हिस्सा तिच्याकडून सुमित्रेला देवविला. उरलेलें अर्धें पायस राजानें कैकेयीला दिलें व तिच्या पायसाचा चौथा हिस्सा पुनः सुमित्रेलाच देवविला. पायसाच्या प्राप्तीमुळें या तीनहि राण्या हर्षित झाल्या व त्यांनीं त्याचें सेवन केलें. यथाकालीं या सर्व राण्यांना अग्नि व सूर्य यांच्याप्रमाणें तेजस्वी गर्भ राहिले आणि त्या उचित समयीं प्रसूत झाल्या. चैत्र महिन्यांतील नवमीच्या दिवशीं पुनर्वसु नक्षत्रावर सूर्य, मंगळ, शनि, गुरु व शुक्र हे पांच ग्रह उच्च स्थानीं असतांना आणि त्यांतहि चंद्र व गुरु लग्नीं असतांना दिव्य लक्षणांनीं युक्त असा राम कौसल्येच्या उदरीं जन्मास आला. त्याचे ओंठ व नेत्र आरक्त

वर्ण असून बाहु दीर्घ होते आणि शब्द दुंदुभीप्रमाणें गंभीर होता. कैकेयीनें पुष्य नक्षत्रीं मीन लग्नावर भरताला जन्म दिला. मघा नक्षत्र व उच्चीचा सूर्य असतांना कर्क लग्नावर सुमित्रेला लक्ष्मण व शत्रुघ्न हे दोन पुत्र झाले. पूर्वा भाद्रपदा व उत्तरा भाद्रपदा या प्रत्येकीं दोन दोन तारे असणाऱ्या नक्षत्रांप्रमाणें दशरथाचे हे पुत्र आपल्या कांतीमुळें शोभत होते !

दशरथाचे हे चार पुत्र विष्णूचे चार अंश होते. त्यांपैकीं राम हा विष्णूचा जवळ जवळ अर्धा अंश होता. हे चार पुत्र जन्माला येतांच अंतरिक्षांत देवांच्या दुंदुभि वाजूं लागल्या, गंधर्व गाऊं लागले, अप्सरा नाचूं लागल्या व आकाशांतून पुष्पवृष्टि होऊं लागली. दशरथानें या आनंदानिमित्त विपुल दानधर्म केला. सर्व अयोध्यानगरी हर्षित झाली होती. याचवेळीं रावण–वधार्थ रामाला मदत करण्यासाठीं इतर देवांनीं आपापलें अंश ठेवून वानर निर्माण केले. ब्रह्मदेवापासून ऋक्षश्रेष्ठ जांबवान्, सूर्यापासून वानरश्रेष्ठ सुग्रीव, कुबेरापासून गंधमादन, विश्वकर्म्यांपासून नल, बृहस्पतीपासून तार, अग्नीपासून नील वगैरे जन्मास आले. सर्व वानरांतील बलाढ्य असा हनुमान् वायूपासून जन्मास आला.

दशरथ राजानें आपल्या चारी पुत्रांचा नामकरण–संस्कार वसिष्ठऋषींकडून करविला. या राजकुमारांना समुचित शिक्षण देण्यांत आलें. त्या सर्वांत महातेजस्वी व सत्यपराक्रमी राम निर्मल चंद्राप्रमाणें सर्व लोकांना प्रिय झाला होता. गजारोहण, अश्वारोहण व रथचर्या यांत तो निपुण असून धनुर्वेद व पितृ-शुश्रूषा यांत तो तत्पर होता. लक्ष्मण रामाचा–जणूं काय–बहिश्चर प्राणच होऊन बसला होता !

## ६. विश्वामित्रांचें आगमन

हे चारी पुत्र तारुण्यांत पदार्पण करीत असतां दशरथ राजा, त्याचे पुरोहित व अन्य आप्त यांच्या मनांत त्या पुत्रांच्या विवाहाविषयीं विचार येऊं लागले. दशरथ राजा मंत्रिमंडळाशीं या बाबतींत वाटाघाटी करीत आहे, तोंच महातेजस्वी विश्वामित्र ऋषि तेथें प्राप्त झाले. दशरथानें त्यांचा यथाविधि सत्कार केला व त्यांनींहि तो स्वीकारला. कुशल प्रश्नांनंतर दशरथ म्हणाला, " हे महर्षे, अमृ-

ताची प्राप्ति, जलहीन प्रदेशांत पावसाची वृष्टि, समान भार्येच्याठायीं निपुत्रिकास पुत्रप्राप्ति, गमावलेल्या वस्तूचा पुनर्लाभ किंवा महोदयमूलक हर्ष–यांच्याप्रमाणें आज आपलें हें आगमन झालें आहे !— आपलें स्वागत असो ! आपलें कोण-तेंहि कार्य असो, तें आपण मला सांगा. मी तें पार पाडल्यावांचून राहणार नाहीं ! " हें भाषण ऐकून विश्वामित्र रोमांचित झाले व म्हणाले, " इक्ष्वाकु कुलांत जन्मलेल्या व वसिष्ठ ऋषींचा शिष्य असलेल्या तुलाच हें बोलणें शोभणारें आहे ! मारीच व सुबाहु हे दोन राक्षस माझ्या यज्ञांत विघ्न आणीत असतात. तरी तूं सत्य पराक्रमी व झुलपें ( काकपक्ष ) धारण करणाऱ्या रामाला माझ्या स्वाधीन कर. मी त्याचें रक्षण करीन. तो राक्षसांना मारल्यावांचून खचित राहणार नाहीं ! म्हणून तूं दहा रात्रींपर्यंत त्याला माझ्याबरोबर दे. " हें भाषण ऐकतांच दशरथ दुःखानें मूर्च्छित होऊन पडला ! सावध झाल्यावर तो म्हणाला, " राजीवलोचन रामाचें वय सोळा वर्षांपेक्षांहि कमी आहे ! त्याची विद्या पूर्ण झालेली नसून तो युद्धविशारदहि नाहीं ! शिवाय, रामाची ताटातूट झाली असतां मला क्षणभरसुद्धां जिवंत राहणें शक्य नाहीं. हे कौशिक मुने, आपण रामाऐवजीं मला न्या. मी चतुरंग सैन्य घेऊन आपल्याबरोबर येतों व राक्षसांना ठार मारतों. राक्षस कपटानें लढणारे असल्यामुळें त्यांच्यापुढें राम कसा टिकाव धरणार ? -- रामच काय, मी तरी त्यांच्यापुढें कसा टिकूं शकेन ? " -- दशरथाचें हें भाषण ऐकून विश्वामित्र ऋषि अतिशय संतप्त झाले ! ते रागानें उठून जाऊं लागले असतां वसिष्ठऋषींनीं त्यांना थांबविलें व दशरथाचें मन वळविण्यासाठीं ते त्याला म्हणाले, " हे राजा, आधीं वचन देऊन नंतर नकार देणें हें तुला शोभत नाहीं ! वचनभंगामुळें तुझें यज्ञादिकांमुळें संपादन केलेलें सर्व पुण्य नाहींसें होईल ! खेरीज, विश्वामित्रमहर्षींना अपूर्व अशा अस्त्रांचें ज्ञान असून तीं अस्त्रें देवादि-कांनाहि दुर्लभ आहेत ! स्वतःच्या लाभासाठीं नव्हे, तर तुझ्या पुत्रावर कृपाप्रसाद करावा, म्हणूनच ते तुझ्याजवळ त्याची मागणी करीत आहेत ! " वसिष्ठांच्या या सौम्य भाषणानें दशरथाची समजूत पटली व त्यानें राम--लक्ष्मणांना विश्वामि-त्रांबरोबर जाण्यास संमति दिली. दशरथ, कौसल्या व वसिष्ठ यांनीं त्या दोघांचें मंगल केलें. दोन्ही पुत्रांच्या मस्तकाचें अवघ्राण केल्यानंतर दशरथानें त्यांना

विश्वामित्रांबरोबर रवाना केलें.

## ७. ताटका-वध

विश्वामित्र ऋषि राम-लक्ष्मणांसह आपल्या आश्रमाकडे जात असतांना ते स्वतः पुढें, राम त्यांच्या मागें व लक्ष्मण रामाच्या मागून-अशा क्रमानें ते सर्व चालूं लागले. राम व लक्ष्मण यांनीं धनुष्य व भाते बरोबर घेतले असल्यामुळें ते तीन फणांनीं युक्त अशा नागांप्रमाणें दिसूं लागले! सुमारें दीड योजन गेल्यानंतर सरयू नदीच्या दक्षिण तीरीं विश्वामित्रांनीं रामाला आचमन करावयास सांगितलें आणि 'बला' व 'अतिबला' नांवांचे मंत्रसमुदाय त्याला प्राप्त करून दिले. त्यामुळें श्रम व ज्वर आणि क्षुधा व तृषा यांची बाधा रामास होण्याचें टळलें. त्या रात्रीं ते तिघे सरयूच्या तीरावरच राहिले. पहाटे उठल्यावर स्नान-संध्या आटोपून ते पुढें निघाले. मार्गांत सरयू व भागीरथी यांच्या संगमावर तपश्चर्या करणाऱ्या ऋषींचा पावन आश्रम त्या तिघांनीं अवलोकन केला. या आश्रमांत प्रत्यक्ष शंकर पूर्वीं राहत असून येथेंच मदन-दहन झालें होतें. आश्रमांतील मुनींनीं तिघांचा यथोचित सत्कार केला व त्यांनीं ती रात्र तेथें काढली. सकाळीं विश्वामित्रांनीं राम-लक्ष्मणांसह नावेंतून गंगा नदी ओलांडली. मग गंगेला प्रणाम करून ते पुढें जाऊं लागले. त्यांना वाटेंत एक भयंकर अरण्य लागलें. तें पाहून राम विश्वामित्रांना म्हणाला, "किती निबिड हें अरण्य! —नाना प्रकारचीं भयंकर श्वापदें व घोर शब्द करणारे पक्षी यांनीं तें गजबजून गेलें आहे? —धावडा, साग, अर्जुन, बिल्व-वगैरे वृक्षांनीं तें व्याप्त झालें आहे! —हें वन इतकें भयावह होण्याचें काय कारण असावें बरें?" हें ऐकून विश्वामित्र म्हणाले, "हे रामा, या वनाचा वृत्तांत ऐक : 'ताटका-वन' ज्याला म्हणतात, तें हेंच होय. हा प्रदेश प्रथम धनधान्यांनीं समृद्ध होता. पण सुंदाची भार्या ताटका नामक यक्षीण हिनें या प्रदेशांत वास्तव्य केल्यापासून त्याचें भयंकर अरण्यांत रूपांतर झालें आहे! मारीच राक्षस याच ताटकेचा मुलगा होय. मोठें डोकें व पसरट तोंड असलेला हा मारीच आपल्या मातेसह ऋषि-ब्राह्मणांना अतिशय त्रास देतो! विशेषतः या अत्यंत भयंकर, दुराचरणी व अनर्थकारक पराक्रम

करणाऱ्या यक्षिणीचा गोब्राह्मणांच्या हितासाठीं तूं वध करणें अवश्य आहे ! –स्त्रीवध करावा लागत आहे, म्हणून तूं मागें पुढें पाहूं नकोस ! – सर्व वर्णांचें हित व प्रजेचें रक्षण करण्यासाठीं जें कृत्य करणें अवश्य असेल, तें राजपुत्रानें केलेंच पाहिजे ! मग तें कृत्य पापपूर्ण असो कीं, सदोष असो !– पूर्वी विष्णूनें भृगुपत्नीचा वध केलेला असून विरोचन-कन्या मंथरा हिला इंद्रानें मारलें होतें ! –तेव्हां अधर्मनिष्ठ स्त्रियांचा वध करण्यांत कोणतेंहि पाप नाहीं ! ”– विश्वामित्रांचें हें भाषण ऐकून रामानें हात जोडून “ आपल्या आज्ञेचें तात्काळ पालन करतों ! ”– असे उद्गार काढले.

नंतर रामानें आपल्या धनुष्याच्या प्रत्यंचेचा प्रचंड टणत्कार केला ! तो ऐकून ताटका राक्षसी खवळली व हात वर करून रामावर धांवून आली. मायेचें अवलंबन करून तिनें धुळीचा मेघ निर्माण केला आणि राम व लक्ष्मण यांना क्षणभर भांबावून सोडलें ! नंतर ती पाषाणवृष्टि करूं लागली. शब्दवेध जाणणाऱ्या रामानें तिच्यावर अचूक बाण सोडून तिला जखडून टाकलें आणि एक तीव्र बाण वक्षःस्थलावर मारून तिला ठार केलें !– ताटकेच्या वधानें संतुष्ट झालेल्या विश्वामित्र ऋषींनीं रामाच्या मस्तकाचें अवघ्राण केलें. ती रात्र तिघांनीं शापमुक्त झालेल्या ताटका–वनांत घालविली.

## ८. रामास अस्त्रप्राप्ति

यानंतर विश्वामित्र रामाला मधुर स्वरांत म्हणाले, “ हे यशस्वी राजपुत्रा, मी तुझ्यावर अत्यंत प्रसन्न होऊन तुला सर्व अस्त्रें देत आहें. त्यामुळें तूं देव-दैत्यादिकांनाहि संग्रामांत जिंकूं शकशील ! तेव्हां पाहिजे तें रूप घेणाऱ्या, महाबलवान् व परम उदार अशा या अस्त्रांचा तूं स्वीकार कर. ” –असें म्हणून विश्वामित्रांनीं पूर्वेकडे तोंड केलें व रामाला अस्त्रांचे मंत्र सांगितले. त्या योगानें देवांनाहि दुर्लभ अशीं अस्त्रें रामाला प्राप्त झालीं ! तीं अस्त्रें रामापुढें प्रत्यक्ष प्रकट होऊन म्हणालीं, “ हे राजकुमारा, आम्ही तुझे दास आहोंत. तूं मनांत आणशील, ती गोष्ट आम्ही सिद्धीस नेऊं. ” रामानें हस्तस्पर्श करून सर्व अस्त्रांचा स्वीकार केला व त्यांना यंत्ररूपानें आपल्या अंतःकरणांत वास्तव्य करण्याची आज्ञा केली. एवढें झाल्यानंतर

मार्गक्रमण करीत असतां राम विश्वामित्रांना म्हणाला, " हे भगवन्, आपण दिलेल्या अस्त्रांनीं मी देवादिकांस अजिंक्य झालों आहें ! आतां या अस्त्रांचा संहार आपण मला सांगावा." हें ऐकून विश्वामित्रांनीं रामाला संहार-मंत्र सांगितलें व ते सर्व संहार साक्षात् रामापुढें प्रगट झाले. ते हात जोडून रामाला म्हणाले, " आम्ही तुझे दास आहोंत. काय आज्ञा आहे, ती सांग." राम म्हणाला, " तुम्ही माझ्या मनांत वास्तव्य करून मी सांगेन तेव्हां येत जा. "

अस्त्रप्राप्ति झाल्यावर विश्वामित्र राम-लक्ष्मणांसह ' सिद्धाश्रम ' नांवाच्या आपल्या आश्रमाकडे जाऊं लागले. मार्गांत त्यांना घोर अरण्य लागलें. तें ओलांडून गेल्यावर ते सिद्धाश्रमापाशीं आले व त्यांत शिरूं लागले. त्यावेळीं पुनर्वसूच्या दोन तार्‍यांनीं युक्त असा निरभ्र चंद्रमा ज्याप्रमाणें शोभावा त्याप्रमाणें, विश्वामित्र मुनि राम व लक्ष्मण यांच्यासमवेत शोभूं लागले ! विश्वामित्रांना पाहतांच सिद्धाश्रमवासी तपस्वी गडबडीनें उठले व त्यांनीं त्रिवर्गाचें यथाविधि पूजन केलें. रामाच्या सांगण्या-वरून विश्वामित्रांनीं तात्काळ यज्ञदीक्षा घेतली. राम व लक्ष्मण यांनीं पांच दिवस-पर्यंत त्या तपोवनाचें रक्षण केलें. सहाव्या दिवशीं यज्ञानुष्ठान यथाविधि चालूं असतां एकाएकीं मारीच, सुबाहु व त्यांचे अनुयायी राक्षस तेथें प्रकट झाले आणि त्यांनीं यज्ञवेदीवर रुधिर-वृष्टि केली ! रामानें अत्यंत उज्ज्वल अशा मानवास्त्राचें अभिमंत्रण करून मारीचाच्या वक्षःस्थलावर बाण मारला. त्यासरशीं तो मोह पावून मूर्च्छित झाला व शंभर योजनें दूर समुद्रांत जाऊन पडला !— रामानें आग्नेया-स्त्रानें सुबाहूस ठार केलें व इतर राक्षसांचाहि फडशा उडविला !— अशारीतीनें तो सर्व प्रदेश पीडारहित झाल्यामुळें विश्वामित्रांचें यज्ञकार्य निर्विघ्नपणें सिद्धीस गेलें व ते रामावर अतिशय प्रसन्न झाले !

## ९. विश्वामित्रांचें आत्मकथन

यानंतर विश्वामित्रांनीं सिद्धाश्रम सोडून गंगेच्या उत्तर तीरावर हिमालयाकडे प्रयाण करण्याचें ठरविलें. त्यापूर्वी मिथिलेचा राजा जनक हा एक यज्ञ करणार होता, तो पाहण्यासाठीं विश्वामित्र राम, लक्ष्मण व तेथील ऋषिगण यांच्यासह निघाले. पुष्कळ चालून गेल्यानंतर त्यांना शोण नदीच्या तीरीं सायंकाळ झाली. म्हणून त्यांनीं त्या

रात्रीं तेथेंच मुक्काम केला. निद्राधीन होण्यापूर्वी राम विश्वामित्रांना म्हणाला, "हे भगवन्, हा प्रदेश कोणता आहे, हें आपण मला सांगा." विश्वामित्र म्हणाले, "हे रामा, या प्रदेशाचा माझ्याशींच संबंध आहे. तेव्हां मी सांगतों ती हकीकत ऐक: ब्रह्मदेवाचा पुत्र कुश याला वैदर्भीच्या ठिकाणीं चार तेजस्वी पुत्र झाले. दुसरा पुत्र कुशनाभ यानें महोदयनगरी बसवून तो तेथें राज्य करूं लागला. कुशनाभाला घृताची अप्सरेपासून शंभर मुली झाल्या. या मुलींवर वायु मोहित झाला असतां त्यांनीं त्याला झिडकारल्यामुळें वायूच्या प्रभावानें त्या अष्टावक्र झाल्या! कुशनाभानें मुलींना या दुर्दशेचें कारण विचारलें असतां त्यांनीं त्याला घडलेली हकीकत सांगितली. पुढें या शंभर मुली कुशनाभानें ब्रह्मदत्त नांवाच्या तेजस्वी ऋषीला दिल्या. ब्रह्मदत्तानें विवाहांत एकेका मुलीचें क्रमानें पाणिग्रहण करतांच त्याच्या स्पर्शानें त्यांचा कुब्जेपणा नष्ट होऊन त्या पुनः सुंदर दिसूं लागल्या!— इतकें झाल्यावर मुलगा नसल्यामुळें कुशनाभानें पुत्रकामेष्टि यज्ञ केला. यज्ञाच्या पुण्यामुळें कुशनाभाला गाधि नांवाचा श्रेष्ठ पुत्र झाला. हे रामा, तो गाधि राजाच माझा पिता होय. कुश राजाच्या वंशांत जन्मल्यामुळें मला 'कौशिक' असेंहि म्हणतात. हा कौशिक राजांचा प्रदेश होय!– याप्रमाणें माझा व या प्रदेशाचा इतिहास तुला मीं कथन केला आहे." हें सांगतां सांगतां मध्यरात्र होऊन गेली. म्हणून विश्वामित्र रामाला म्हणाले, "हे वत्सा, झाडांचीं पानें हलत नाहींत. पशु व पक्षी निद्रेंत मग्न झाले असून सर्व दिशा अंधारानें व्याप्त झाल्या आहेत. नक्षत्रें व तारा यांनीं आकाश खचलेलें आहे. त्यांना पाहून तारकारूपी नेत्रांनीं आकाश आच्छादित झालें आहे कीं काय, असें वाटत आहे! शीतल प्रकाश देणारा चंद्र चित्तास आल्हाद देत उदय पावत आहे. यक्ष, राक्षस व निशाचर प्राणी इतस्ततः संचार करीत आहेत. तरी आतां झोंपीं जा."– याप्रमाणें विश्वामित्र म्हणाले असतां त्यांच्यासह राम-लक्ष्मण निद्राधीन झाले.

## १०. गंगावतरणाची कथा

पहाटे जागृति आल्यानंतर संध्यावंदनादि नित्यकर्मे आटोपून त्या सर्वांनीं तेथून प्रयाण केलें. वाटेंत त्यांना हंस व सारस यांनीं गजबजलेली पवित्र गंगा नदी

लागली. तिच्या कांठीं स्नान-संध्या व होम करून सर्वांनीं हवि भक्षण केला. मग राम विश्वामित्रांना म्हणाला, " हे भगवन्, गंगा नदी तिन्ही लोक व्यापून समुद्राकडे कशी गेली, ही हकीकत आपण आम्हांस सांगा. " विश्वामित्र म्हणाले, " हे रामा, गंगा नदीशीं तुझ्या पूर्वजांचा निकट संबंध असल्यामुळें गंगेचा वृत्तांत तूं लक्ष्य देऊन श्रवण कर : हिमाचल पर्वतास मेरूची मुलगी मेना हिच्यापासून गंगा व उमा अशा दोन मुली झाल्या. देवकार्यासाठीं हिमाचलास विचारून देव गंगेला स्वर्गलोकीं घेऊन गेले. इकडे अयोध्येला सगर नांवाचा राजा राज्य करीत होता. भृगुऋषींच्या प्रसादानें सगराच्या केशिनि राणीला असमंज नांवाचा एकच मुलगा झाला व सुमति नांवाच्या दुसऱ्या राणीला साठ हजार मुलगे झाले. व्रात्यपणामुळें असमंजाला सगरानें अयोध्येबाहेर घालवून दिलें ! नंतर सगरानें अश्वमेध यज्ञ केला. सगराचा नातू व असमंजाचा मुलगा अंशुमान् हा यज्ञीय अश्वाच्या मागोमाग निघाला. तो अश्व इंद्रानें पळविला. त्याच्या शोधासाठीं सगराचे साठ हजार मुलगे पृथ्वीभर हिंडले. अश्वाचा कोठेंच पत्ता न लागल्यानें त्यांनीं पृथ्वीवरील जंबुद्वीप खणून काढलें ! -- तरीहि अश्व कोठें दिसेना ! पुढें सगरपुत्र हिंडत असतां त्यांना ईशान्य दिशेला सनातन वासुदेव कपिलरूप धारण केलेला दृष्टीस पडला. त्याच्या जवळच सगरपुत्रांचा नाश होण्यासाठीं इंद्रानें अश्व बांधून ठेवला होता ! कपिलास चोर समजून सगरपुत्र त्याच्यावर धांवून गेले ! -- परंतु रागावलेल्या कपिलाच्या एका हुंकारानेंच ते सर्व जळून भस्मसात् झाले ! पुत्रांचा कांहींच पत्ता नाहीं, असें पाहून सगरानें अंशुमानास त्यांचा शोध करण्यास पाठविलें. गरुडाकडून आपल्या चुलत्यांच्या नाशाची हकीकत ऐकून अंशुमान् दुःखी झाला व अयोध्येस परतला. कालांतरानें सगर मृत्यु पावून अंशुमान् राजा झाला. त्याचा नातू भगीरथ यानें आपले पूर्वज जे सगरपुत्र, त्यांना सद्गति मिळण्यासाठीं पृथ्वीवर गंगा आणण्याचा निश्चय केला. भगीरथानें उग्र तप केल्यामुळें ब्रह्मदेवानें त्याला गंगेस पृथ्वीवर पाठविण्याचें कबूल केलें. गंगेचा वेग कोणासहि सहन होणार नाहीं, हें जाणून ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून गंगा प्रथम शंकराच्या मस्तकावर पडली. तेथून ती भगीरथाचा रथ जिकडे जाईल, तिकडे जाऊं लागली ! सगर-पुत्रांच्या रक्षेला जाऊन मिळण्यासाठीं पाताळलोकाप्रत गमन करण्यापूर्वी गंगा सगरपुत्रांनीं

पृथ्वीवर खणलेल्या खड्ड्यास जाऊन मिळाली. सगर पुत्रांचा हा खड्डा म्हणजेच पृथ्वीवरील समुद्र होय. " – हा अद्भुत कथाभाग विश्वामित्र सांगत असतां सबंध रात्र उलटून गेली ! मग प्रभातकाळीं सर्व आन्हिक आटोपून विश्वामित्र हे राम–लक्ष्मण व ऋषिगण यांच्यासह नावेंतून गंगेपार झाले. पुढें मार्गक्रमण करीत असतां त्यांना विशाला नगरी लागली. तेथील राजा सुमति विश्वामित्रांना भेटण्यास आला आणि त्यानें सर्वांचा यथोचित सत्कार केला. यानंतर ते सर्वजण मिथिला नगरीकडे निघाले.

## ११. अहल्योद्धार

मिथिलेजवळच्या उपवनांत त्यांना एक पुरातन व निर्जन आश्रम लागला. तो पाहून रामानें विश्वामित्रांना विचारलें, " हे प्रभो, हा निर्जन आश्रम कोणाचा आहे ? " —विश्वामित्र म्हणाले, ! " हा आश्रम गौतम ऋषींचा होता. गौतमांनीं येथें आपल्या अहल्या नामक भार्येसह अनेक संवत्सरपर्यंत कठोर तप केलें. एकदां गौतम ऋषि आश्रमांत नसतांना त्यांचा वेष घेतलेला इंद्र तेथें आला व त्यानें अहल्येशीं समागम केला ! अहल्येनें वेषधारी इंद्राला ओळखूनहि इंद्राविषयींच्या कुतूहलानें त्या पापकर्मास संमति दिली ! इतक्यांत गौतम ऋषि नदीवरून स्नान करून दर्भ व समिधा घेऊन आश्रमास परत आले. त्यांच्या लक्ष्यांत सर्व प्रकार येतांच त्यांनीं इंद्र व अहल्या यांना शाप दिला ! गौतमाच्या शापानें कोणत्याहि प्राण्याच्या दृष्टीस न पडतां वायु भक्षण करीत अहल्या येथें राखेंत पडून राहिली आहे !—हे रामा, गौतमांनीं दिलेल्या उःशापाप्रमाणें तुझ्या दर्शनानें अहल्या आतां शापमुक्त व्हावयाची आहे ! तरी तूं या आश्रमांत चल. "— हें ऐकून विश्वामित्रांना पुढें करून राम लक्ष्मणासह त्या आश्रमांत गेला. रामाचें दर्शन होतांच शापमुक्त होऊन अहल्या पुनः सर्वांच्या दृष्टीस पडूं लागली ! राम–लक्ष्मणांनीं अहल्येला नमस्कार केला आणि तिनेंहि त्यांचें अभिवंदन करून अर्घ्य--पाद्यपूर्वक आतिथ्य केलें. येथेंच त्यांना गौतम ऋषीहि भेटले. नंतर सर्व जण मिथिलेस गेले.

## १२. विश्वामित्रांचा पूर्वेतिहास

मिथिला नगरीला पोंचतांच ते सारे यज्ञमंडपामध्यें गेले. जनक राजानें मोठ्या प्रमाणावर केलेली यज्ञाची तयारी पाहून विश्वामित्रादिकांना आनंद वाटला. यज्ञभूमी-

वरील उदकयुक्त व प्रशांत स्थळीं विश्वामित्रांनीं सर्वांसह वास्तव्य केलें. विश्वामित्रांच्या आगमनाची वार्ता समजतांच अनिंदित जनक राजा आपला पुरोहित गौतमपुत्र शतानंद याला व ऋत्विजांना पुढें करून त्यांना सामोरा गेला. जनकानें विश्वामित्रांची पूजा केली व त्यांनींहि ती स्वीकारली. परस्परांनीं परस्परांना कुशल प्रश्न विचारले. विश्वामित्रांबरोबर असलेल्या राम-लक्ष्मणांना अवलोकन करून जनकानें " आकाशाला शोभा आणणाऱ्या चंद्र-सूर्यांप्रमाणें या प्रदेशाला शोभा आणणारे हे वीर पुत्र कोण ? " अशी विश्वामित्रांना पृच्छा केली. तेव्हां त्यांनीं जनकाला त्या राजपुत्रांची सर्व हकीकत सांगितली. नंतर शतानंदानें सर्वांच्या समक्ष रामाला विश्वामित्रांचा महिमा पुढीलप्रमाणें वर्णन केला : " हे दशरथपुत्रा, गाधि-पुत्र विश्वामित्र हे मूळचे क्षत्रिय असून राजे होते. ते एकदां आपल्या प्रचंड सैन्यासह पृथ्वीपर्यटण करीत असतां वसिष्ठ ऋषींच्या आश्रमास आले. वसिष्ठांनीं आपल्या शबला नांवाच्या कामधेनूच्या प्रभावानें विश्वामित्र व त्यांचें प्रचंड सैन्य यांचा थाटानें आदरसत्कार केला ! -हा चमत्कार पाहून विश्वामित्रांना वसिष्ठांची कामधेनु प्राप्त करून घेण्याची अनावर इच्छा झाली ! ते वसिष्ठांना कामधेनु मागूं लागले. परंतु त्या गोष्टीस वसिष्ठ कांहीं केल्या कबूल होईनात ! अखेर प्रकरण हातघाईवर आलें ! विश्वामित्र शबलेला क्षात्रबलानें घेऊन जाऊं लागले ! तेव्हां शबलेनें आपल्या शरीरांतून मोठें सैन्य निर्माण करून विश्वामित्रांचा पराभव केला ! या अपमानानें वैतागून विश्वामित्रांनीं राज्यत्याग केला व ते तपश्चर्या करण्यास निघून गेले ! तपःप्रभावानें विश्वामित्रांनीं शंकरापासून अगणित दिव्य अस्त्रें संपादन केलीं. या अस्त्रांच्या बळावर सूड घेण्यासाठीं म्हणून विश्वामित्र वसिष्ठावर चालून गेले ! -परंतु वसिष्ठांच्या एका ब्रह्मदंडापुढें विश्वामित्रांचीं सर्व अस्त्रें फोल ठरलीं ! तेव्हां ' ब्रह्मबलापुढें क्षत्रियबल व्यर्थ आहे ! ' हें सत्य पटून विश्वामित्रांनीं पुनः दीर्घकाल अत्यंत उग्र तप केलें आणि शेवटीं ब्राह्मण्याची प्राप्ति करून घेतली !- अशा प्रकारच्या श्रेष्ठ महर्षींचा प्रसाद, हे रामा, तुझ्यावर झाला आहे, हें तुझें थोर भाग्य होय ! " शतानंदाच्या तोंडून हा सर्व वृत्तांत ऐकून जनक राजा व राम-लक्ष्मण यांना अतिशय धन्यता वाटली. नंतर जनक राजा तेथून स्वगृहीं परत गेला.

❀

## १३. धनुर्भंग

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जनकानें विश्वामित्रांना राम-लक्ष्मणांसह बोलावून घेतलें व तो त्या मुनिश्रेष्ठांना म्हणाला, "हे भगवन्, मी आपलें कोणतें कार्य करावें, याची आज्ञा व्हावी!" तेव्हां विश्वामित्र म्हणाले, "हे दशरथपुत्र विख्यात क्षत्रिय आहेत. यांना तुझ्याजवळील शिवधनुष्य पाहण्याची इच्छा आहे. तरी तूं तें त्यांना दाखव." जनक म्हणाला, "अवश्य दाखवितों. प्रथम आपण त्याची पूर्व-कथा ऐकावी : पूर्वी दक्ष-यज्ञाच्या वेळीं क्रुद्ध झालेल्या शंकरानें हें धनुष्य हातांत घेऊन व वांकवून तेथें जमलेल्या देवांची दाणादाण उडविली! शंकर सर्व देवांचीं मस्तकेंच उडवून देणार होता! परंतु त्यांनीं परोपरीनें प्रार्थना केल्यावरून शंकरानें तो बेत सोडून दिला आणि त्यानें तें धनुष्य देवांना देऊन टाकलें! देवांनीं माझा पूर्वज निमि राजाचा ज्येष्ठ पुत्र देवरात याच्याजवळ तें धनुष्य 'ठेव' म्हणून ठेवलें. तेंच आमच्या कुळांत पूज्य बुद्धीनें जतन करून ठेवलें आहे! मला भूमि नांगरतांना एक कन्या सांपडली. तिचें नांव सीता असें असून तिचा मीं स्वतःच्या मुलीप्रमाणें सांभाळ केला आहें. सीता वीर्यशुल्का असल्यामुळें जो राजा शिवधनुष्य वांकवील, त्यालाच ती देण्याचा मीं निश्चय केला आहें!- असें हें अद्भुत शिवधनुष्य तुम्हांस मी आतां दाखवितों."- या प्रमाणें सांगून जनकानें तें दिव्य धनुष्य तेथें आणण्याची आपल्या अमात्यांना आज्ञा केली. आठ चाकी पेटींत ठेवलेलें तें प्रचंड धनुष्य पांच हजार धिप्पाड पुरुषांनीं पेटीसह ओढत आणलें! -तें पाहून विश्वामित्र रामाला म्हणाले, "हे वत्सा, हें अपूर्व शिवधनुष्य अवलोकन कर." - रामानें पेटी उघडून धनुष्य पाहिलें आणि जनकास विचारून त्याच्या संमतीनें तें बाहेर काढलें. त्यानें पाहतां पाहतां तें धनुष्य उचलून त्यावर प्रत्यंचा चढविली! रामानें आकर्ण धनुष्य ओढतांच प्रचंड आवाज होऊन तें मधोमध कडकन् मोडलें! त्याबरोबर जनक राजा हात जोडून विश्वामित्रांना म्हणाला, "हे भगवन्, माझी वीर्यशुल्का कन्या सीता दशरथ-पुत्र रामास मी आनंदानें देण्यास तयार आहें! तरी दशरथ राजास येथें ताबडतोब येऊं द्यावें." हा विचार ऐकून विश्वामित्रांना अतिशय आनंद झाला. लगेच जनकाचा निरोप घेऊन दूत अयोध्येस गेले. त्यांनीं दशरथास झालेली सर्व हकीकत सांगितली. जनक राजाशीं आपला सोयर-संबंध होणार

असल्याचा दशरथासहि परम हर्ष झाला आणि तो आपल्या परिवारासह मिथिलेस सत्वर येऊन दाखल झाला.

## १४. रामादिकांचे विवाह

यानंतर जनकानें सांकाश्या नगरीला राहत असलेला आपला भ्राता कुशध्वज याला दूतांकडून बोलावून आणलें. कुशध्वज आल्यावर जनक व तो सिंहासनावर आरूढ झाले. जनकानें मिथिलेस येऊन पोंचलेल्या दशरथाला सभेंत घेऊन येण्यास मंत्र्याला सांगितलें. त्याप्रमाणें मंत्र्यानें जाऊन दशरथाला सन्मानानें सभेंत आणलें. आदरसत्कार झाल्यानंतर तेव्हांच्या रीतीप्रमाणें दशरथाचे पुरोहित वसिष्ठ ऋषि यांनीं त्याची वंशपरंपरा सर्वांना कथन केली. ती सांगून झाल्यानंतर जनक राजानें स्वतःच आपल्या कुलाची परंपरा निवेदन केली. मग जनक म्हणाला, " हे दशरथ राजा, हा माझा भ्राता कुशध्वज होय. पूर्वी एकदां सांकाश्या नगरीचा राजा सुधन्वा मिथिलेवर चालून आला. त्यानें नगरीस वेढा दिला आणि तो शिवधनुष्य व सीता यांची स्वतःसाठीं मागणी करूं लागला ! मीं युद्धांत सुधन्व्याचा पराभव करून त्याला ठार मारलें आणि सांकाश्या नगरीचें आधिपत्य माझा हा भ्राता कुशध्वज याला दिलें. सीतेशिवाय मला ऊर्मिला नांवाची आणखी एक कन्या आहे. ती याचवेळीं लक्ष्मणास देण्याचा माझा संकल्प आहे. " जनकाची ही सूचना दशरथा-सुद्धां सर्वांना फार पसंत पडली. खुद्द विश्वामित्र ऋषींनीं अशी सूचना केली कीं, " जनक राजाच्या सीता व ऊर्मिला या कन्या ज्याप्रमाणें राम व लक्ष्मण यांना देण्यांत येणार आहेत, त्याप्रमाणेंच कुशध्वज राजाच्या मांडवी व श्रुतकीर्ति नांवाच्या दोन कन्या भरत व शत्रुघ्न यांना द्याव्या. " हाहि विचार सर्वांना फार पसंत पडला. त्याप्रमाणें चारी दशरथपुत्रांचा विवाहविधि निश्चित झाला.

नंतर दशरथानें आपल्या बिन्हाडीं यथाविधि नांदीश्राद्ध करून दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं आपल्या चारी पुत्रांचा गोदान-संस्कार केला. त्याच दिवशीं केकय देशाच्या अश्वपति राजाचा पुत्र व भरताचा मामा युधाजित् मिथिला नगरीस आला. भरताला आजोळीं घेऊन जाण्याच्या उद्देशानें तो प्रथम अयोध्येस गेला होता. परंतु दशरथ व सर्व राजपुत्र मिथिलेस विवाहासाठीं गेल्याचें कळल्यावर युधाजित्

अयोध्येहून मिथिलेस आला. त्याच्या आकस्मिक आगमनामुळें दशरथादिकांस अतिशय आनंद झाला. नंतर विवाहविधीस प्रारंभ झाला. यज्ञमंडपांत सर्व मंडळी गोळा झाली. विश्वामित्र, वसिष्ठ व शतानंद यांनीं वेदि तयार केली. ती गंध व फुलें यांनीं भूषित केली. सोन्याच्या मुठी असलेल्या सुऱ्या, धान्याचें अंकुर उगवलेले कुंभ, धूपपात्रें, लाह्यांनीं भरलेलीं पात्रें, दर्भ--वगैरे साहित्य वेदीवर मंत्र म्हणून ठेवलें. वसिष्ठांनीं अग्नि सिद्ध करून त्यांत हवन केलें. अलंकारांनीं सजविलेली सीता रामापुढें अग्नीसमक्ष उभी करून जनक म्हणाला, " हे रामा, ही माझी कन्या सीता तुझी भार्या आहे. हिचें तूं पाणिग्रहण कर. ही सावलीप्रमाणें सर्वदां तुझ्यामागें येईल. " -- असें म्हणून जनकानें कन्यादानाचें उदक सोडलें. रामानें सीतेचें पाणि-ग्रहण केलें. तेव्हां देव व ऋषि यांनीं " साधु ! साधु ! " असें उद्गार काढले. -- याचप्रमाणें लक्ष्मणानें ऊर्मिलेचें, भरतानें मांडवीचें व शत्रुघ्नानें श्रुतकीर्तीचें पाणि-ग्रहण केलें. सर्व विवाहविधि आटोपल्यावर जिकडेतिकडे आनंदीआनंद झाला !

## १५. परशुरामाचा पराभव

दुसऱ्या दिवशीं महामुनि विश्वामित्र हे जनक व दशरथ यांचा निरोप घेऊन उत्तर पर्वताकडे निघून गेले. दशरथानेंहि अयोध्येस परत जाण्याची जनकाला अनुज्ञा मागितली. जनकानें चारी कन्यांना उत्तमोत्तम वस्त्रें, अलंकार आणि गज, अश्व, धेनु व रथ दिले. अयोध्याधिपति दशरथ राजा सर्व परिवारासह आपल्या नगरीस जात असतां भयंकर उत्पात होऊं लागले. पक्षी घोर शब्द करूं लागले आणि पशु सव्य घालून जाऊं लागले ! पृथ्वी कंपित करणारा व मोठमोठे वृक्ष उलथून पाडणारा सोसाट्याचा वारा वाहूं लागला ! सूर्य अंधारानें झांकला गेला ! दिशांची ओळख नाहींशी झाली ! आणि, दशरथाचें सैन्य धुळीनें आच्छादित होऊन -जणूं काय- मूर्च्छित झाल्यासारखें झालें ! — इतक्यांत क्षात्रियांचा हाड-वैरी व दिसण्यांत अतिशय क्रूर असा जटाधारी जमदग्नि-पुत्र परशुराम दशरथ-राजाच्या दृष्टीस पडला ! तो प्रलयाग्नीसारखा दुःसह होता. त्याच्या खांद्यावर लखलखणारा परशु असून विद्युत्समूहाप्रमाणें अत्यंत तेजस्वी असें धनुष्य त्याच्या हातांत होतें. परशुरामाला अवलोकन करतांच वसिष्ठप्रभृति ऋषींनीं त्याचें पूजन

केलें व त्यानेंहि तें स्वीकारलें.

नंतर परशुराम दाशरथी रामाला म्हणाला, " हे रामा, तुझ्या शौर्याबद्दल मीं पुष्कळ ऐकलें आहे ! -- तूं शिव-धनुष्याचा भंग केल्याचेंहि माझ्या कानांवर आलें आहे ! परंतु आतां मीं एक दुसरें चांगलें धनुष्य घेऊन आलों आहें. तूं मोडलेलें शिवधनुष्य व मीं आणलेलें हें वैष्णव धनुष्य विश्वकर्म्यानें निर्माण केलें होतें. शिव-धनुष्य जनकाच्या कुळांत राहिलें आणि वैष्णव धनुष्य विष्णूनें भृगूचा पुत्र व माझा पितामह ऋचीक यास दिल्यामुळें माझ्या कुळांत राहिलें.– या वैष्णव धनुष्याला बाण लावून तूं आपल्यांत कांहीं सामर्थ्य असल्यास तें मला सिद्ध करून दाखव ! म्हणजे मी तुझ्याशीं युद्ध करीन ! " परशुरामाचें हें भयंकर भाषण ऐकून दशरथ भयभीत झाला व दीन वचन बोलूं लागला ! परंतु दशरथाकडे दुर्लक्ष्य करून परशुराम रामाशींच बोलूं लागला ! मग राम परशुरामास म्हणाला, " हे ब्रह्मन्, या बोलण्यानें तूं क्षात्रधर्मांत प्रवीण अशा माझा पराक्रमहीन दुबळाप्रमाणें अपमान कां करतोस ? — तूं आज माझा पराक्रम व तेज पहा ! " असें म्हणून रामानें परशुरामाचें धनुष्य व बाण हातांत घेतला आणि पाहतां पाहतां धनुष्याला प्रत्यंचा चढवून बाणहि लावला ! नंतर तो परशुरामास म्हणाला, " तूं ब्राह्मण असल्या-मुळें मला पूज्य आहेस ! -- म्हणून तुझ्यावर मी हा प्राणघातक बाण सोडूं इच्छित नाहीं ! परंतु हे भार्गवरामा, तुझी भ्रमणाची गति किंवा आपल्या तपानें तूं मिळ-विलेले दिव्य लोक नष्ट करावे, असें मात्र मला वाटत आहे ! -- कारण, हा वैष्णव बाण वायां जाऊं शकत नाहीं ! " दाशरथी राम असें बोलत आहे, तोंच भार्गवरा-मांतील तेज नष्ट झालें व तो केवळ जडवत् झाला ! परशुराम सौम्य स्वरांत दाश-रथी रामाला म्हणाला, " हे रामा, क्षत्रियांचा नाश करून मीं जेव्हां ही पृथ्वी कश्यपाला दिली, तेव्हां मी पृथ्वीवर राहिल्यास उरलेल्या क्षत्रियांना झोंप येणार नाहीं, म्हणून कश्यपानें ' तूं माझ्या राज्यांत राहूं नकोस ! ' -- असें मला सांगि-तलें ! -- गुरूची आज्ञा पाळण्यासाठीं मी रात्रीं पृथ्वीवर राहत नाहीं ! म्हणून माझी भ्रमण करण्याची गति तूं नष्ट करूं नकोस ! -- हे राघवा, मी मनोवेगानें महेंद्र पर्वतावर जाईन ! वाटल्यास, मीं तपानें संपादिलेले दिव्य लोक या बाणानें तूं

खुशाल नाहींसे कर ! " – यावर दाशरथी रामानें तो अमोघ बाण सोडला. त्या बाणामुळें आपण प्राप्त केलेले दिव्य लोक नष्ट झालेले पाहून परशुराम महेंद्र पर्वताकडे जाण्यास निघाला. जाण्यापूर्वी रामानें त्याचें पूजन केलें व तोहि रामास प्रदक्षिणा घालून चालता झाला !

रामाचा हा पराक्रम पाहून दशरथाला परम हर्ष झाला व त्यानें रामाला प्रेमानें आलिंगन देऊन त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें. रामाचा व स्वतःचाहि पुनर्जन्म झाला, असेंच दशरथास वाटलें ! नंतर दशरथ राजा परिवारासहित मार्गक्रमण करीत करीत अयोध्येस जाऊन पोंचला. विवाहित राजपुत्रांच्या स्वागतासाठीं अयोध्या नगरी उत्कृष्ट रीतीनें शृंगारली होती. कौसल्या व इतर राजभार्या यांनीं राजस्नुषांचें सहर्ष स्वागत केलें. यानंतर राम, लक्ष्मण वगैरे दशरथ पुत्र आपापल्या भार्यांच्या सहवासांत आनंदानें काळ घालवूं लागले. ते आपल्या पित्याच्या सेवेंत तितकेच तत्पर असून त्याची आज्ञा पालन करण्यांत दक्ष होते. कैकेयीपुत्र भरत याला आजोळीं नेण्यासाठीं त्याचा मातुल युधाजित् पूर्वींच आला होता. त्याच्याबरोबर दशरथानें भरत व शत्रुघ्न यांची केकय देशास भरताच्या मातुलगृहीं रवानगी केली.

– बालकांड संपूर्ण –

# अयोध्या कांड



## १. यौवराज्याचा विचार

भरत शत्रुघ्नासह आजोळीं असतां मातुल अश्वपति त्या दोघांना पुत्राप्रमाणें वागवीत होता, तरी त्यांना वृद्ध पिता दशरथ याचें स्मरण होत असे. त्याच-प्रमाणें, दशरथालाहि त्यांची एक सारखी आठवण होई. स्वतःच्या देहापासून निघालेल्या चार हातांप्रमाणें दशरथाला चारी पुत्र एकसारखे आवडत होते. त्यांतहि राम त्याला जास्तच प्रिय होता. कारण, ब्रह्मदेवासारखा तो विशेष गुणसंपन्न होता. तो रूपवान्, वीर्यवान् व मत्सरहीन होता. वेदविद्या व अस्त्रविद्या यांत तो बापाहून प्रवीण होता. संस्कृत–प्राकृत साहित्याचें त्याला ज्ञान होतें. संगीतादि कला त्याला अवगत होत्या. प्रजेचें त्याच्यावर प्रेम असून ती त्याला आपला बाहिश्चर प्राणच समजत असे !

अशा त्या रामाला यौवराज्याचा अभिषेक करण्याची वृद्ध दशरथास इच्छा झाली. त्यानें आपल्या मंत्र्यांचा विचार घेतला. त्यांनाहि ही कल्पना फार पसंत पडली. मग दशरथानें देशोदेशींच्या राजांना पाचारण केलें. भरताचा मामा युधाजित् व रामाचा श्वशुर जनक राजा यांना मात्र निमंत्रण गेलें नाहीं ! राजे लोकांच्या सभेंत दशरथानें आपला विचार सर्वांस कथन केला. तो म्हणाला, "दीर्घकाल राज्य करून इक्ष्वाकु वंशाच्या शुभ्रवर्ण छत्राखालीं माझें शरीर जीर्ण झालें आहे ! आतां या शरीरास विश्रांति देण्याची इच्छा आहे. म्हणून सर्वांत वडील व गुणवान् पुत्र राम याला मी यौवराज्याचा अभिषेक करण्याचें ठरविलें आहे. तरी आपणां सर्वांची या कल्पनेस संमति असावी." हें भाषण

*

ऐकून सारी सभा आनंदित झाली. सर्वांनीं दशरथाचा विचार मान्य केला. हें पाहून दशरथास अतिशय हर्ष झाला.

मग दशरथानें वसिष्ठ, वामदेव-प्रभृतींना अभिषेकाची तयारी करण्यास सांगितलें. तेव्हां वसिष्ठ मंत्र्यांना म्हणाले, "सर्व प्रकारच्या वनस्पति, लाह्या, श्वेत पुष्पें, वाघाचें अखंड कातडें, रथ, आयुधें, सैन्य-वगैरे सज्ज ठेवा. अंतःपुर व नगर यांच्या दारांची गंध व फुलें यांनीं पूजा करा. ब्राह्मणांना उत्कृष्ट भोजन देऊन दक्षिणा द्या. उद्यां त्यांचें स्वस्तिवाचन होईल." याप्रमाणें सांगितलें असतां मंत्र्यांनीं सर्व तयारी केली. मग दशरथानें सुमंत्राकरवीं रामाला सभेंत बोलावलें. रामानें दशरथाच्या चरणांस वंदन केल्यावर दशरथानें त्याला आलिंगन देऊन उत्कृष्ट आसनावर बसविलें. दशरथ म्हणाला, "हे पुत्रा, उद्यां पुष्य नक्षत्रावर मी तुला यौवराज्याभिषेक करण्याचें ठरविलें आहे. तूं सर्वांशीं नेहमीं विनयानें व संयमानें वर्तन करीत जा. शस्त्रागार व खजिना भरलेला असूं दे. प्रजेला संतुष्ट ठेव." ही वार्ता रामाच्या सुहृदांनीं कौसल्येस निवेदन केली असतां तिलाहि अपार हर्ष झाला.

सभेंतील पौरजन गेल्यावर दशरथानें पुनः मंत्र्यांशीं वाटाघाटी केल्या. मग रामाला पुनः पाचारण करून दशरथ त्याला म्हणाला, "मला अशुभ स्वप्न पडलें असून उल्कापात होत आहेत!–ज्योतिषी सांगतात कीं, आज माझ्या नक्षत्राला सूर्य, मंगळ व राहू हे क्रूर ग्रह आले आहेत!–हा योग विपत्ति व मृत्यु यांचा सूचक आहे! तेव्हां भरत परत आला नाहीं, तोंच, व माझ्या चित्ताला मोह पडला नाहीं, तोंच, अभिषेक करून घे! आज सीतेसह व्रतशील रहा व तुझ्या सुहृदांकडून तुझें नीट रक्षण होऊं दे!" पित्याची ही आज्ञा ऐकून राम कौसल्येकडे गेला. ती रेशमी वस्त्र नेसून रामाच्या कल्याणासाठीं जनार्दनाचें ध्यान करीत होती. मातेशीं बोलून राम स्वगृहीं गेला.

त्या रात्रीं रामानें सीतेसह नारायणाची पूजा केली. प्रदीप्त अग्नींत हवि समर्पण करून उरलेला हवि त्यानें प्राशन केला. उभयतांनीं रात्रीं मंदिरांत दर्भावर शयन केलें. प्रहर रात्र उरल्यावर रामानें उठून स्नान-संध्या केली आणि मधुसूदनाचें

स्तवन केल्यावर ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करविलें. त्या दिवशीं सकाळपासून सर्व अयोध्या नगरी राज्याभिषेकाच्या तयारीनें व आनंदानें गजबजून गेली होती!

## २. मंथरेचा थयथयाट !

कैकेयीची वृद्ध व कुबडी दासी मंथरा हिनें अभिषेकाच्या आदल्या दिवशीं गच्चीवरून अयोध्येंतील धांदल पाहून जवळच श्वेत वस्त्र नेसून उभ्या असलेल्या रामाच्या दाईला "ही कशाची गडबड आहे ?" म्हणून विचारलें. दाईकडून रामाच्या यौवराज्याभिषेकाची हकीकत कळतांच ती दुष्ट दासी बिथरून गेली! ती लगेच निजलेल्या कैकेयीकडे गेली व तिला जागें करून म्हणाली, "हे मूढे, निजतेस काय ?– रामाला यौवराज्याचा अभिषेक होणार असून तुझा नाश होण्याची वेळ ठेपली आहे !" हें ऐकून कैकयीनें मंथरेला एक शुभ्र आभरण बक्षीस दिलें व ती म्हणाली, "हे मंथरे, ही तर आनंदाची वार्ता आहे ! यांत माझा नाश कशाचा ?" तेव्हां मंथरा म्हणाली, "हे मूढे, सवतीच्या पुत्राला राज्य प्राप्त होण्याबद्दल तुला आनंद तरी कसा होतो ? राम राजा झाल्यावर तूं कौसल्येची दासी होणार असून भरत रामाचा दास होणार आहे, हें तुला कसें कळत नाहीं ?" कैकेयी म्हणाली, "हे कुबड्ये, तुझा असा जळफळाट कां होत आहे? मला भरतासारखाच राम प्रिय आहे ! तो कौसल्येहूनहि माझी अधिक शुश्रूषा करतो ! राम भरताला स्वतःप्रमाणें समजत असल्यानें रामाला राज्य मिळणें म्हणजे भरतालाच तें मिळणें होय !" यावर मंथरा म्हणाली, "राम राजा झाल्यावर त्याच्यानंतर त्याचा पुत्र राजा होईल व अशा रीतीनें राज्य रामाच्या वंशांत जाईल ! भरत व त्याचा वंश राज्यप्राप्तीला कायमचा मुकणार आहे ! भरत व त्याचा भावी वंश यांचा हा नाश तुला कसा कळत नाहीं ? भरताला मुद्दाम मातुलगृहीं पाठवून वृद्ध व शठ दशरथ राजानें हा डाव साधला आहे ! तेव्हां ऊठ, आणि भरतास राज्य मिळेल व शत्रु राम राज्याबाहेर जाईल, असा कांहीं मार्ग काढ !" हें ऐकून कैकेयीचें मुख क्रोधानें लाल झालें! ती मंथरेस म्हणाली, "मी आजच रामाला वनांत पाठवितें व भरताला यौवराज्याभिषेक करवितें ! पण मंथरे, हें कोणत्या उपायानें साध्य होईल, याचा विचार कर !" मंथरा म्हणाली, "हे कैकेयी, ऐक. पूर्वी दंडकारण्यांत वैजयंति नगरींत तिमि-



ध्वज असुर रहात होता. त्याचें इंद्राशीं युद्ध झालें असतां दशरथ तुला घेऊन इंद्राला मदत करण्यास गेला. युद्धांत दशरथ जखमी झाला असतां तूं त्याला युद्धभूमीपासून दूर नेऊन वांचविलें. तेव्हां त्यानें तुला दोन वर देऊं केलें. ते मी पुढें कधींतरी मागून घेईन, असें तूं दशरथाला म्हणाली होतीस. तुझ्याकडून तर मला ही हकीकत समजली! आतां ते दोन वर मागण्याची वेळ प्राप्त झाली आहे! एका वरानें तूं रामाला चौदा वर्षें वनांत पाठव व दुसऱ्या वरानें भरतास

क्रोधागारांत दशरथ कैकेयीची समजूत घालतो!

राज्य मागून घे ! दशरथ आज तुझ्याकडे आला असतां तूं क्रोधागारांत पडून रहा आणि तो तुला समजावूं लागेल, तेव्हां हे दोन वर मागून घे ! " मंथरेची ही युक्ति ऐकून कैकेयी थक्क झाली ! ती म्हणाली, " हे कुबडे, तुझी बुद्धि विलक्षण आहे ! तूंच माझी हितकारिणी आहेस ! राजानें मला दोन्ही वर दिल्यास मी तुझें हें कुबड सुवर्णहारानें भूषित करीन ! " याप्रमाणें बोलून कैकेयीनें अंगावरील सर्व अलंकार फेंकून दिले व ती जमिनीवर पडली !

## ३. दोन वरांची मागणी

रामाला अभिषेक करण्याचें ठरलें, पण कैकेयीस ही प्रिय वार्ता आपण निवेदन केली नाहीं, तेव्हां ती सत्वर तिला सांगावी म्हणून दशरथ तिच्या महालांत आला. पण कैकेयी समोर कोठेंच दिसेना, तेव्हां त्यानें दासीला ती कोठें आहे, असें विचारलें. दासीनें ती क्रोधागारांत गेल्याचें सांगतांच राजा तिकडे गेला. भूमीवर पडलेल्या कैकेयीच्या अंगावरून हात फिरवून तो म्हणाला, " हे कल्याणि, तुझा कोणी अपमान केला आहे काय ? कीं, तुला कांहीं व्याधि आहे ? तुला कांहीं मागावयाचें असेल, तर तें अवश्य माग. " यावर कैकेयी म्हणाली, " हे राजा, माझी कोणी हेटाळणी केली नाहीं व मला कांहीं व्याधीहि नाहीं ! परंतु माझी एक इच्छा आहे, ती पुरी करण्याचें वचन द्याल, तर ती मी सांगतें. " तेव्हां तिचें मस्तक मांडीवर घेऊन किंचित् हंसून दशरथ म्हणाला, " रामाशिवाय तुझ्याहून मला कोणीच प्रिय नाहीं, हें तूं जाणतेस. त्या रामाची शपथ घेऊन मी सांगतों कीं, तूं जें मागशील, तें तुला द्यावयास मी तयार आहें ! " हें ऐकून कैकेयी म्हणाली, " हे राजा, देवदैत्यांच्या संग्रामांत आपण घायाळ झालां होतां, तेव्हां मीं आपणांस वांचविलें होतें. यामुळें आपण संतुष्ट होऊन दोन वर मला देण्याचें कबूल केलें होतें. ते मीं आपणांजवळ आतांपर्यंत राहूं दिले. ते आतां मला द्या ! एका वरानें रामानें चौदा वर्षें वनवासास जावें व दुसऱ्या वरानें भरतास यौवराज्याभिषेक व्हावा ! " हें भयंकर भाषण ऐकतांच दशरथ मूर्च्छित होऊन पडला ! सावध झाल्यावर तो म्हणाला, " हे दुष्टे, रामानें तुझें काय बरें वाईट केलें आहे ? त्याचा त्याग करून मी क्षणभरहि जिवंत राहणार नाहीं ! राम व भरत आपल्याला सारखेच आहेत, असें तूं नेहमीं म्हणत होतीस, तें सर्व असत्यच होतें काय ? मी तुला हात जोडतों, तुझ्या पायांवर

मस्तक ठेवतों, पण ही भलती गोष्ट करण्यास तूं मला सांगूं नकोस ! " कैकेयी संतापून म्हणाली, " वर देऊन प्रतिज्ञाभंग करणाऱ्या तुझी धार्मिकपणाबद्दल लोक प्रशंसा कसे करतील ? तेव्हां तूं आपल्या शब्दाला जाग ! रामाला राज्याभिषेक झाल्यास मी तुझ्यापुढें निश्चित प्राण देईन ! " दशरथ म्हणाला, " हे दुष्टे, मी सुहृदांसह निश्चित केलेला अभिषेकाचा विचार, शत्रूंनीं पराभव केलेल्या सैन्यासारखा, परत कसा घेऊं ? देशोदेशींचे राजे मला काय म्हणतील ? रामाला तरी मी काय सांगूं ? सुखांत राहिलेला माझा लाडका राम वनवासाचीं दुःखें कशीं सहन करील ? " असें रडत म्हणून राजा कैकेयीच्या खरोखरच पायां पडला ! परंतु तिचा हट्ट बदलला नाहीं !!

यावेळीं रात्र होऊन आकाश चंद्रमंडळानें भूषित झालें होतें. त्याकडे पाहून दशरथ विलाप करूं लागला, " हे नक्षत्रभूषित रात्री, तूं पहांट होऊं देऊं नकोस ! मजवर एवढी दया कर ! पण नको; हे रात्री, तूं लौकरच जा ! जिच्यामुळें मी हें दुःख सोसत आहें, त्या कैकेयीचें फार वेळ तोंड पहाण्याची माझी इच्छा नाहीं ! " असें म्हणून दशरथ पुनः कैकेयीची मनधरणी करूं लागला. " हे देवी, हा दशरथ दीन होऊन तुझ्या तावडींत सांपडला आहे व त्याचें आयुष्यहि थोडें उरलें आहे ! तेव्हां प्रसन्न हो आणि तूंच रामाला राज्य दे !" एवढें म्हणून दशरथ पुनः मूर्च्छित होऊन पडला ! अशा स्थितींत रात्र संपून दिवस उजाडला. अयोध्या नगरींत त्या दिवशीं होणाऱ्या रामाच्या राज्याभिषेकाची सर्व तयारी झाली होती. सकाळ होऊन बराच वेळ झाला, तरी दशरथाची भेट नसल्यामुळें सुमंत कैकेयीच्या महालास आला. त्याला तेथील कांहींच प्रकार ठाऊक नव्हता. त्याला पाहून कैकेयी दुष्टपणानें म्हणाली, " आनंदामुळें महाराजांना रात्रभर झोंप आली नाहीं ! तेव्हां रामाला इकडे घेऊन ये ! " हें ऐकून सुमंत रामाच्या गृहाला गेला व त्याला रथांत बसवून कैकेयीच्या महालांत घेऊन आला. दशरथास दुःख करतांना पाहून रामास आश्चर्य वाटलें ! तेव्हां कैकेयी निर्लज्जपणानें म्हणाली, " हे रामा, चिंता करण्यासारखें तसें कांहीं नाहीं ! लज्जेमुळें महाराजांना जें तुला सांगवत नाहीं, तें मी सांगतें. त्यांनीं मला दिलेल्या दोन वरांप्रमाणें त्यांच्या आज्ञेनें तूं वनास जावयाचें आहे व

भरतास राज्याभिषेक व्हावयाचा आहे! तरी पित्याची आज्ञा पाळावयाची असल्यास तूं एकदम वनास निघून जा!" यावर राम हात जोडून म्हणाला, "हे माते, महाराजांची आज्ञा पालन करण्यास मी तयार आहें! पण त्यांनीं स्वतःच मला ती सांगण्यास कोणती हरकत होती? आणि, ते असे दुःखी कां? मी आतांच दंडकारण्यास रवाना होतों!" असें म्हणून दशरथ व कैकेयी यांस प्रदक्षिणा घालून व वंदन करून राम कौसल्येच्या महालाकडे गेला.

कौसल्या रामाला अभिषेक होणार असल्याच्या आनंदांत होती. तिला रामानें वनगमनाची वार्ता सांगतांच कुऱ्हाडीनें तोडलेल्या सालवृक्षाप्रमाणें ती मूर्च्छित होऊन पडली! सावध झाल्यावर ती दुःखानें म्हणाली, "हे राघवा, वंध्येला केवळ वंध्या असल्याचें दुःख असतें! पण माझ्या पोटीं तूं येऊनहि मला हें दुःख पाहावें लागत आहे! तूं जवळ असूनहि सवतीकडून मला अपमान सोसावा लागत असे! भर्त्याची तर माझ्यावर कधींच मर्जी नव्हती। तेव्हां तूं दूर गेल्यावर मला हा जाच कसा सहन होईल? तुझ्यावांचून मी दिवस कसे कंठावे?" कौसल्येचा हा शोक ऐकून तेथें असलेला लक्ष्मण संतप्त झाला आणि प्रत्यक्ष पित्यास दोष देऊं लागला! तेव्हां रामानें कौसल्या व लक्ष्मण या उभयतांचें सांत्वन केलें. राम कौसल्येस म्हणाला, "हे माते, जगांत धर्मापेक्षां श्रेष्ठ कांहीं नाहीं व पित्याची आज्ञा पाळणें हा माझा धर्म आहे! तेव्हां तूं मला वनास जाण्याची अनुज्ञा दे." त्याचा हा निश्चय पाहून कौसल्येनें अतिशय दुःखानें त्यास जाण्याची परवानगी दिली. तिनें ब्राह्मणांकडून पुण्याहवाचन करविलें व 'विशल्यकरणी' नांवाची वनस्पति रामाच्या रक्षणासाठीं त्याच्या हातांत बांधली. त्याला कवटाळून व त्याचें मस्तक हुंगून कौसल्येनें रामास कष्टानें निरोप दिला. तेथून राम सीतेच्या महालास गेला. तिला पाहून आतांपर्यंत दाबलेलें दुःख रामास आवरलें नाहीं आणि त्याचें तोंड निस्तेज होऊन घामानें डबडबून गेलें! सीता घाबरून म्हणाली, "हे प्रभो, आजच्या आनंदाच्या प्रसंगीं असें खिन्न होण्याचें कारण काय?" रामानें तिला झालेला सर्व प्रकार सांगितला व तो म्हणाला, "हे सीते, मी नसतांना भरतापुढें तूं माझ्या गुणांची स्तुति कधीं करूं नकोस! त्याच्या मर्जीप्रमाणें वागून तुला येथें खास राहतां येईल!

वृद्ध पिता दशरथ, माता कौसल्या व इतरहि माता यांची नित्य सेवा करीत जा !" हें ऐकून सीता रागावून म्हणाली, " हे वीरा, मला क्षुद्र समजून आपण हें काय बोलत आहांत ? स्त्री ही पतीच्या भाग्यावरच अवलंबून असते ! तेव्हां आपल्याबरोबर मीहि वनास येणार ! " तिचें सांत्वन करीत रामानें वनांतील जीवन किती कष्टप्रद असतें, हें, तिला सविस्तर समजावून सांगितलें. राम आपल्याला वनांत नेण्यास तयार होत नाहीं, असें पाहून सीतेनें अखेरचा उपाय म्हणून त्याची निंदा करण्यास सुरवात केली. " हे रामा, माझा पिता जनक राजा याला पुरुष दिसणारा, पण वस्तुतः स्त्री असलेला जामात मिळाल्यानें काय बरें वाटलें असेल ? कशाच्या भीतीनें आपण मला नेण्याचें नाकारत आहांत ? आपण मला बरोबर न नेल्यास मी तत्काळ प्राणत्याग करीन ! " इतकें म्हणून सीता रामाला कवटाळून मोठ्यानें आक्रोश करूं लागली. तिला हृदयाशीं धरून राम म्हणाला, " हे देवी, मी अरण्यांत तुझें रक्षण करण्यास असमर्थ असल्यामुळें तुला नेत नाहीं, असें समजूं नकोस ! तुझा इतका आग्रहच आहे, तर तूं माझ्या बरोबर चल ! " हें ऐकून सीतेला आनंद झाला. हा संवाद ऐकत तेथेंच असलेला लक्ष्मण शोकाकुल झाला व रामाचे पाय घट्ट धरून म्हणाला, " हे रामा, तुम्हां दोघांचें रक्षण करण्यासाठीं मीहि वनास येणार ! " लक्ष्मणाचा आग्रह पाहून अखेरीस त्यालाहि रामानें बरोबर नेण्याचें ठरविलें.

## ४. रामाचें वनगमन

मग सीतेनें आपले बहुमोल अलंकार व वस्त्रें ब्राह्मणांना आणि दास-दासींना वाटून दिलीं. आपापलीं दिव्य आयुधें घेऊन राम व लक्ष्मण सीतेसह दशरथाचा निरोप घेण्यासाठीं कैकेयीच्या महालाकडे गेले. ते तिघे आल्याचें सुमंत्राकडून दशरथास कळतांच त्यानें अंतःपुरांतील सर्व स्त्रियांना तेथें बोलाविलें. मग त्या सर्वांच्या समोर दशरथ कष्टानें म्हणाला, " हे पुत्रा, तूं वनास जावें, ही गोष्ट मला कबूल नाहीं, हें मी शपथपूर्वक सांगतों ! या दुराचारिणी कैकेयीनें मला फसवून माझ्यापासून वचन घेतलें आहे ! निदान आजची रात्र तरी तूं जाऊं नकोस ! " राम म्हणाला, " हे तात, आतां क्षणभरहि मी येथें राहूं शकत नाहीं ! आपण शोक आवरा व मला आज्ञा द्या. आपणाकडे खोटेपणा न

येण्यासाठीं मी राज्यच काय, पण सर्व पृथ्वी व प्रत्यक्ष सीता यांचा देखील त्याग करण्यास तयार आहें ! " रामाचा हा निर्धार पाहून दशरथ पुनः मूर्च्छित होऊन पडला ! सावध झाल्यावर दशरथानें रामाला सैन्य व द्रव्यभांडार बरोबर घेण्यास सांगितलें. तेव्हां कैकेयी संतापून म्हणाली, " सेना व द्रव्य नसलेलें शून्यवत् राज्य भरत कदापि स्वीकारणार नाहीं ! " रामहि म्हणाला, " उत्तम हत्ती देऊन टाकल्यावर त्याला बांधावयाच्या दोरीवर मन ठेवून काय लाभ ? हें सर्व भरतालाच द्या व मला वल्कलें आणून द्यावयास दासींना सांगा ! " निर्लज्ज कैकेयीनें रामास स्वतःच वल्कलें आणून दिलीं ! राम व लक्ष्मण यांनीं आपलीं उंचीं वस्त्रें टाकून देऊन वल्कलें परिधान केलीं. पैठणी नेसलेली सीता कैकेयीनें दिलेलीं वल्कलें पाहून जाळें पाहिलेल्या हरिणीसारखी भयभीत झाली ! लज्जित व खिन्न होऊन तिनें तीं वल्कलें कैकेयीपासून घेतलीं आणि डोळे भरून येऊन रामाकडे पहात ती म्हणाली, " वनांतील मुनि वल्कलें कसे नेसतात, कुणास ठाऊक ! " एवढें म्हणून एक वल्कल गळ्यांत अडकवून व दुसरें हातांत घेऊन सीता खालीं मान घालून उभी राहिली ! रामानें सत्वर तिच्याजवळ जाऊन तें वल्कल तिच्या पैठणीवरच कसें तरी गुंडाळलें ! हें दृश्य पाहून तेथील सर्व स्त्रिया रडूं लागल्या ! नंतर राम, लक्ष्मण व सीता यांनीं राजाच्या पायांवर मस्तक ठेवून त्यास प्रदक्षिणा केली. कौसल्येसुद्धां सर्व मातांना त्यांनीं वंदन केलें. मग सुमंत्रानें आणलेल्या रथावर लक्ष्मण व सीता यांसह राम आरूढ झाला आणि रथ वनाकडे निघाला. यावेळीं अंतःपुरांत एकच आकांत उडाला ! रस्त्यानें जाणाऱ्या रामाच्या रथामागें हजारों लोक आक्रोश करीत धांवूं लागले ! " रामा, थांब ! ", " सुमंत्रा, रथ थांबव ! " अशा प्रकारच्या हांकांनीं आकाश दुमदुमून गेलें !

## ५. वनांतील पहिली रात्र

अयोध्यावासी लोक रामानें वारंवार निवारण केलें असतांहि रथामागोमाग तमसा नदीपर्यंत गेले. तेथें संध्याकाळ झाल्यामुळें रामानें मुक्काम केला. सुमंत्रानें घोड्यास वैरण घातली व तो त्यांच्याजवळ बसला. राम, लक्ष्मण—वगैरेंची सायंसंध्या झाल्यानंतर रामानें केवळ उदक सेवन करून पर्णशय्येवर निद्रा केली.

अयोध्येचे पौरजनहि तेथेंच निद्रेच्या आधीन झाले. प्रहरभर रात्र उरली असतां रामानें सुमंत्रास रथ जुंपण्यास सांगितलें आणि तो लक्ष्मण व सीता यांसह त्यांत बसून पुढें निघून गेला ! पहांट झाल्यावर पौरजनांना राम न दिसल्यामुळें ते शोक करीत अयोध्येस परत गेले.

## ६. गुहाची भेट

इकडे रामाचा रथ अनेक देश व नद्या वेगानें ओलांडत गंगेच्या कांठीं येऊन ठेपला. गंगेचें पाणी खडकांवर आपटत होतें, त्याच्या योगानें तें अट्टाहासच करीत आहे कीं काय, असें वाटत होतें ! तिचें पाणी निर्मळ असून तिच्या कांठीं उत्कृष्ट वनशोभा दिसत होती. तेथें इंगुदी वृक्षाच्या खालीं रथ थांबवून रामानें मुक्काम केला. तेथून जवळच श्रृंगवेरपुर नगर असून त्याचा निषाद जातीचा गुह राजा रामाचा मित्र होता. तो रामास भेटण्यास आला. त्यानें आणलेलें खाद्य व पेय रामानें साभार नाकारलें. सायंसंध्या केल्यानंतर रामानें सीतेसह जमिनीवर अंथरलेल्या दर्भांवर निजण्यासाठीं अंग टाकलें. लक्ष्मण व गुह पहारा करीत बसले. उजाडल्यावर रामानें सुमंत्रास निरोप देऊन अयोध्येस परत जाण्याची आज्ञा केली. मोठ्या कष्टानें सुमंत्र परतला ! मग वडाचा चीक आणून राम व लक्ष्मण यांनीं जटा वळविल्या. गंगापार होण्यासाठीं गुहानें आणलेल्या नावेंत बसून त्यांनीं गंगा नदी ओलांडली. गुह डोळे भरून येऊन ऐलतीरावरून परत गेला. वत्स देशास पोंचल्यावर राम, लक्ष्मण व सीता यांनीं मारलेल्या हरिणांचें मांस खाऊन रात्रीं एका झाडाखालीं मुक्काम केला.

## ७. चित्रकूटावर वास

सुमंत्रहि गेल्यामुळें आतां त्या तिघांना वनवासाचा खरा अनुभव आला ! राम लक्ष्मणास म्हणाला, " आतां कैकेयी संतुष्ट होईल ! हे लक्ष्मणा, पित्यानें जसा माझा त्याग केला, तसा अज्ञानी पुरुषसुद्धां स्त्रीसाठीं आपल्या आज्ञाधारक पुत्राचा त्याग करणार नाहीं ! कैकेयी आपल्या दोघांच्या मातांना विषसुद्धां देईल ! " असें म्हणून रामानें पुष्कळ विलाप केला ! दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्या सर्वांनीं पुढें प्रयाण केलें. गंगा व यमुना यांच्या संगमावर आल्यानंतर त्यांना भरद्वाजाचा आश्रम लागला. त्यांच्या आतिथ्याचा स्वीकार करून रामानें त्यांना निवांतपणें

राहण्यासाठीं स्थान विचारलें. तेव्हां भरद्वाजांनीं त्याला चित्रकूट पर्वताची माहिती सांगितली.

बंधु व पत्नी यांसह राम चित्रकूट पर्वताकडे निघाला. मध्यें यमुना नदी लागली असतां लाकडांचा तराफा करून त्याच्यायोगानें त्यांनीं ती नदी पार केली. पुढें जात असतां त्यांना भिलावा, बेल वगैरे वृक्ष आढळले. मधाचीं द्रोणांसारखीं मोठमोठीं पोळीं त्यांना दिसलीं. पाणकावळा, मोर इत्यादि पक्ष्यांचे शब्द त्यांना ऐकूं आले. हत्तींचे मोठे कळप तेथें संचार करीत होते. अशा त्या चित्रकूट पर्वतावर रामाच्या आज्ञेनें लक्ष्मणानें एक पर्णशाला बांधली. तिची वास्तुशांति करण्यासाठीं लक्ष्मणानें एक सबंध काळवीट अग्नींत भाजला व रामानें यथाविधि यजन केलें. चित्रकूटावर माल्यवती नदीच्या रमणीय तीरीं वास करून रामास वनवासाचें दुःख वाटेनासें झालें !

## ८. दशरथाचा मृत्यु

इकडे सुमंत्र एकटाच रथ घेऊन आलेला पाहून अयोध्येंत हलकल्लोळ उडाला ! दशरथ, कौसल्या व सुमित्रा यांच्या शोकास तर पारावार नव्हता ! रामाला जाऊन पांच रात्रीं झाल्या होत्या. परंतु तो काळ त्यांना पांच वर्षांप्रमाणें वाटला ! सहाव्या रात्रीं दशरथाची जीवनशक्ति अतिशय मंद झाली होती. कौसल्येस हांक मारून तो म्हणाला, " हे कल्याणि, शुभाशुभ कृत्याचें फल मनुष्यास प्राप्त झाल्याखेरीज राहत नाहीं ! तुझ्याशीं माझा विवाह होण्यापूर्वीची गोष्ट आहे. पावसाळा असतांना मी मृगया करण्यास गेलों. मुसळधार पाऊस पडून गेल्यानें सरयू नदी दुथडी भरून वाहत होती. रात्रीच्या अंधारांत सावज पकडण्यासाठीं मी नदीतीरीं वाट पाहात असतां चीत्कार करणाऱ्या हत्तीच्या आवाजासारखा घागर भरण्याचा शब्द झाला. मी शब्दवेधी असल्यानें बाण मारतांच मनुष्याचा करुण शब्द ऐकूं आला. ' अरेरे ! माझ्यासारख्या तापसाचा घात करणारा कोण हा चांडाळ ! आतां माझे वृद्ध आईबाप कसे जीवंत राहतील ? ' हें ऐकतांच मी पुढें गेलों व पाहतों, तों एक तपस्वी बाणानें विद्ध होऊन पडलेला दिसला ! त्याचे आईबाप आश्रमांत तहानेलेले होते व त्यांच्यासाठीं तो पाणी नेण्यास आला होता. ही हकीकत मला सांगून तो तपस्वी निधन पावला. त्याच्या

सांगण्याप्रमाणें मी त्याच्या आश्रमास गेलों. त्याच्या आईबापांना झालेला प्रकार सांगतांच त्यांनीं आक्रांत केला व प्राण सोडला ! मरण्यापूर्वी त्यांनीं मला पुत्रशोकानें अंत होण्याचा भयंकर शाप दिला ! हे कौसल्ये, तो शाप आतां खरा होऊं पाहत आहे ! " इतकें म्हणून दशरथ ग्लानि येऊन पडला. कौसल्या व सुमित्रा त्याच्या जवळच पुत्रशोकानें मृतवत् होऊन पडल्या. तशा स्थितींतच दशरथाचा प्राण निघून गेला ! पहांटे झालेला प्रकार लक्ष्यांत आल्यावर दशरथाच्या सर्व स्त्रिया अपार शोक करूं लागल्या ! अमात्यांनीं दशरथाचें कलेवर तेलाच्या कढईत ठेवलें आणि वसिष्ठांस विचारून त्यांच्या आज्ञेनें भरतास आणविण्यासाठीं केकय देशास दूत रवाना केले. भरतास अयोध्येंतील कोणताच प्रकार निवेदन न करण्याची ताकीद त्यांनीं दूतांस दिली होती !

## ९. भरताचें आगमन

ज्या रात्रीं ते दूत नगरींत आले, त्या रात्रीं भरतास एक अशुभ स्वप्न दिसलें. यामुळें भरत आधींच चिंतामग्न झाला होता. दूतांनीं अश्वपति राजाची भेट घेऊन भरतास वसिष्ठ मुनींचा तातडीनें येण्याचा निरोप कथन केला. भरत म्हणाला, " माझा पिता दशरथ राजा, भ्राते राम-लक्ष्मण आणि माता कौसल्या-सुमित्रा-कैकेयी या सर्वांचें कुशल आहे ना ? " ते दूत खुबीनें म्हणाले, " हे पुरुषश्रेष्ठा, तूं ज्यांचें कुशल इच्छितोस, त्यांचें कुशल आहे ! तुझा रथ तयार आहे, सत्वर चल. " नंतर राजाचा निरोप घेऊन भरत शत्रुघ्नासह अयोध्येस परत जाण्यास निघाला ! वाटेंत केवळ सातच मुक्काम करून तो अयोध्येजवळ येऊन दाखल झाला. अयोध्या नगरी चैतन्यहीन असलेली पाहून भरताच्या मनास चरका बसला ! अयोध्येवर शुद्ध प्रेतकळा आली होती ! सर्वांचे चेहरे चिंताग्रस्त व निस्तेज दिसत होते ! हा काय प्रकार आहे, हेंच भरतास समजेना !

पित्याच्या प्रासादांत गेल्यावर तो कोठेंच दृष्टीस न पडल्यानें भरत मातेच्या प्रासादास गेला. त्याला पाहतांच कैकेयीनें त्यास हृदयाशीं धरलें व प्रेमानें कुशल प्रश्न विचारले. पण भरत तिला उतावीळपणानें म्हणाला, " माते, महाराज कोठेंच दिसत नाहींत, हें काय ? सर्वत्र अशी प्रेतकळा कां आली आहे ? " कैकेयी

म्हणाली, " हे पुत्रा, सर्व प्राणिमात्र ज्या गतीला जातात, ती गति तुझ्या वडिलांना प्राप्त झाली आहे ! " हें ऐकतांच भरत धाडकन् जमिनीवर पडला व शोक करूं लागला. त्याला उठवीत कैकेयी म्हणाली, " हे राजन्, ऊठ. तुझ्यासारखे योग्य पुरुष शोक करीत नाहींत ! तुझी बुद्धि दान व यज्ञ करण्यास उचित आहे ! " यावर भरतानें रामाची चौकशी केली. तेव्हां झालेला सर्व वृत्तांत कैकेयीनें त्यास निवेदन केला ! पित्याच्या निधनाबरोबर राम–लक्ष्मण–सीता यांच्या वनगमनाची दुसरी दुर्वार्ता ऐकून भरताचें अंतःकरण शोकसंतप्त झालें व तो कैकेयीस म्हणाला, " हे पापिणि, पित्याच्या मृत्यूस तूंच कारणीभूत झाली आहेस ! महात्म्या रामाला झाडाच्या साली नेसावयास लावून तुला दुःख कसें झालें नाहीं ? हे दुष्टे, ज्येष्ठ राजपुत्रासच नेहमीं राज्याभिषक होत असतो आणि इक्ष्वाकु कुळाचा तर हा नियमच आहे ! राजा होण्याची तुझी इच्छा मी कधींच पुरी होऊं देणार नाहीं वनाला जाऊन मी रामाला परत आणतों व त्याला गादीवर बसवितों ! राम जेव्हां अयोध्येस परत येईल, तेव्हांच माझ्यावरील कलंक दूर होईल ! " याप्रमाणें शोक करीत भरत भूमीवर पडला !

## १०. दशरथाचा अंत्यविधि

शुद्धीवर आल्यानंतर भरतानें अमात्यांसमोर मातेची निर्भर्त्सना केली व तो म्हणाला, " मला राज्य नको ! त्या बाबत मीं मातेशीं कधीं भाषणहि केलेलें नाहीं ! शत्रुघ्नासह मी दूर देशीं असतां पित्यानें माझा राज्याभिषेक ठरविल्याचें मला खरोखरच ठाऊक नव्हतें ! आणि राम, लक्ष्मण व सीता यांना कां हांकून लावलें, हेंहि पण मला माहीत नव्हतें ! " इतकें बोलल्यावर भरताची कौसल्येशीं भेट झाली. ती म्हणाली, " तुझ्या मातेनें तुला निष्कंटक राज्य मिळवून दिलें आहे ! माझ्या रामाला वृक्षाच्या साली नेसावयास लावून व वनांत पाठवून तिचा काय बरें लाभ झाला ? आतां मलाहि त्याच्यामागें पाठवून दे म्हणावें, म्हणजे झालें ! " हे निष्ठुर उद्गार ऐकून भरतास अत्यंत दुःख झालें व तो तिच्या पायां पडून म्हणाला, " हे आर्ये, मला यांतील कांहींच ठाऊक नसतां व मी निरपराधी असतां मला दोष कां बरें देतेस ? रामाबद्दलचें माझें आत्यंतिक प्रेम तुला विदित नाहीं काय ? ज्याच्या संमतीनें राम वनास गेला, त्याला सर्व प्रकारचें

पाप लागो ! " इतकें म्हणून भरत भडाभड शपथा घेऊं लागला ! त्या ऐकून कष्टी झालेली कौसल्या त्याला म्हणाली, " हे पुत्रा, असल्या घोर शपथा वाहून तूं माझे प्राण व्याकुळ करीत आहेस ! तुझें मन धर्मापासून चळलें नाहीं, हें सुदैवच होय ! " असें बोलून कौसल्येनें भरतास मांडीवर घेतलें व ती ओक्साबोक्शी रडूं लागली ! वसिष्ठांना भरत आल्याचें कळल्यावर त्यांनींहि त्याचें सांत्वन केलें. नंतर दशरथाचें पांढुरकें पडलेलें प्रेत तेलाच्या कढईतून काढून पालखींत ठेवलें. प्रेताच्या पुढून सोनें, रूपें व वस्त्रें उधळीत लोक चालूं लागले. चंदनादि काष्ठांच्या चितेवर राजाचें कलेवर ठेवून चिता पेटविली. अश्वमेधांत यज्ञ केलेल्या त्या राजाला ऋत्विजांनीं उलटया प्रदक्षिणा केल्या. दहा दिवस सुतक पाळल्यानंतर बाराव्या दिवशीं श्राद्ध झालें. ब्राह्मणांना विपुल दान प्राप्त झालें. तेराव्या दिवशीं अस्थि गोळा करतांना भरत व शत्रुघ्न या उभयतांनीं फार शोक केला !

## ११. भरताचा रामाकडे जाण्याचा विचार

दशरथाचें और्ध्वदेहिक संपल्यावर भरत व शत्रुघ्न रामाकडे जाण्याचा विचार करीत बसले होते. इतक्यांत अलंकारानें नटलेली वानरीसारखी दिसणारी मंथरा शत्रुघ्नानें अवलोकन केली. " सर्वांच्या दुःखाला कारणीभूत झालेली हीच दुष्टा ! " असें म्हणून शत्रुघ्नानें तिला घट्ट धरलें व जमिनीवरून तो तिला फरफरा ओढूं लागला ! तिच्या ओरडण्यानें सर्व प्रासाद दणाणून गेला ! शत्रुघ्नानें मंथरेबरोबरच कैकेयीचीहि अतिशय निर्भर्त्सना केली. अखेर भरतानें " स्त्री-वध केल्यास रामास क्रोध येईल ! तरी तिला सोड ! " अशी मध्यस्थी केल्यावरून शत्रुघ्नानें मंथरेस सोडून दिलें ! चौदाव्या दिवशीं राजकार्यधुरंधर पुरुष एकत्रित होऊन भरतास म्हणाले, " दशरथ महाराज निधन पावले आणि राम-लक्ष्मण वनास गेले. तेव्हां हे राजपुत्रा, तूं आमचा राजा हो. सांप्रत कोणी राजा नाहीं व राजा नसलेल्या राज्यांत अराजक माजून सर्वत्र बेबंदशाही होतें ! तरी या राज्याचा तूं स्वीकार कर. " हें भाषण ऐकून भरतानें तेथील राज्याभिषेकाच्या साहित्यास प्रदक्षिणा घातली व तो म्हणाला, " हे कुशल लोकहो, ज्येष्ठास राजपद मिळावें, ही आमच्या कुळाची रीत असतां आपणांस असें बोलणें योग्य

नाहीं ! मी रामास वनांतून घेऊन येतों व येण्यापूर्वी तेथेंच त्यास अभिषेक करतों ! " भरताचा हा उत्कृष्ट विचार ऐकून जमलेले सर्व लोक त्याला म्हणाले, " मिळत असलेली पृथ्वी ज्येष्ठ राजकुमारास देणाऱ्या तुझी पद्मचिन्हा लक्ष्मी नेहमीं सेवा करो ! " हा आशीर्वाद ऐकून भरताच्या नेत्रांत आनंदाश्रु आले.

भरताच्या आज्ञेवरून वनाकडे जाणारा मार्ग कारागीर वगैरे लोकांकडून साफ करण्याचें काम सुरू झालें. उंच--सखल व सजल-निर्जल जमिनीची माहिती असणारे, छावण्या देणारे, रथ व यंत्रे बनविणारे, आचारी, सफेती देणारे असे नानाप्रकारचे लोक पुढें रवाना झाले. त्यांनीं झाडें-झुडपें तोडून रस्ते तयार केले व नद्यांवर पूल बांधले. ठिकठिकाणीं मुक्काम करण्यासाठीं निवासस्थानें तयार केलीं. अशा प्रकारें रामाकडे वनांत जाऊन त्याला अयोध्येस परत आणण्याचा राजमार्ग तयार झाला.

इकडे अयोध्येंत भरताला राज्याभिषेक करण्याचें ज्या दिवशीं ठरलें होतें, त्याच्या आधींची रात्र संपत आली असतां सुत व मागध भरताचा मंगल स्तव करूं लागले. नौबदीवर सोन्याची टिपरी पडून शंख-वगैरे वाद्यें वाजूं लागलीं. या आवाजांनीं जागा झालेला भरत संतप्त झाला आणि " मी राजा नव्हे ! " असें म्हणून त्यानें तें सर्व बंद केलें ! तो दुःखानें शत्रुघ्नाला म्हणाला, " हे शत्रुघ्ना, कैकेयीमुळें माझ्या बाबतींत लोक करीत असलेलें हें अनुचित कर्म पहा ! " तो दिवस भरताच्या राज्याभिषेकाचा ठरला असल्यामुळें राजधर्म जाणणारे वसिष्ठ महर्षि इक्ष्वाकु राजाच्या सभागृहांत प्रविष्ट झाले. तेथील सुवर्णासनावर बसून वसिष्ठ दूतांना म्हणाले, " हे दूत हो, ब्राह्मण, क्षत्रिय, योद्धे, अमात्य, सेनापति आणि भरत, शत्रुघ्न, युधाजित्, सुमंत्र व इतर प्रमुख हितसंबंधी लोकांना बोलावून आणा. " त्याप्रमाणें दूतांनीं सर्वांस बोलावून आणलें. भरत येऊं लागतांच सर्वांनीं त्यास राजाप्रमाणें अभिवादन केलें. मग वसिष्ठ म्हणाले, " भरता, तुझा पिता राजा दशरथ तुला राज्य देऊन परलोकास गेला आहे ! तेव्हां तूं त्याचा स्वीकार करून आपणास अभिषेक करून घे. " हें ऐकून भरत शोकाकुल झाला व म्हणाला, " धर्मनिष्ठ विवेकी रामाच्या राज्याचा अपहार करण्यास माझ्यासारखा कसा प्रवृत्त होईल ? मातेनें केलेलें कृत्य मला मान्य नाहीं ! पुरुषश्रेष्ठ रामच या राज्याचा स्वामी आहे ! मी त्याच्या मागोमाग वनास जातों ! " हें धर्माला

अनुसरून असलेलें भरताचें भाषण ऐकून सर्व सभासदांच्या नेत्रांतून आनंदाश्रु वाहूं लागले. भरत पुनः म्हणाला, " रस्ता साफ करणारे व इतर दक्ष लोक मीं आधींच पुढें पाठविले आहेत. रामाला मी वनांतून परत आणूं न शकलों, तर लक्ष्मणाप्रमाणें मींहि तेथेंच राहीन ! " इतकें म्हणून भरतानें सुमंत्रास स्वारी निघण्याची तयारी करण्यास सांगितलें. नंतर अमात्य व सेनापति यांनीं सैन्य चालूं केलें. रथ, घोडे व बैलगाड्या यांचा उपयोग करून पुरुष व स्त्रिया रामाकडे जाण्यास निघाल्या. सुमंत्रानें जोडलेल्या रथांत भरत आरूढ झाला. कौसल्या, सुमित्रा व कैकेयी याहि रथांत बसून निघाल्या. " रामाला मी केव्हां पाहीन ! " असें जो तो म्हणूं लागला !

## १२. भरताचें वनगमन

अशा रीतीनें हा सर्व परिवार निघाला असतां तो मार्ग क्रमण करीत शृंगवेरपुराजवळ गंगेसमीप येऊन पोंचला. भरताच्या आज्ञेनें गंगातीरीं सर्वांचा तळ पडला. मृत दशरथास गंगेंत उतरून तर्पण करण्याच्या हेतूनें भरतानें हा मुक्काम केला. हें प्रचंड सैन्य पाहून निषधराज गुह आपल्या जातीच्या लोकांना म्हणाला, " ही समुद्रासारखी अफाट सेना कोणत्या उद्देशानें निघाली आहे, हें माझ्या लक्ष्यांत येत नाहीं ! इक्ष्वाकु कुलाचा कोविदार--ध्वज ज्याअर्थी रथावर फडफडतांना दृष्टीस पडतो, त्याअर्थी हा भरतच आलेला असावा ! तो आम्हांस मारून कदाचित् रामाचाहि वध करील ! तरी त्याचा उद्देश कळल्याशिवाय हें सैन्य गंगापार जाऊं देऊं नका ! लढण्याच्या तयारीनें शंभर नावाडी प्रत्येकींत असलेल्या पांचशें नावा तयार ठेवा ! " अशी आज्ञा करून गुह खाद्यपेयांचा नजराणा बरोबर घेऊन भरताकडे निघाला. समयचतुर सुमंत्र भरतास म्हणाला, " दंडकारण्यावर सत्ता गाजविणारा हा वृद्ध गुह हजार जातभाई घेऊन इकडे येत आहे. हा रामाचा सखा आहे. म्हणून, हे भरता, तूं याची भेट घे. " नंतर गुह व भरत यांची भेट झाली. कुशल प्रश्न झाल्यावर भरत गुहास म्हणाला, " कोणत्या मार्गानें मीं भरद्वाजाच्या आश्रमाला जावें ? " गुह हात जोडून म्हणाला, " हे राजपुत्रा, माहितगार धीवर व मी तुझ्याबरोबर येऊन तुला वाट दाखवूं. पण रामाविषयीं दुष्टभाव धरून तर तूं जात नाहींस ना ? या

प्रचंड सैन्यावरून तशी शंका येते ! " आकाशासारखा निर्मल भरत म्हणाला, " रामाविषयीं भलतें पाप माझ्या मनांत कधीं न येवो ! राम मला पित्यासमान असून त्याला परत आणण्यासाठींच मी त्याच्याकडे जात आहें ! " हें ऐकून गुह आनंदित होऊन म्हणाला, " तूं धन्य आहेस ! तुझ्यासारखा भूतलावर दुसरा कोणी मला दिसत नाहीं ! अनायासें प्राप्त झालेलें राज्य तूं टाकून देण्याची इच्छा करीत आहेस, यामुळें तुझी जगांत अक्षय्य कीर्ति होईल ! " असें संभाषण होत असतांच सूर्य मावळून रात्र झाली. भरतानें सैन्यासह तेथेंच मुक्काम केला. भरताला शोकामुळें वितळणाऱ्या बर्फाप्रमाणें घाम येऊं लागला. त्याचा रामाबद्दलचा सद्भाव पाहून गुहानें राम तेथें आला असतां झालेला सर्व प्रकार भरतास निवेदन केला. नंतर त्यानें राम ज्या इंगुदी वृक्षाखालीं निजला होता, तो वृक्ष व ज्या दर्भांवर पहुडला होता, ते दर्भ भरतास दाखविले. त्या दर्भांवर सीतेच्या रेशमी वस्त्राचे तंतु कांहीं ठिकाणीं चिकटलेले भरतास दिसून आले. तेव्हां त्याच्या शोकाचा पारावार नाहींसा झाला ! याप्रमाणें कांहीं वेळ गुहाशीं रामाबद्दल वार्तालाप करून व त्यास निरोप देऊन भरतानें गंगातीरीं विश्रांति घेतली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं निषधराज गुहास पुनः पाचारण करून भरत त्यास म्हणाला, " हे विचारी गुहा, पुष्कळ नौका आणून धीवरांकडून आम्हांस गंगेतून पलीकडे ने. " ही आज्ञा ऐकतांच गुहानें पांचशें नावा चोहोंकडून आणल्या. मोठमोठ्या घंटा लावलेल्या, पताका व शिडें असलेल्या आणि चित्रादिकांनीं सुशोभित केलेल्या त्या ' स्वस्तिक ' नावांतून भरत व अन्य प्रमुख मंडळी गंगापार गेली. इतर नावांतून बाकीचे लोक गेले. नंतर भरत सर्वांसह पुढें मार्गक्रमण करूं लागला. भरद्वाज मुनींचा आश्रम लागला असतां नासधूस न व्हावी, यासाठीं एक कोस अंतरावर सर्व लोकांना ठेवून भरत अमात्यांसह वसिष्ठांना पुढें करून भरद्वाजांच्या दर्शनास गेला. भरद्वाजांनीं सर्वांचें यथोचित स्वागत केलें. नंतर ते भरतास म्हणाले. " राज्य करीत असतांना तुला इकडे येण्याचें प्रयोजन काय ? ज्या रामाला बंधु व पत्नी यांसह वनांत हांकून दिलें, त्याचें अशुभ करण्याची तर तुझी इच्छा नाहीं ना ? " हें ऐकून डोळे भरून येऊन भरत अडखळत म्हणाला, " भगवान्‌हि जर असें समजत असतील, तर मी नीचच म्हटला पाहिजे ! माझ्या बाबतींत मातेनें जें केलें, तें मला संमत नाहीं ! रामाला

अयोध्येस परत आणण्यासाठींच मी निघालों आहें ! आपण शंका सोडून तो सांप्रत कोठें आहे, हें मला सांगा." वसिष्ठ-प्रभृति ऋत्विजांनींहि भरताच्या म्हणण्यास पुष्टि दिली. यावर भरद्वाज मुनि संतुष्ट झाले. ते म्हणाले, "तुझा भ्राता चित्रकूट पर्वतावर वास्तव्य करीत आहे. तूं आज येथें मुक्काम करून उद्‌ईक तिकडे जा." भरद्वाजांच्या सांगण्यावरून भरतानें सर्व सैन्य आश्रमास बोलावून घेतलें. भरद्वाजांच्या तपःसामर्थ्यानें त्या सर्व परिवाराची राजाप्रमाणें उत्कृष्ट व्यवस्था झाली ! सर्वजण संतुष्ट होऊन "अहो, हा तर स्वर्गच आहे ! आम्ही अयोध्या किंवा दंडकारण्य येथें कोठेंच न जातां या ठिकाणींच राहूं इच्छितों !" असे आपापसांत उद्‌गार काढूं लागले ! त्या रात्रीं तेथें मुक्काम केल्यावर पहांटे भरतानें मुनिश्रेष्ठांचा निरोप मागितला. कौसल्या व सुमित्रा यांनीं भरद्वाजांना प्रणाम केला. कैकेयीनेंहि खजील मुद्रेनें त्यांचें अनुकरण केलें ! तीनहि मातांचा परिचय करून देतांना भरत कैकेयीस दोष देऊं लागला. तेव्हां भरद्वाज म्हणाले, "तिला नांवें ठेवूं नकोस. रामाचा वनवास हितपरिणामींच होणार आहे ! कारण, देव, ऋषि व मानव यांचें हित त्यावर अवलंबून आहे !" याप्रमाणें निरोप घेऊन भरत लवाजम्यासह चित्रकूट पर्वताकडे निघाला. बराच मार्ग आक्रमण केल्यानंतर ते सर्वजण चित्रकूट पर्वताजवळ आले. भरताला लांबून अग्नीचा धूर हवेंत जात असलेला दृष्टीस पडला. तेव्हां येथें राम किंवा कोणी अन्य तपस्वी यांची वस्ती असली पाहिजे, असा त्यानें अंदाज केला आणि सैन्याला तेथेंच थांबवून व सुमंत्रास बरोबर घेऊन तो पुढें निघाला.

## १३. वनांतील भरत-भेट

इकडे राम सीतेला घेऊन चित्रकूट पर्वताची शोभा पहात विहार करीत होता. धातूंनीं युक्त असलेला, हरीण, वाघ-वगैरेंच्या समुदायानें गजबजलेला आणि नानाप्रकारच्या वृक्षलतांनीं व्यापलेला तो रमणीय पर्वत पाहून राम संतुष्ट झाला. त्यानें तो पर्वत आणि हंस-सारसादि पक्ष्यांनीं युक्त अशी मंदाकिनी नदी सीतेस दाखविली. तो म्हणाला, "हे वैदेही, तूं व लक्ष्मण यांच्या सहवासांत या रमणीय स्थानीं रहात असतांना मला अयोध्येच्या राज्याचीहि इच्छा होत नाहीं !" इतक्यांत रामाला लांबून धुळीचे लोट दिसूं लागले आणि जनसंमर्दाचा कोलाहलहि ऐकूं आला ! तेव्हां राम लक्ष्मणास म्हणाला, "हा भयंकर आवाज कोठून येत

आहे ? कोणी राजकुमार मृगयेसाठीं तर आला नाहीं ना ?" लक्ष्मण लगबगीनें प्रफुल्लित साल वृक्षावर चढला व त्याला लांबून चतुरंग सैन्य दिसूं लागलें. तो रामास म्हणाला, " अग्नि विझवून टाका, सीतेला गुहेंत जाऊन बसूं द्या आणि धनुष्य बाण घेऊन सिद्ध व्हा !" राम म्हणाला, " हे लक्ष्मणा, हें कोणाचें सैन्य तुला वाटत आहे, हें नीट पाहून सांग." लक्ष्मण म्हणाला, " समोर एक प्रचंड वृक्ष दिसत असून त्याच्याजवळ उभ्या असलेल्या रथावर आपल्या कुलाचा कोविदार ध्वज फडकत आहे. तेव्हां हें सैन्य भरताचेंच असलें पाहिजे ! अभिषेक झाल्यानंतर निष्कंटक राज्य होण्यासाठीं तो आपणांस मारावयास आलेला दिसत आहे ! हे राघवा, भरताचा वध करणेंच अवश्य आहे !" राम म्हणाला, " हे लक्ष्मणा, पित्याचें वचन पाळण्याची प्रतिज्ञा करून मी जर भरताचा वध केला, तर लोकापवादानें युक्त असें राज्य घेऊन मला काय करावयाचें आहे ? अधर्मानें मिळणारें देवांचें आधिपत्यहि मला नको आहे ! शिवाय, भरत मला राज्य देण्यासाठींहि आला असेल, त्याचा कांहींच वाईट हेतु नसेल ! राज्याचाच जर प्रश्न असेल, तर ' लक्ष्मणास राज्य दे ! ' असें मी भरतास सांगतों व तें तोहि मान्य करील !" यावर लक्ष्मण लाजून खजील झाला व अवयव लज्जेनें आकुंचित झाल्यामुळें तो त्या अवयवांमध्येंच शिरूं लागला आहे कीं काय, असा भासूं लागला ! तो म्हणाला, " कदाचित् तात दशरथहि तुला भेटावयास आले असतील !" असें म्हणून त्या साल वृक्षाच्या शेंड्यावरून लक्ष्मण खालीं उतरला.

भरतानें वनाची नासधूस होऊं नये, म्हणून सैन्य मागें ठेवलें व तो शत्रुघ्नास घेऊन पुढें निघाला. आपल्या मातांना मागून घेऊन येण्यास त्यानें वसिष्ठांना सांगितलें. चालतां चालतां भरत रामाच्या पर्णशाळेजवळ आला. ती पर्णशाला साल, ताड व अश्वकर्ण या वृक्षांच्या पानांनीं आच्छादिली होती. झाडांवर खुणेसाठीं वल्कलें टांगून ठेवलेलीं त्याला दिसलीं. मृग व महिष यांच्या शेणाच्या गोवऱ्या थंडीसाठीं सांठवून ठेवलेल्या त्याला दिसल्या. होमाग्नीचा धूर वर जात असलेला त्यानें पाहिला. रामाच्या त्या निवासस्थानांत अग्नि प्रदीप्त झालेलें उतरतें स्थंडिल त्याच्या दृष्टीस पडलें. राम व लक्ष्मण यांचीं दिव्य आयुधें त्यानें तेथें टांगलेलीं पाहिलीं. जटा वाढवून हरिणाचें कातडें व वल्कलें परिधान केलेला राम दृग्गोचर होतांच भरत त्याच्याकडे धांवला व " हे आर्य !" असें म्हणत



भरत वंदित राम

मध्येंच भूमीवर पडला ! शत्रुघ्नानेंहि रडतच रामाच्या चरणांवर मस्तक ठेवलें ! रामानें त्यांना आलिंगन दिलें व तो अश्रु गाळूं लागला ! सुमंत्र व गुह हेहि तेथें येऊन ठेपले. भरताच्या मस्तकाचें अवघ्राण करून त्याला मांडीवर घेऊन राम म्हणाला, " हे भरता, तूं वनांत आलास, तेव्हां तात कोठें आहेत ? ते जीवंत तर आहेत ना ? कीं, माझ्या दुःखानें स्वर्गवासी झाले ? तूं लहान म्हणून आपलें परंपरागत राज्य तर कोणी हिसकून घेतलें नाहीं ना ? " अशा प्रकारें रामानें भरताची परोपरीनें चौकशी केली. पुनः राम म्हणाला, " हे भ्रात्या, वल्कल, मृगचर्म व जटा धारण करून आणि राज्य सोडून तूं येथें कां आलास, हें सांग. " यावर भरतानें दशरथ मृत झाल्याचा व इतरहि सर्व वृत्तांत रामास निवेदन केला ! पित्याच्या मरणाचें वर्तमान ऐकतांच राम वज्र प्रहार झाल्याप्रमाणें मूर्च्छित होऊन पडला ! सीतेनें व भ्रात्यांनीं तोंडावर पाणी शिंपडल्यानंतर शुद्धीवर येऊन तो म्हणाला, " माझ्या शोकानें पित्यास मृत्यु आला असतां अयोध्येस येऊन तरी मला काय करावयाचें आहे ? " असें दुःखानें म्हणून सीता व लक्ष्मण यांच्याकडे वळून राम म्हणाला, " सीते, तुझे पूज्य श्वशुर मृत्यु पावले आहेत ! लक्ष्मणा, तूं पित्याला मुकला आहेस ! " नंतर सर्वच शोक करूं लागले ! मग राम सर्वांसह मंदाकिनीच्या तीरावर गेला आणि त्यानें ओंजळींत पाणी घेऊन व पश्चिमाभिमुख होऊन तें खालीं सोडून दिलें. दर्भ अंथरून त्यांवर त्यानें इंगुदी व बोरें यांचा पिंड अर्पण केला. तेथून ते पर्णकुटिकेस परत आले. रामदर्शनास कौसल्या वगैरे राजमाता आणि इतर सर्व परिवार पर्णकुटिकेंत आला. भेटींत कौसल्या व इतर राजमाता यांनीं अतोनात शोक केला !

## १४. रामाचा अढळ निश्चय

सर्व रात्र शोकांत जाऊन दिवस उजाडला असतां सर्वांनीं सकाळचें आन्हिक आटोपलें आणि रामाजवळ सर्व मंडळी येऊन बसली. भरत रामास म्हणाला, " माझ्या मातेचें कोड पुरवून तातांनीं मला दिलेलें राज्य मी तुला देतों ! तें तूं सांभाळ ! सामान्य पक्ष्याला जशी गरुडाची झेंप मानवत नाहीं, तसें तुझें सामर्थ्य माझ्या अंगांत नसल्यानें हें विशाल राज्य मी सांभाळूं शकत नाहीं ! " यावर राम म्हणाला, " हे भरता, पित्याची आज्ञा पालन करून तूं अयोध्येस जा व राज्य कर ! मला त्यांच्या आज्ञेचें उल्लंघन करणें शक्य नाहीं ! परलोकाची

इच्छा करणारानें गुरुजनांच्या आज्ञेप्रमाणेंच वर्तन केलें पाहिजे ! " हें ऐकून भरत म्हणाला, " हे रामा, या जगांत तुझ्या तोडीचा कोणी सांपडेल काय ? दुःखानें तूं दुःखी होत नाहींस व सुखानें हर्षित होत नाहींस ! तुला कोणताहि दुर्धर प्रसंग घाबरून टाकण्यास समर्थ होणार नाहीं ! मी परदेशांत असतां माझ्या क्षुद्र मातेनें केलेलें पातक मला मान्य नाहीं ! मी धर्मपाशानें बद्ध असल्यामुळेंच तिचा वध करूं शकत नाहीं ! तेव्हां हें परंपरेनें चालत आलेलें निष्कंटक राज्य तूं सांभाळ ! वसिष्ठादि ऋत्विजांकडून तुला येथेंच राज्याभिषेक करूं व मग तूं आमच्या बरोबर अयोध्येस चल. " राम म्हणाला, " असें भाषण करण्यास तूंच योग्य आहेस ! परंतु हे भ्रात्या भरता, आपल्या पित्यानें तुझ्या मातेचें पाणिग्रहण करतांना तुझ्या आजाजवळ ' हिच्यापासून होणाऱ्या पुत्रालाच मी राज्य देईन ! ' अशी प्रतिज्ञा केली होती ! याशिवाय, देव-दैत्यांच्या युद्धांत आपल्या पित्यानें तुझ्या मातेस दोन वरहि देऊं केले होते ! तेव्हां आपल्या सत्यवादी पित्याला वचनांतून मुक्त करण्यासाठीं तूंच स्वतःस सत्वर अभिषेक करून घे ! मी लौकरच लक्ष्मण व सीतेसह दंडकारण्यांत शिरतों ! "

याप्रमाणें राम बोलल्यावर द्विजश्रेष्ठ जाबालि रामास म्हणाले, " हे रामा, अज्ञानी माणसाप्रमाणें निरर्थक विचार मनांत आणूं नकोस ! आई, बाप वगैरेंचा संबंध प्रवासांत मध्येंच केलेल्या तात्पुरत्या मुक्कामासारखा क्षणिक आहे ! दशरथ तुझा कोणी नव्हे व तूंहि त्याचा कोणी नव्हे ! दशरथास जेथें जावयाचें, तेथें तो गेला ! हा प्राणिमात्राचा सहज धर्मच आहे ! तूं मात्र व्यर्थ त्रास करून घेत आहेस ! अष्टकादि श्राद्धांत अन्नाचा व्यर्थ नाश होतो ! मृत मनुष्य खाऊं शकतो काय ? ' देवतांची पूजा करा, दान करा, यज्ञदीक्षा घ्या, तप करा, घर सोडून संन्यासी व्हा ! ' इत्यादि गोष्टी सांगणारे ग्रंथ धूर्त लोकांनीं इतरांची दान-प्रवृत्ति होण्यासाठीं केलेले आहेत ! हे बुद्धिमान् रामा, इहलोकाशिवाय दुसरा कोणताच लोक नाहीं ! तेव्हां भरताच्या म्हणण्याप्रमाणें तूं राज्याचा स्वीकार कर ! "

जाबालींचें हें भाषण ऐकून राम म्हणाला, " हे द्विज श्रेष्ठ, माझ्या कल्याणा-साठीं आपण जें बोललांत, तें शिरोधार्य करण्याजोगें नाहीं ! आपल्या उपदेशा-प्रमाणें चालल्यास अधर्माला धर्माचें स्वरूप येईल ! आपल्या सांगण्याप्रमाणें

वेदोक्त शुभ कर्म सोडून मी विधिहीन कर्म करूं लागल्यास मला कोण चांगलें म्हणेल ? आणि, दिलेलें वचन मोडून मी वर्तन करूं लागल्यास मला स्वर्ग तरी कसा मिळेल ? राजाप्रमाणें प्रजा आचरण करते, म्हणून मी चुकीचा कित्ता लोकांपुढें ठेवूं शकत नाहीं ! धर्म सत्यावर स्थित असून सत्य सर्वांचें मूळ आहे ! सत्यच ईश्वर असून सत्याशिवाय श्रेष्ठ गति नाहीं ! आपण नास्तिक असून धर्ममार्गापासून कित्येक कोस दूर आहांत ! " राम रागावलेला पाहून वसिष्ठांनीं जाबालींची मध्यस्थी केली व ते नास्तिक नसल्याचा निर्वाळा दिला ! " तुला अयोध्येस परत न्यावें, या इच्छेनेंच जाबालि असें बोलले ! " असेंहि वसिष्ठ ऋषि म्हणाले ! वसिष्ठांनीं देखील रामास राज्याचा स्वीकार करण्यास सांगितलें. पण राम आपल्या निश्चयापासून ढळला नाहीं ! त्याचा निर्धार पाहून भरतानें दर्भ पसरले व त्यांवर पडून कांहीं न खातां धरणें धरून पडण्याचा विचार बोलून दाखविला व तो लगेच अमलांतहि आणला ! परंतु धरणें धरून अडविणें हें ब्राह्मणांचें काम असून मूर्धाभिषिक्त राजाला तें व्रत विहित नाहीं, अशी रामानें भरताची समजूत घातली ! मग भरत उठला आणि त्यावेळेच्या रीतीप्रमाणें रामास व जलास स्पर्श करून धरणें धरण्याच्या नियमांतून मोकळा झाला ! राम व भरत यांच्या भेटीचें वर्तमान ऐकून ऋषि, द्विज–वगैरे रामाच्या भेटीस आले आणि रामाच्या हातून रावण लौकर मरावा, या हेतूनें त्यांनीं भरतालाच रामाच्या म्हणण्यास कबूल होण्याचा आग्रह केला ! नंतर ते तेथून निघून गेले. निरुपाय जाणून शेवटीं भरतानें आपण आणलेल्या सोन्याच्या पादुका रामापुढें ठेवल्या व त्यांवर त्याला पाय ठेवण्यास सांगून तो म्हणाला, " हे रामा, तुझ्या या पादुका पुढें करून चौदा वर्षें मी राज्यकारभार पाहतों ! तोंवर जटावल्कलें धारण करून मी फळें व मुळें खाऊन राहीन ! चौदा वर्षांनंतर तुझी भेट न झाल्यास अग्निप्रवेश करीन ! " हें ऐकून " तथास्तु ! " म्हणून रामानें भरतास आलिंगन दिलें व त्यास निरोप दिला.

## १५. भरताचा नंदिग्रामीं वास

नंतर भरत पादुका मस्तकावर घेऊन शत्रुघ्नासह रथावर चढला. पुरोहित, अमात्य, सैन्य–वगैरे सर्व जाण्यास निघाले. मध्यंतरीं भरतानें भरद्वाज–ऋषींची

त्यांच्या आश्रमांत भेट घेऊन त्यांचा आशीर्वाद घेतला. अयोध्येंत आल्यावर भरतास ती नगरी निरानंद दिसली! भरतानें आपल्या मातांना अयोध्येंत ठेवलें आणि अयोध्येच्या पूर्वेस असलेल्या नंदिग्राम गांवीं जाऊन तो तेथें वास करूं लागला. नंदिग्रामास रामाच्या पादुका भरतानें स्थापन केल्या आणि त्यावर स्वतः छत्र-चामरें धरून तो त्यांना सर्व राज्यकारभार वेळोवेळीं निवेदन करूं लागला!

## १६. रामाचें दंडकारण्यास प्रयाण

चित्रकूट पर्वतावर भरत-भेट झाल्यानें त्या स्थानीं रामास भरताची वारंवार आठवण होऊं लागली व दुःख वाटूं लागलें म्हणून त्यानें चित्रकूट पर्वत सोडून दंडकारण्यांत जाऊन रहाण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें, लक्ष्मण व सीता यांच्यासह तो तिकडे जाण्यास निघाला. मध्यंतरीं अत्रिऋषींच्या आश्रमांत त्यानें मुक्काम केला. ऋषींनीं त्या सर्वांचा यथोचित सत्कार केला. अत्रिऋषींची वृद्ध पत्नी अनसूया तेथें आली असतां ते तिला म्हणाले, "या सीतेचा सत्कार कर." नंतर ते रामाला आपली पत्नी अनसूया हिची हकीकत सांगूं लागले. "दहा वर्षे पर्जन्य पडला नसतां अनसूयेनें या आश्रमांत गंगा आणली! हिनें उग्र तप केलें असून हिच्या पुण्यानेंच ऋषींचीं विघ्नें नाहींशीं झालीं आहेत! अशा या वंदनीय व क्रोधरहित तपस्विनीकडे सीतेस जाऊं दे." रामानेंहि सीतेला ऋषि-पत्नीबरोबर जाण्यास सांगितलें. अनसूयेचीं गात्रें शिथिल झालीं असून तिच्या अंगावर सुरकुत्या पडल्या होत्या. जरेमुळें तिचे केश शुभ्र झाले असून वाऱ्यानें हलणाऱ्या केळीप्रमाणें तिचें शरीर लटलटा कांपत होतें. अशा त्या अनसूयेला सीतेनें आपलें नांव सांगून नमस्कार केला. ती सीतेला म्हणाली, "धर्माकडे तुझें लक्ष्य आहे, ही भाग्याची गोष्ट आहे! राजकन्या असण्याचा अहंकार व बांधव यांचा त्याग करून तूं रामाबरोबर वनांत आलीस, हें मोठें सुदैवच होय! पति कसाहि असो, तोच स्त्रियांचें मुख्य दैवत होय! हे सीते, तूं आपल्या भर्त्यांची खरीखुरी सहधर्मचारिणी हो! म्हणजे, तुला यश व पुण्य या दोहोंची प्राप्ति होईल!" सीतेनें त्या तपस्विनीचा हा उपदेश शिरसामान्य केला. मग सीतेचें मस्तक हुंगून अनसूया प्रसन्नतेनें म्हणाली, "हे सीते, मी तुला दिव्य माला, वस्त्रें, भूषणें व उटी देतें! हीं सर्व नेहमीं टवटवीत राहून तुझ्या शरीराला

शोभा देतील ! " सीतेनें त्या वस्तु नम्रतेनें ग्रहण केल्या आणि अनसूयेनें विचारल्यावरून तिला आपल्या स्वयंवराची सर्व हकीकत सांगितली. अनसूयेनें ती मोठ्या प्रेमानें ऐकली.

नंतर सीतेला आलिंगन देऊन अनसूया म्हणाली, " हे मधुरभाषिणि सीते, आतां सूर्य अस्ताला गेला असून रात्र होऊं लागली आहे. दिवसभर अन्नासाठीं संचार करून सायंकाळीं निद्रेसाठीं आपल्या घरट्यांत जाऊन बसलेल्या पक्षांचा किलबिलाट ऐकूं येत आहे. उदकामध्यें वल्कलें धुऊन स्नानानें ज्यांचें शरीर ओलें झालें आहे, असे हे ऋषि हातांत कलश घेऊन इकडे येत आहेत. अग्नींत केलेल्या होमामुळें पारव्यांच्या कंठासारखा तांबूस रंगाचा आणि वाऱ्यानें हलणारा धूर दृष्टीस पडत आहे. ज्यांच्यावर थोडींच पानें आहेत, अशीं झाडें अंधारामुळें दाट पानें असल्यासारखीं दिसत आहेत ! निशाचर प्राणी चोहोंकडे हिंडूं लागले आहेत. तपोवनांतील हरीण वेदीभोंवतीं पडून विश्रांति घेत आहेत. हे सीते, रात्र नक्षत्रालंकृत झाली असून ज्योत्स्नेच्या प्रावर्णानें युक्त असा चंद्र आकाशांत उदय पावला आहे. आतां तूं हे दिव्य अलंकार धारण करून रामाकडे जा ! " सीतेनें ते अलंकार धारण केले व ती अनसूयेला नमस्कार करून रामाकडे गेली. सालंकृत सीतेला पाहून राम संतुष्ट झाला. मग त्यांनीं त्या रात्रीं तेथें विश्रांति घेतली. पहांट होतांच राम लक्ष्मणांनीं स्नानसंध्या करून अग्निहोत्र आटोपलें आणि तेथून पुढें जाण्यासाठीं तपस्वीजनांची परवानगी मागितली. ते तपस्वी त्यांना म्हणाले, " हे राघवा, या वनांत नानारूपधारी नरमांसभक्षक राक्षक व रक्त पिणारे हिंस्र पशु राहतात ! कोणी तपस्वी असावध आढळल्यास ते त्याला खाऊन टाकतात ! तरी हे रामा, तूं त्यांचा वध कर ! या रस्त्यानें ऋषि फळें आणण्यास वनांत जातात. तूंहि त्यानेंच या दुर्गम वनांत प्रवेश कर ! " त्या तपस्वी जनांनीं आशीर्वाद दिल्यावर, मेघमंडळांत प्रवेश करणाऱ्या सूर्याप्रमाणें, रामानें लक्ष्मण व सीता यांसह त्या अरण्यांत प्रवेश केला.

– अयोध्याकांड संपूर्ण –

# अरण्य कांड



## १. विराधाचा वध

दंडकारण्यामध्यें प्रवेश केल्यावर तपस्वी लोकांचा आश्रमसमुदाय रामाच्या दृष्टीस पडला. दर्भ व वल्कलें यांनीं तो भरलेला असून मृग व पक्षी यांनीं तो व्याप्त होता. होमशाला, यज्ञपात्रें, समिधा, पाण्यानें भरलेले कलश व फळें-मुळें यांनीं त्याला शोभा आली होती. असा तो आश्रम-समुदाय अवलोकन करून रामानें आपल्या धनुष्याची दोरी उतरून तो लक्ष्मण व सीता यांसह त्यांच्याकडे गेला. तेथील ऋषींनीं यथाविधि उदक व फुलें-फळें देऊन त्याला म्हटलें, "हा आश्रम तुझाच आहे! प्रजारक्षण करणारा राजा विष्णूचा चौथा अंश असून त्याला बहुमान प्राप्त होतो! हे राघवा, तूं वनांत असलास, तरी आमचा राजा असल्यामुळें तुला आमचें रक्षण केलें पाहिजे!" ती रात्र रामानें तेथेंच काढली.

दुसऱ्या दिवशीं पहांटे राम, लक्ष्मण व सीता सर्व ऋषींचा निरोप घेऊन वनांत पुढें जाण्यास निघालीं. नाना प्रकारचीं हरिणें, अस्वलें व वाघ असलेल्या त्या वनांत रामानें पर्वतासारखा धिप्पाड राक्षस अवलोकन केला. त्यानें वाघाचें कातडें परिधान केलेलें असून त्याचें अंग चरबी व रक्त यांनीं भरलेलें होतें! त्यानें आपल्या शूलावर कांहीं मारलेले प्राणी अडकवून ठेवले होते! या त्रिवर्गास पाहतांच तो त्यांच्यावर धांवून आला व सीतेला धरून तिला घेऊन लांब पळत गेला. तेथून तो म्हणाला, "अरे, एका स्त्रीसह भीषण दंडकारण्यांत राहणारे तुम्ही कोण? मी विराध नामक राक्षस असून ऋषींचें मांस भक्षण करीत असतों! आतां ही स्त्री माझी भार्या होईल व मी तुम्हां दोघांचें रक्त प्राशन करतों!" विराधाच्या मांडीवर

भीतीनें अस्ताव्यस्त पडलेल्या सीतेस पाहून राम म्हणाला, "हे लक्ष्मणा, पित्याचा मृत्यु किंवा राज्यत्याग यांच्यापेक्षांहि सीतेला दुसऱ्यानें स्पर्श केलेला पाहून मला अधिक दुःख होतें!" विराध पुनः म्हणाला, "अरे, तुम्ही कोण आहांत व कोठें जाणार, हें मला सांगा." रामानें त्याला थोडक्यांत आपलें नांवगांव सांगितलें व तो म्हणाला, "हे अधमा, परस्त्रीला स्पर्श करणारा तूं आतां जीवंत राहूं शकत नाहींस!" असें म्हणून रामानें विराधावर तीव्र सात बाण सोडले. सीतेला खालीं ठेवून व हातांत शूल घेऊन तो राक्षस राम-लक्ष्मणांवर धांवून गेला. त्यानें आपला शूल रामावर फेंकला असतां तो रामानें तोडून टाकला! इतक्यांत विराधानें राम-लक्ष्मणांस धरून खांद्यावर टाकलें व भयंकर गर्जना करीत तो गहन वनाकडे जाऊं लागला. हें पाहून सीता हात वर करून मोठ्यानें आक्रोश करूं लागली! तेव्हां राम-लक्ष्मणांनीं त्वरा करून त्याचे दोन्ही हात तोडले व त्याला लाथाबुक्यांनीं ते मारूं लागले. तरीहि तो मरत नाहीं, असें पाहून रामानें लक्ष्मणास त्याला पुरण्यासाठीं एक मोठा खड्डा खणण्यास सांगितलें. लक्ष्मण खड्डा खणत असतां राम विराधाच्या मानेवर पाय देऊन उभा राहिला. तेव्हां विराध रामास नम्रपणें म्हणाला, "हे रामा, मी तुंबुरु नांवाचा गंधर्व असून कुबेराच्या शापानें मला राक्षस जन्म प्राप्त झाला! मी उःशाप देण्याची प्रार्थना केली असतां 'रामाकडून वध झाल्यावर तूं पुनः गंधर्व होशील,' असा कुबेरानें मला उःशाप दिला!" मग विराधास खड्ड्यांत पुरून रामलक्ष्मणांनीं तेथून शरभंग मुनींच्या आश्रमाकडे प्रयाण केलें.

## १. शरभंग ऋषींच्या आश्रमांत

शरभंग ऋषींच्या आश्रमांत येतांच तेथें रामानें एक अद्भुत चमत्कार अवलोकन केला. अधांतरीं चालणाऱ्या रथांत बसलेला देवराज इंद्र रामानें तेथें अवलोकन केला! त्याच्यावर चंद्रमंडलाच्या प्रभेसारखें दिव्य छत्र असून सुंदर स्त्रिया चामरें वारीत होत्या! देव, गंधर्व वगैरे त्याची स्तुति करीत होते! शरभंग ऋषींशीं बोलणाऱ्या इंद्राला रामानें ओळखलें, पण रामाशीं भेटण्याचा प्रसंग पुढें आहे, असें म्हणून इंद्रानें स्वर्गलोकीं प्रयाण केलें. लक्ष्मण व सीता यांसह रामानें शरभंगऋषीं-जवळ जाऊन त्यांना वंदन केलें. ऋषींनीं त्यांना भोजन घातलें व ते म्हणाले, "हे रामा, तपानें प्राप्त केलेल्या ब्रह्मलोकास मला नेण्यासाठीं इंद्र आला होता.

मी कात टाकणाऱ्या सर्पाप्रमाणें माझ्या गात्रांचा त्याग करणार आहें ! " असें म्हणून शरभंगऋषींनीं रामानें विचारल्यावरून आश्रम बांधण्यास योग्य अशी जागा त्याला सांगितली. मग त्यांनीं अग्नींत प्रवेश करून जीर्ण शरीराचा त्याग केला व नवीन शरीर धारण करून ब्रह्मलोकीं प्रयाण केलें! त्याचठिकाणीं रामास अनेक प्रकारची उग्र तपस्या करणारे ऋषिमुनि भेटले. ते म्हणाले, " पंपा व मंदाकिनी नद्यांच्या कांठच्या, तसेंच, चित्रकूट पर्वतावरच्या ऋषींची राक्षसांनीं भयंकर कत्तल चालविली आहे ! हे रामा, त्यांच्यापासून आमचें रक्षण कर ! " त्या सर्वांस अभय देऊन राम, सीता व लक्ष्मणांसह पुढें निघाला.

## ३. पंचवटीच्या मार्गावर

पुष्कळ नद्या ओलांडल्यावर एक पर्वत त्यांच्या दृष्टीस पडला. तेथील दाट वनांत झाडांवर वल्कलें टांगलेलीं त्यांनीं पाहिलीं. तेथें सुतीक्ष्ण मुनींचा आश्रम असून ते तेथें पद्मासनावर विराजमान झालेले होते. त्रिवर्गानें ऋषींना प्रणाम केल्यावर ऋषींनीं रामास आलिंगन देऊन त्याचा उत्तम सत्कार केला. सायंकाळ झाल्यामुळें राम-लक्ष्मणांनीं संध्यावंदन केलें आणि सीतेसह रात्रीं तेथेंच मुक्काम केला. पहाटे स्नानसंध्या आटोपून त्या तिघांनीं सुतीक्ष्ण मुनींचा निरोप घेतला आणि तीं तिघें पुढील मार्ग आक्रमण करूं लागलीं.

जातां जातां सीता रामास मधुर स्वरांत म्हणाली, " हे राघवा, असत्य भाषण, परस्त्रीगमन व वैरावांचून क्रौर्य हीं तीन मुख्य पातकें आहेत. पहिल्या दोन पातकांचा आपणांस चुकूनहि स्पर्श होत नाहीं ! परंतु ऋषींच्या रक्षणासाठीं राक्षसांस मारण्याची आपण जी प्रतिज्ञा केली आहे, तिच्यामुळें आपणांस तिसरें पातक मात्र लागणार आहे ! आपण शस्त्रें बाळगीत असल्यामुळें राक्षसांस मारण्याची क्रूर बुद्धि आपणांस निश्चित होणार आहे ! तेव्हां ही बुद्धि आपण सोडून द्या ! " यावर राम म्हणाला, " हे देवी, माझ्यावरील प्रेमामुळें तूं असें बोलत आहेस, हें मी जाणतों. परंतु द्विजऋषींना रक्षण करण्याचें दिलेलें वचन मी मोडूं शकत नाहीं ! " याप्रमाणें बोलत असतां त्यांना अनेक नद्या व पर्वत लागले. पुष्कळ दूर गेल्यावर रामाला चार योजनें पसरलेलें एक सरोवर दिसलें. मांडकर्णी ऋषींनें तपानें निर्माण केलेलें हें ' पंचाप्सर ' सरोवर होतें. त्या सरोवराच्या परिसरांत ऋषींचे अनेक

*

आश्रम होते. रमणीय स्थान व श्रेष्ठ ऋषींचा सहवास ध्यानांत घेऊन रामानें लक्ष्मण व सीता यांसह त्या आश्रम समुदायांत दहा वर्षांचा काल व्यतीत केला. कोणा ऋषीच्या आश्रमांत दहा महिने, कोणाच्या आश्रमांत सहा किंवा पांच महिने, अशा प्रकारें त्यांनीं हीं दहा वर्षें सुखांत काढिलीं. मग तीं तिघें पुनः सुतीक्ष्ण ऋषींच्या आश्रमास आलीं. ऋषींनीं त्या सर्वांचें उत्तम आतिथ्य केलें आणि त्यांनीं कांहीं दिवस तेथें वास केला. एक दिवशीं राम सुतीक्ष्ण ऋषींस म्हणाला, "हे भगवन्, अगस्त्य मुनि या अरण्यांतच राहत असल्याचें मीं अनेक ऋषींकडून ऐकिलें आहे. कृपाकरून त्यांचा आश्रम कोठें आहे, हें आपण मला सांगा." सुतीक्ष्ण म्हणाले, "हे रामा, येथून तूं चार योजनें दक्षिणेस जा, म्हणजे तुला अगस्त्यमुनींच्या भ्रात्याचा आश्रम लागेल. तेथून दक्षिणेस एक योजन गेल्यावर तुला खुद्द अगस्त्यांचा आश्रम दिसून येईल." नंतर राम, लक्ष्मण व सीता सुतीक्ष्णऋषींचा निरोप घेऊन निघालीं. चार योजनें गेल्यानंतर त्यांना पिप्पली वृक्षांचा तीक्ष्ण गंध येत असलेलें अरण्य लागलें. आश्रमांतील अग्निधूमावरून तोच अगस्त्य मुनींच्या भ्रात्याचा आश्रम असावा, असें रामास वाटलें. संध्याकाळच्या सुमारास तीं तिघें आश्रमांत जाऊन पोंचलीं. त्यांनीं अगस्त्यांच्या भ्रात्यांस वंदन करून त्या रात्रीं तेथें मुक्काम केला. रात्र संपून दिवस उगवल्यावर ऋषींचा निरोप घेऊन तीं अगस्त्यमुनींच्या आश्रमाकडे जाण्यास निघालीं.

जातांना त्यांना जलकदंब, फणस, साल, अशोक, तिवस, करंज, मोहा व टेंभुरणी हीं झाडें लागलीं. हत्तींच्या सोंडांनीं मुरगाळलेलीं, वानरें बसलेलीं व पक्षी किलबिल करीत असलेलीं अशीं अनेक झाडें त्यांत त्यांना दिसलीं. त्या वनांत ऋषींच्या आश्रमाचा विपुल धूर दिसत असून ठिकठिकाणीं वृक्षांवर वल्कलें टांगलेलीं दिसत होतीं. अगस्त्यांच्या प्रभावामुळें हिंस्र पशु तेथें वैरभाव विसरून राहत होते. मेरु पर्वताशीं स्पर्धा करून सूर्यपथ अडवूं पाहणारा विंध्य पर्वत ज्यांच्या आज्ञेनें ठेंगणा झाला होता, त्या अगस्त्यमुनींच्या पवित्र आश्रमास सीता लक्ष्मणांसह राम येऊन पोंचला. अगस्त्यांना पाहतांच त्या तिघांनीं त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवलें आणि त्यांनींहि उलट उदक व आसन देऊन त्यांचा सत्कार केला. भोजन वगैरे झाल्यानंतर अगस्त्यमुनींनीं संतुष्ट होऊन रामास वैष्णव धनुष्य,

ब्रह्मदत्त बाण व खड्ग हीं स्वतःस इंद्राकडून मिळालेलीं आयुधें अर्पण केलीं. अगस्त्यांनीं सीतेची तिच्या पतिप्रेमाबद्दल फार प्रशंसा केली. मग राम हात जोडून त्यांना म्हणाला, " मला आनंदानें राहतां येईल असा, विपुल उदक व वृक्ष असलेला प्रदेश आपण सांगावा. " तेव्हां क्षणभर विचार करून तेथून दोन योजनें असलेला गोदावरी नदीच्या कांठचा ' पंचवटी ' नांवाचा प्रदेश अगस्त्यांनीं रामास सांगितला. नंतर त्यांचा निरोप घेऊन त्या तिघांनीं पंचवटीकडे प्रयाण केलें.

## ४ पंचवटींत

पंचवटीस जातांना रामास एक धिप्पाड व पराक्रमी गृध्र पक्षी आढळला. त्यास राक्षस समजून राम-लक्ष्मणांनीं " तूं कोण आहेस ? " असा प्रश्न केला. तेव्हां सौम्य वाणीनें तो रामास म्हणाला, " हे वत्सा, मी तुझ्या पित्याचा मित्र आहें. " हें ऐकल्यावर रामानें त्याचा बहुमान केला व त्याची माहिती विचारली. गृध्र म्हणाला, " हे रामा, माझा कुल-वृत्तांत ऐक. कश्यप प्रजापतीची मुलगी शुकी व शुकीची नात विनता. विनतेच्या अरुण नामक पुत्राचे माझा वडील भाऊ संपाति व मी जटायु असे आम्ही दोन मुलगे. तुझी इच्छा असल्यास तुझ्या निवासस्थानीं मी राहीन आणि तूं व लक्ष्मण बाहेर गेल्यावर सीतेचें रक्षण करीन ! " जटायूचें हें म्हणणें रामानें मान्य केलें. त्याला घेऊन राम सर्वांसह पंचवटीचा मार्ग आक्रमण करूं लागला. पंचवटीला पोंचल्यावर तें रमणीय स्थान असल्याचें पाहून लक्ष्मणानें एक पर्णशाला तयार केली. खांब लावलेल्या मातीच्या भिंतींवर लांब वेळू ठोकून त्यांवर शमीच्या फांद्या अंथरल्या. गवत व पानें यांचें त्याला छप्पर केलें. असें तें रम्य निवासस्थान पाहून रामानें लक्ष्मणास प्रेमानें आलिंगन दिलें.

पावसाळा संपून हिंवाळा लागला असतां राम गोदावरीवर सकाळीं स्नानास निघाला. लक्ष्मण कलश घेऊन सीतेसह त्याच्या मागून चालला होता. लक्ष्मण रामास म्हणाला, " थंडीमुळें उदक उपयोग करण्यास अयोग्य झालें असून अग्नि प्रिय वाटूं लागला आहे. सूर्य दक्षिणेस झुकल्यानें उत्तर दिशा तिलकविहीन स्त्रीप्रमाणें निस्तेज दिसत आहे ! दुपारीं सुद्धां सूर्याचें ऊन सुखदायक वाटत आहे. दंव फार पडत असून थंडीनें झाडांचीं पानें झडलीं आहेत. सूर्य पुष्य नक्षत्रावर मावळत आहे. हिमकणांमुळें पांढुरकें दिसणारें चंद्रमंडल फुंकर मारलेल्या आरशाप्रमाणें मलिन

दिसत आहे. पश्चिम वायु प्रातःकालीं अतिशय गार वाटत आहे. अतिशय तहान लागलेला रानहत्ती प्रथम पाण्याला आपली सोंड लावतो, पण तें गार लागतांच ती एकदम आंखडून घेतो! बर्फ पडत असल्यानें पर्वतांवरील उदक पान्यासारखें जड झालें आहे. अशा वेळीं भरत स्नानासाठीं सरयू नदीवर गेला असेल. परंतु त्या कोमल भरतास थंड पाण्यांत कसें स्नान करवतअसेल बरें? " भरताच्या आठवणी-नें राम व लक्ष्मण दोघेहि शोकाकुल झाले.

## ५. शूर्पणखेचें नासिकाच्छेदन

स्नान आटोपून पर्णकुटीस परत आलेले राम–लक्ष्मण बोलत बसले असतां रावणाची बहिण शूर्पणखा तेथें आली. अकाळविकाळ स्वरूपाची ती राक्षसी मनोहर रूप असलेल्या रामास पाहून मोहित झाली व तिनें त्याला " तूं कोण?" असें विचारलें. रामानें तिला आपली माहिती सांगून तिचीहि माहिती विचारली. तिनें स्वतःविषयीं सर्व वृत्तांत सांगितला. मग ती म्हणाली, "हे रामा, तूं माझा चिरकाल पति हो! सीता कुरूप, दुराचारिणी, अकाळविकाळ व पोट अतिशय खपाटीस गेलेली अशी आहे! तेव्हां तिला व तुझा भ्राता लक्ष्मण याला मी खाऊन टाकतें!" हें ऐकून राम हसूं लागला व तिला थट्टेनें म्हणाला, " बाई, माझें लग्न झालें असून ही सीता माझी प्रिय भार्या आहे. हा माझा भ्राता लक्ष्मण मात्र अविवाहित आहे! तो तरुण व सुंदर असल्यामुळें तुझ्या रूपाला शोभेसा आहे! तरी तूं त्याच्याशीं विवाह कर." हें ऐकून शूर्पणखा रामास सोडून लक्ष्मणाकडे धांवली! लक्ष्मण हंसत हंसत तिला म्हणाला, " मी रामाचा दास असल्यानें माझी भार्या होऊन तूं दासी कशाला बनतेस? तूं रामाचीच कनिष्ठ भार्या होऊन रहा! कुरूप, ओबडधोबड, खोल पोटाच्या, दुराचरणी व वृद्ध अशा सीतेचा त्याग करून तो तुझा अवश्य स्वीकार करील!" हें बोलणें खरें वाटून शूर्पणखा सीतेवर धांवून गेली! रोहिणी नक्षत्रावर धांव घेणारी प्रचंड उल्काच कीं काय, अशी ती तेव्हां भासली! हें पाहून राम रागानें लक्ष्मणास म्हणाला, " क्रूर व दुष्ट लोकांशीं कधींहि थट्टा करूं नये! हिला तूं विरूप करून टाक!" त्याबरोबर लक्ष्मणानें तरवारीनें शूर्पणखेचें नाक व कान छाटून टाकले. तेव्हां ती भेसूर ओरडत वनांत पळत सुटली.

## ६. खराचा ससैन्य नाश

आपला भाऊ खर याच्यासमोर जाऊन ती धाडकन् खालीं पडली असतां तो तिला म्हणाला, " तुझी ही स्थिति कोणी केली ? विषदंत अशा निरपराधी कृष्ण-सर्पास कोणी डिवचलें ? काय प्रकार झाला, तो सर्व मला सांग ! " शूर्पणखा डोळ्यांत पाणी आणून खरास म्हणाली, " जटावेषधारी रामलक्ष्मणांनीं माझी अशी दशा केली ! त्यांना सत्वर मारून त्यांचें रक्त पिण्याची माझी इच्छा तूं पूर्ण कर ! " खर राक्षसानें तात्काळ आपल्या बलाढ्य अशा चौदा राक्षसांना रामावर चालून जाण्याची आज्ञा केली. त्यांच्याबरोबर शूर्पणखेनें जाऊन त्यांना राम, लक्ष्मण व सीता हीं दाखविलीं. त्या चौदा राक्षसांना पाहतांच राम धनुष्यबाण घेऊन सज्ज झाला. राक्षसांनीं रामावर शूल फेंकला, तो रामानें बाणानें तोडला ! मग चौदा तेजस्वी नाराच बाण त्या चौदाहि राक्षसांवर सोडून रामानें त्यांना यमसदनास पाठविलें ! हें पाहून नाक व कान कापल्यामुळें जिच्या शरीरावरील वाळलेलें रक्त डिंकानें भरले-ल्या वेलीप्रमाणें दिसत आहे, अशी ती शूर्पणखा खराकडे धांवत गेली व तिनें त्याला झालेला सर्व वृत्तांत निवेदन केला. खराला ती म्हणाली, " आजच्या आज तूं रामाचा वध न केल्यास मी तुझ्यापुढें प्राण देईन ! " असें म्हणून मोठ्यानें आक्रोश करीत ती आपलें विशाल उदर हातांनीं बडवून घेऊं लागली !

मग खरानें आपला भाऊ व सेनापति दूषण यास चौदा हजार राक्षसांची सेना सज्ज करून आणण्यास सांगितलें. घंटांनीं युक्त अशा सुवर्णाच्या रथांत बसून स्वतः खर त्या सैन्यासह रामावर चालून गेला. त्यावेळीं सर्वत्र अपशकून दिसूं लागले. पेटलेलें कोलीत गरगरा फिरविलें असतां जसें अग्निवर्तुल दिसूं लागतें, त्याप्रमाणें सूर्याभोंवतीं खळें दिसूं लागलें ! खराच्या रथावरील सुवर्णदंडाच्या ध्वजावर भयानक गिधाड येऊन बसलें ! भेसूर रीतीनें ओरडणाऱ्या कोल्ह्यांच्या तोंडांतून ज्वाला निघूं लागल्या ! त्या प्रचंड सैन्यास पाहून " खरासमोर एकटा राम कसा टिकाव धर-णार ? " असें अंतरिक्षांत जमलेले देव, गंधर्व वगैरे म्हणूं लागले ! प्रसंग जाणून रामानें सीतेला घेऊन दुर्गम गुहेंत दडून बसण्यास लक्ष्मणास सांगितलें आणि तो स्वतः एकटा त्या सैन्यास तोंड देण्यासाठीं सज्ज झाला. खरानें सारथ्यास रामावर रथ नेण्यास सांगितलें. खर व इतर राक्षस यांनीं रामावर अनेक प्रकारच्या आयु-

धांचा वर्षाव केला. रामानेंहि कंकपत्र लावलेले कालपाशासारखे तीव्र बाण सोडून राक्षससैन्याचा संहार चालविला! हें पाहून दूषण रामावर चवताळून गेला. परंतु रामानें त्याचे हात तोडून त्याला यमसदनास पाठविलें! युद्धभूमीवर मेलेल्या राक्षसांच्या रक्तमांसाचा चिखल झाला. त्यांत मिसळलेले त्यांचे केस वेदीला आच्छादणाऱ्या दर्भांप्रमाणें दिसूं लागले! चौदा हजार सैन्यापैकीं खर व सेनापति त्रिशिर यांच्याशिवाय कोणीच जिवंत राहिलें नाहीं! तेव्हां त्रिशिर देदीप्यमान रथावर बसून रामावर चवताळून गेला. परंतु प्रथम त्याचा सारथी व घोडे मारून नंतर रामानें त्याचें मस्तकहि उडवून दिलें! शेवटीं उरलेला खर रामावर तुटून पडला. खराच्या बाणांनीं रामाचें सर्वांग रक्तानें भरून गेलें. रामानें खराचे घोडे व सारथी मारून त्यास विरथ केले असतां तो गदा घेऊन रामावर धांवला. त्यानें ती गदा रामावर फेंकतांच रामानें तिचे वरच्यावर तुकडे तुकडे केले! अखेर इंद्रानें दिलेला ब्रह्मदंडासारखा बाण खरावर सोडून रामानें त्याचा वध केला! त्यावेळीं देवादिकांनीं दुंदभि वाजवून रामावर पुष्पवृष्टि केली.

चौदा हजार राक्षसांना एकट्या रामानें नष्ट केलेलें पाहून शूर्पणखा रडत ओरडत लंकेला आपला बंधु रावण याच्याकडे गेली! त्यावेळीं रावण अमात्यासमवेत बसलेला होता. वीस हात व दहा तोंडें असलेल्या रावणाच्या शरीरावर पूर्वीच्या युद्धांतील जखमांचे अनेक व्रण दिसत होते. इंद्राच्या ऐरावताच्या सुळ्यांचे व्रण त्याच्या वक्षःस्थलावर शोभत होते. वैडूर्य मण्यासारख्या त्याच्या श्यामवर्ण देहावर सर्व राजचिन्हें विलसत होतीं. अशा त्या रावणापुढें उभी राहून शूर्पणखा त्याला निष्ठुरपणें म्हणाली, "भोगासक्त झाल्यामुळें तुला स्वतःस प्राप्त झालेलें भय अजून ठाऊक नाहीं! राजेलोक हेररूपी चक्षूंनीं दूरच्या गोष्टी जाणतात, म्हणून त्यांना 'दीर्घचक्षु' म्हणतात. अरे, एकट्या रामानें चौदा हजार राक्षसांचा वध केला असतांहि तुला त्या गोष्टीची बातमी कशी नाहीं?" शूर्पणखेचें हें कठोर भाषण ऐकून रावण तिला म्हणाला, "हा राम कोण? याचें सामर्थ्य किती आहे? हें सर्व मला नीट सांग!" तेव्हां शूर्पणखेनें रावणास सर्व हकीकत निवेदन केली. नंतर ती म्हणाली, "त्या रामाची प्रिय पत्नी सीता लक्ष्मीसारखी असून ती तुलाच भार्या म्हणून योग्य आहे! तेव्हां ती मिळविण्याची जर तुला इच्छा असेल, तर तूं सत्वर

कांहीं तरी तजवीज कर ! ”

शूर्पणखेचें हें भाषण ऐकून रावणानें सचिवांना निरोप दिला व तो सभेंतून बाहेर पडला.

## ७. मायामृग

रावणानें आपल्या सारथ्यास गुप्तपणें रथ जोडण्याची आज्ञा केली. पिशाच्याप्रमाणें तोंडें असलेलीं गाढवें ज्याला जोडलीं आहेत, अशा सुवर्णमय रथावर आरूढ होऊन दशग्रीव रावण मारीचाच्या आश्रमाकडे जाण्यास निघाला. कृष्णवर्ण रावण रत्नखचित सुवर्णरथांत बसला असतां विद्युल्लता व बलाकमाला यांनीं युक्त अशा कृष्णमेघाप्रमाणें दिसूं लागला. समुद्रतीरावर येऊन पोंचल्यावर त्याला तो प्रदेश सरोवरें व वृक्ष यांनीं विभूषित असलेला असा दिसला. तेथें ऋषींचे आश्रम होते. ज्याच्या शाखा शंभर शंभर योजनें लांब गेल्या आहेत, असा प्रचंड ‘ सुभद्र ’ नामक वटवृक्ष रावणानें अवलोकन केला. समुद्राच्या पलीकडील तीरावर गेल्यानंतर रावणास मारीचाचा आश्रम लागला. त्यांत मारीच राक्षस जटामंडल धारण करून वास करीत होता. रावणास पाहतांच त्यानें सर्व भोग्य वस्तूंनीं त्याचा सत्कार केला व तो त्यास म्हणाला, “ हे राक्षसाधिपते, लंकेंत तुझें सर्व कुशल आहे ना ? येथें तुझें आगमन कोणत्या हेतूनें झालें ? ” यावर रावण म्हणाला, “ हे मारीचा, ऐक. जनस्थानांत ऋषिमुनींना पीडा देण्यासाठीं खराबरोबर मीं ठेवलेलें चौदा हजार राक्षसांचें सैन्य एकट्या रामानें ठार केलें ! त्याची बायको सीता मी हरण करून नेणार आहें ! तेव्हां तुझी मदत मला दे. तूं महामायावी असल्यामुळें मृगरूप धारण कर. म्हणजे राम–लक्ष्मण त्याला धरण्यास बाहेर जातील आणि मग मी चंद्रप्रभा हरण करणाऱ्या राहूप्रमाणें सीतेचें हरण करीन ! ” हें ऐकून मारीच म्हणाला, “ प्रिय भाषण करणारे हवे तेवढे मिळतात, पण अप्रिय व हितकर भाषण करणारा वक्ता व ऐकणारा श्रोता मात्र दुर्लभ आहे ! तुझ्याजवळ हेर नसल्यामुळें रामाची बित्तंबातमी तुला नाहीं. तूं सीतेला हरण केल्यास महापराक्रमी राम तुझ्यासह सर्व लंकेचा नाश केल्यावांचून राहणार नाहीं ! रामाचा पराक्रम स्वतः मींच पाहिला आहे ! कांहीं काळापूर्वी मी ऋषिमुनींना भक्षण करीत संचार करीत असतां विश्वामित्रानें बालरामास मदतीस आणलें. त्यानें तीक्ष्ण बाणांनीं मला समुद्रांत

शंभर योजनें दूर फेंकून दिलें! माझा वध करण्याची त्याची इच्छा नसल्यामुळेंच केवळ मी त्याच्या हातून तेव्हां बचावलों ! समुद्रांत पडल्यावर शुद्धीवर आल्यानंतर मी कसाबसा लंकेस परत आलों ! परंतु रामाचा हा पराक्रम विसरून दंडकारण्यांत मी तपस्वी जनांचें रक्त प्राशन करीत संचार करीत राहिलों ! तेव्हां रामाशीं माझी गांठ पडून त्याचे तीक्ष्ण बाण असह्य झाल्यामुळें तेथून पळालों व आतां येथें तपश्चर्या करीत राहिलों आहें! अशा त्या रामाची माझ्यापाशीं तूं गोष्ट काढूं नकोस ! " परंतु मरणाऱ्या माणसाला औषध घेण्याची जशी इच्छा होत नाहीं, त्याप्रमाणें रावणास मारीचाचा उपदेश आवडला नाहीं ! तो क्रुद्ध होऊन मारीचास म्हणाला, " हे कुलहीना, तुझें भाषण व्यर्थ आहे ! रामाला भिऊन मृत्यु टाळण्यासाठीं तूं त्याच्यापुढें मृगरूपानें जाण्यास धजत नाहींस ! परंतु माझी अवज्ञा केल्यास मी तुला आजच ठार करतों ! म्हणून मी सांगतों तें तूं ऐक. सुवर्णमृग होऊन तूं सीतेच्या दृष्टीस पड. राम तुला धरण्यास आला असतां झुकांडी देऊन त्याला दूर ने आणि त्याच्याच स्वरासारखा स्वर काढून ' हा सीते ! हा लक्ष्मणा ! ' अशी तूं हांक मार ! म्हणजे, लक्ष्मण त्याच्या सहाय्यास धांवून जाईल व सीता आश्रमांत एकटी राहील ! मग मी तिचें सहज हरण करतों ! " रावणाचें हें भाषण ऐकूनहि मारीच त्याची निर्भर्त्सनाच करूं लागला ! परंतु अखेर त्याच्या धाकामुळें " ठीक आहे, तुझ्या म्हणण्याप्रमाणें होऊं दे ! " असें मारीच रावणास म्हणाला. तेव्हां रावणानें हर्षानें त्यास कडकडून आलिंगन दिलें.

नंतर रावणाच्या रथांत बसून ते दोघे रामाच्या आश्रमाकडे जाण्यास निघाले. विमानाप्रमाणें आकाशांतून जाणारा रावणाचा अद्भुत रथ लौकरच रामाच्या आश्रमाजवळ पोंचला. रथांतून खालीं उतरून मारीचाचा हात धरून रावण म्हणाला, " केळीच्या झाडांनीं वेष्टिलेला हाच रामाचा आश्रम दिसत आहे ! " हें ऐकून लगेच मारीच मृगरूप धारण करून त्या आश्रमाच्या दारांत संचार करूं लागला ! त्या हरणाचीं शिंगें रत्नांचीं असून मुख कोठें शुभ्र व कोठें कृष्ण असें होतें. त्याच्या शरीराचा वर्ण कमलपरागासारखा व खुरांचा वर्ण वैडूर्य मण्यासारखा असून त्याचें पुच्छ इंद्र धनुष्यासारखें रंगीबेरंगी होतें. शेंकडों रौप्यबिंदु त्याच्या शरीरावर दिसत होते. तो सुवर्णमृग मध्येंच जमिनीवरील गवत खाई, मध्येंच झाडाचीं पानें भक्षण



मायावी सुवर्ण मृग

करी, मध्येंच पुढें पळून मागें परते आणि मध्येंच उड्या मारून इतर हरिणांच्या कळपांत मिसळून जाई ! ते इतर हरीण त्याला पाहून त्याच्या जवळ येत व त्याचा वास घेऊन हा खरा हरीण नव्हे, अशा जाणिवेनें लांब पळून जात ! याप्रमाणें क्रीडा करणाऱ्या मायामृगास सीतेनें पाहिलें व ती तात्काल मोहित झाली ! तिनें फुलें तोडण्याचें थांबविलें व ती रामास घाईघाईनें " हे आर्यपुत्र, कनिष्ट भ्रात्या-सह सत्वर इकडे या ! " अशा हांका मारूं लागली. ते दोघे आल्यावर सीता म्हणाली, " हे आर्यपुत्र, हा सुंदर मृग माझें मन ओढून घेत आहे ! त्याला आपण धरून आणा, म्हणजे तो माझी करमणूक करील. असा अद्भुत मृग मी पूर्वी कधींच पाहिला नव्हता ! काय हें याचें अलौकिक रूप ! काय हें तेज व काय हा उत्कृष्ट शब्द ! हा मृग जीवंत हातीं लागल्यास अयोध्येला अंतःपुरास शोभा आणील आणि त्याचा वध करावा लागल्यास त्याच्या सुवर्णमय कातड्यावर मी तुमच्यासह बसेन ! " तो मृग पाहून रामाचेंहि मन मोहित झालें. परंतु लक्ष्मण म्हणाला, " हा मृगरूप घेतलेला बहुधा मारीच राक्षस असावा, असें मला वाटतें ! या हरणासारखा रत्नखचित हरीण पृथ्वीवर कोठेंच नाहीं ! तेव्हां ही निःसंशय त्या राक्षसाची माया असली पाहिजे ! " राम म्हणाला, " हे लक्ष्मणा, सीतेला हा मृग मिळविण्याची अनावर इच्छा झाली असल्यामुळें ती पुरी करण्यासाठीं तो आपण प्राप्त केला पाहिजे ! हा मृग व आकाशांतील मृगनक्षत्र हे दोनच दिव्य मृग मला विश्वांत दिसतात ! हे लक्ष्मणा, ही जरी राक्षसाची माया असली तरी या मृगाचा वध करणें माझें कर्तव्यच आहे ! म्हणून हा मृग मी जीवंत धरून आणतों, किंवा मारून तरी घेऊन येतों ! तूं सीतेचा सांभाळ कर. " असें म्हणून राम सोन्याच्या मुठीची तरवार, तीन ठिकाणीं बांक असलेलें धनुष्य व दोन भाते घेऊन सुवर्णमृगामागें त्वरेनें निघाला.

रामास पाहून तो मायामृग मध्येंच दिसूं लागे, तर मध्येंच अदृश्य होई ! राम त्याच्या मागें धांवला असतां तो उडी मारून टप्प्यांतून गेल्यासारखा दिसे ! क्वचित् तो रामाच्या जवळ येऊन आपल्या दिव्यरूपामुळें त्याला मोहित करी ! आकाशांत ढग विखुरले असतां त्यांच्या पलीकडे असणारें चंद्रबिंब जसें मध्येंच दिसतें व मध्येंच दिसत नाहीं, त्याप्रमाणें, तो मायामृग रामास हुलकावण्या देऊं

लागला ! अशा प्रकारें मृगरूप मारीचानें रामास आश्रमापासून पुष्कळ दूर नेलें. तेव्हां राम थकून एका झाडाखालीं गवतावर बसला. इतक्यांत तो मृग त्याच्या समोरून उड्या घेत पळूं लागला. रामाच्या भीतीनें तो क्षणांत झाडींत दडून राही, तर क्षणांत झाडींतून बाहेर येई. नंतर क्रुद्ध झालेल्या रामानें सर्पासारखा ब्रह्मदत्त बाण ब्रह्मास्त्राचें अभिमंत्रण करून मृगावर सोडला तोंच तो मृगरूप मारीच ताडभर उंच उडी मारून धाडकन् खालीं पडला ! मरतां मरतां त्यानें हरणाचें रूप सोडून दिलें व तो आपल्या खऱ्या स्वरूपांत प्रकट झाला. रामासारखा स्वर काढून हांका मारण्याची रावणाची सूचना त्याला लगेच आठवली, आणि त्यानें रामासारखा स्वर काढून "हा सीते ! हा लक्ष्मणा !" असे शब्द काढले ! नंतर तो निधन पावला ! त्या राक्षसाची ही माया पाहून रामाला लक्ष्मणाच्या बोलण्याची आठवण झाली ! या दुष्ट राक्षसाची ही आर्त हांक ऐकून लक्ष्मण व सीता यांची काय अवस्था होईल, हा विचार रामाच्या मनांत आला आणि त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला ! नंतर रामानें दुसरा एक मृग मारला व त्याचें मांस घेऊन जनस्थानाकडे झपाट्यानें निघाला.

## ८. सीतेचीं दुरुत्तरें

इकडे रामाचा शब्द ऐकून सीता लक्ष्मणास म्हणाली, "जा व रामाची काय खबर आहे, ती पहा. त्याचा शब्द ऐकून माझें मन अस्वस्थ झालें आहे !" परंतु सीतेला एकटें न सोडण्याची रामाची आज्ञा आठवून लक्ष्मण तिच्या सांगण्याप्रमाणें रामाकडे जाण्यास निघाला नाहीं ! हें पाहून सीता रागानें म्हणाली, "हे लक्ष्मणा, मित्र वाटणारा तूं आपल्या भ्रात्याचा शत्रु आहेस ! राम नाश पावण्याची तुझी इच्छा असून तूं माझ्याविषयीं अभिलाषा धरीत आहेस !" असें म्हणून ती शोक करूं लागली. तेव्हां लक्ष्मण म्हणाला, "हे वैदेही, रामास कोणीही अपाय करूं शकत नाहीं. हा स्वर निःसंशय रामाचा नसून गंधर्व नगरासारखी ही त्या राक्षसाची माया आहे ! खर व इतर राक्षस यांचा वध केल्यामुळें सर्व राक्षस आपल्याशीं वैर करीत आहेत ! तेव्हां तुला एकटी टाकून मी जाऊं शकत नाहीं !" यावर सीता क्रुद्ध होऊन लक्ष्मणास मर्मभेदक शब्दांत म्हणाली, "हे कुलदूषका, भरताच्या सांगण्यावरून किंवा स्वतःच्याच इच्छेनें तूं रामाबरोबर वनांत आला

आहेस! तुझ्यासारख्या दुष्ट शत्रूच्या ठायीं पापबुद्धि असल्यास नवल नाहीं! अरे, नीलकमलासारख्या श्यामवर्ण रामास सोडून मी परपुरुषाची कशी बरें इच्छा करीन? रामावांचून मी क्षणभरहि जीवंत राहूं शकत नाहीं!" सीतेचें अंगावर कांटा आणणारें हें मर्मभेदक भाषण ऐकून जितेंद्रिय लक्ष्मण हात जोडून तिला म्हणाला, "तूं माझें दैवत असल्यामुळें तुला मी कटु उत्तर देऊं शकत नाहीं! स्त्रियांच्या क्रूर, चंपल व फूट पाडणाऱ्या स्वभावाप्रमाणेंच तूं भाषण केलें आहेस! तें मला सहन होत नाहीं! हे सर्व वनचर प्राणी माझें हें म्हणणें ऐकोत! स्त्रियांच्या दुष्ट स्वभावामुळें माझ्याविषयीं शंका घेणाऱ्या व विनाशकाल जवळ आलेल्या तुला धिःकार असो! जिकडे राम असेल, तिकडे मी जातों! वनदेवता तुझें रक्षण करोत! रामासह मी परत आल्यावर तूं दिसशील किंवा नाहीं, याचीच मला शंका आहे!" लक्ष्मणानें असें म्हटलें असतांहि सीता रडत रडत त्याला म्हणाली "रामाचा वियोग झाल्यास मी गोदावरींत उडी घेईन, कड्यावरून देह लोटून देईन किंवा अग्नींत प्रवेश करीन! परंतु पर पुरुषाला कदापि स्पर्श करणार नाहीं!" असें म्हणून ती दुःखानें उदर बडवून घेऊं लागली! लक्ष्मण तिचें सांत्वन करूं लागला असतां ती त्याच्याशीं शब्दहि बोलेना! तेव्हां मनानें तिला वंदन करून व नम्रतेनें तिच्याकडे पहात पहात लक्ष्मण रामाकडे निघून गेला!

## ९. सीताहरण

ही संधी साधून संन्याशाचा वेष घेतलेला रावण लगबगीनें सीतेजवळ आला त्यानें काषाय वस्त्रें परिधान केलीं असून तो शेंडी, छत्री व जोडा यांनीं युक्त होता. त्याच्या डाव्या खांद्यावर काठी व कमंडलु हीं लटकत होतीं. सूर्य-चंद्र नसतांना दिसणाऱ्या संध्येप्रमाणें सीता रावणास दिसली. त्यावेळीं वारा वाहण्याचें थांबला व जोरानें खळखळणारी गोदावरी नदी मंद मंद वाहूं लागली! चित्रा नक्षत्राकडे जाणाऱ्या शनीप्रमाणें रावण सीतेजवळ आला. यतिवेष घेतलेला तो दुष्ट राक्षस तेव्हां गवतानें झांकलेल्या कूपासारखा वाटला! पीतवस्त्र धारण केलेल्या पद्मलोचना सीतेस पाहून रावण मोहित झाला व तिला म्हणाला, "हे सुंदरी, तूं श्री, ऱ्ही, कीर्ति, लक्ष्मी, अप्सरा व रति यांपैकीं कोण आहेस? तूं येथें न राहतां माझ्या-



सीताहरण

बरोबर चल ! " सीतेनें रावणास आसन देऊन पाद्य अर्पण केलें व ' भोजन तयार आहे ' असें सांगितलें. तिनें रावणास थोडक्यांत आपला परिचयहि करून दिला. नंतर ती त्याला म्हणाली, " आतां आपण आपलें नांव, गोत्र व कुळ खरें खरें सांगा. " तेव्हां रावण निष्ठुरपणें म्हणाला, " हे सीते, ज्यानें सर्व त्रैलोक्य त्रास्त करून सोडलें आहे, तो राक्षसराज रावण मीच होय ! तुझ्याठिकाणीं माझें मन जडलें असल्यामुळें तूं माझी भार्या होऊन लंकेला चल ! " हें ऐकून सीता त्याचा धिःकार करून म्हणाली, " तूं कोल्हा सिंहिणीची हांव कशी धरतोस ? सूर्याशीं एकरूप असणाऱ्या सूर्यप्रभेसारख्या मला तूं स्पर्शहि करूं शकत नाहींस ! राम-भार्येवर हात टाकण्याची इच्छा करून तूं सूर्य-चंद्र हातांनीं ओढून आणण्याचा विचार करीत आहेस ! " ही निंदा ऐकून क्रुद्ध झालेला रावण म्हणाला, " मी कुबेराचा सावत्र भाऊ प्रतापी रावण आहें ! देव, गंधर्व वगैरे सर्व मला भिऊन पळतात ! प्रत्यक्ष कुबेराचा पराभव करून त्याचें पुष्पक विमान मीं हिसकून घेतलें आहे ! इंद्रादि देव मला पाहतांच पळत सुटतात ! दशरथानें वनांत हांकून दिलेल्या राज्यभ्रष्ट व शौर्यहीन रामाशीं तुला काय कर्तव्य आहे ? तूं आतां माझा अंगीकार कर ! " हें ऐकून सीता कठोर भाषण करूं लागली. " देवांना पूज्य असा कुबेराचा आपण भाऊ असल्याचें सांगून तूं हें पापकर्म कसें करतोस ? अरे, इंद्राची शची हरण करूनहि एखादा जीवंत राहूं शकेल, पण राम पत्नीला नेऊन कोणीहि जीवंत राहणें शक्य नाहीं ! "

यावर संतप्त झालेल्या रावणानें सौम्य रूप सोडून मृत्यूसारखें भयानक असें आपलें स्वतःचें रूप धारण केलें ! नंतर बुधानें ज्याप्रमाणें विषयवासनेमुळें आपल्या रोहिणी मातेला धरावें, त्याप्रमाणें दुष्ट रावणानें सीतेला धरलें ! डाव्या हातानें तिचे केस धरून उजवा हात मांड्यांखालीं घालून तिला त्यानें उचललें ! इतक्यांत त्याचा गाढवें जोडलेला रथ दिसूं लागला. रावणानें सीतेला धमकावून रथावर उचलून ठेवलें व तो आकाशमार्गानें तिला घेऊन निघाला ! अनावर आक्रोश करीत " हे राम ! हे राम " म्हणून सीता ओरडूं लागली ! ती मोठमोठ्यानें बोलूं लागली. " हे लक्ष्मणा, हा राक्षस मला नेत असल्याचें तुला कसें कळत नाहीं ? हे रामा, रावण अधर्मानें मला घेऊन जात आहे, इकडे तूं कसा पाहत

नाहींस ? हे रावणा, कालानें तुझी बुद्धि नाहींशी झाली असल्यानें तूं आपला जीवितनाश होण्याचें संकट स्वतःवर ओढवून घेतलें आहे ! हे वृक्ष हो, रावण सीतेला नेत असल्याचें तुम्ही रामाला सांगा ! हे वनदेवतांनों, राक्षसानें माझें हरण केल्याचें तुम्ही रामाला विदित करा ! " अशाप्रकारें ती मुक्तकंठानें विलाप करूं लागली !

इतक्यांत सीतेला वृक्षावर बसलेला जटायु दिसला. त्याला पाहून ती ओरडून म्हणाली, " हे सज्जन जटायो, हा क्रूर राक्षस मला अनाथाप्रमाणें नेत आहे, हें तूं राम-लक्ष्मणांना सांग. " निजलेल्या जटायूच्या कानीं हे शब्द जातांच तो जागृत झाला व सर्व परिस्थिति लक्ष्यांत घेऊन रावणास म्हणाला, " हे दशानना, परस्त्रीवर हात टाकणें तुला शोभत नाहीं ! मी जिवंत असतांना रामाची प्रिय भार्या सीता मी तुला नेऊं देणार नाहीं ! " जटायूचें हें भाषण ऐकून रावणाचे डोळे रागानें लाल झाले आणि त्यानें भयंकर बाण जटायूवर सोडले. बाणांची पर्वा न करतां जटायूनें रावणाचें धनुष्य तोडलें, कवच उडवून दिलें आणि त्याच्या रथाचीं गाढवें मारून रथ मोडून टाकला ! रावणानें आपलें खड्ग उपसून जटायूचे पंख तोडून टाकले आणि नील मेघाप्रमाणें आकृति असलेला व शुभ्र वक्षःस्थलानें युक्त असा तो गृध्रराज भूमीवर तळमळत पडला ! तेव्हां सीता त्याच्याकडे धांवली व त्याला कवटाळून रडूं लागली. ती म्हणाली, " हे रामा, हा पक्षी देखील माझ्या रक्षणासाठीं धांवून आला ! पण तूं माझें रक्षण करण्यासाठीं अद्यापि आला नाहींस ! "

जटायूचा पराभव केल्यानंतर रावण सीतेच्या अंगावर धांवून गेला. झाडांना विळखा घातलेल्या सीतेस त्यानें केस धरून पकडलें व तो तिला घेऊन आकाश-मार्गानें जाऊं लागला. सोन्यासारख्या वर्णाची, सोन्याचीं भूषणें धारण केलेली व सोन्यासारखें पीतवस्त्र नेसलेली सीता कृष्णवर्णाचा रावण घेऊन चालला असतां दूरत्वामुळें नीलवर्ण दिसणाऱ्या पेटलेल्या पर्वतासारखा दिसूं लागला ! रावणाच्या अंकावर असलेली ती सीता कृष्णवर्ण हत्तीच्या सोन्याच्या सांखळी-सारखी भासत होती ! रावण सीतेला घेऊन जात असतां सीतेच्या केसांत खोवलेलीं फुलें खालीं भूतलावर पडूं लागलीं. रावणाच्या वेगानें आण्याच्या

गतीमुळें तीं पडणारीं फुलें त्याच्या सभोंवतीं फिरून खालीं पडत होतीं ! त्यावेळीं मेरू पर्वताच्या भोंवतीं ज्याप्रमाणें नक्षत्रांची माला फिरत असते, त्याप्रमाणें तीं फुलें रावणाच्या भोंवतालीं फिरल्यासारखीं दिसत होतीं ! जातां जातां सीतेच्या पायांतील रत्नजडित तोरडी जमिनीवर तुटून पडली. क्षीण-पुण्य होऊन आकाशांतून गळून पडणाऱ्या ताऱ्याप्रमाणें सीतेचीं आभूषणें भूतलावर गळून पडूं लागलीं ! झाडांचे शेंडे वाऱ्यानें हलत होते, ते जणूं काय सीतेला " भिऊं नकोस " असें सांगून धीर होते. निर्झरांच्या रूपानें अश्रु गाळणारे पर्वत आपल्या उंच शिखरांच्या रूपानें हात वर करून रावण नेत असलेल्या सीतेबद्दल जणूं काय आक्रोश करीत होते ! जिचे केंस अस्ताव्यस्त झाले आहेत व कुंकू पुसून गेलें आहे, अशा सीतेचा विलाप ऐकून वनदेवतांच्या शरीराला कंप सुटूं लागला ! शोकग्रस्त असतांहि ती धैर्यानें रावणास म्हणाली, " हे नीचा, मी एकटी आहें, असें पाहून चोराप्रमाणें माझा अपहार करण्याची तुला लाज कशी वाटली नाहीं ? तूं मला सोडून दे, नाहीं तर, माझा पति तुझा नाश केल्यावांचून खचित राहणार नाहीं ! तुझ्या कंठाभोंवतीं कालपाश आंवळत आहे, असें मला वाटतें ! " याप्रमाणें बोलून सुटण्याची धडपड करीत असतांहि रावण तिला घेऊन चालला होता !

## १०. सीतेचा अशोकवनांत निवास

जेव्हां कांहींच तरणोपाय नाहीं, असें दिसून आलें, तेव्हां सीतेनें आपल्या उत्तरीय वस्त्रांत उरलेलीं भूषणें बांधलीं व तें गांठोडें खालीं पृथ्वीवरील एका पर्वतावर बसलेल्या पांच वानरांकडे फेकून दिलें. हे वानर तरी रामाला आपली बातमी सांगतील आणि वस्त्रें व भूषणें या चिन्हांमुळें त्याला आपली खूण पटेल, असें सीतेला वाटलें ! पृथ्वीवरील पर्वतावर बसलेले ते पिंगट डोळ्यांचे पांच वानर वर मान करून आक्रोश करणाऱ्या सीतेला पाहूं लागले. धनुष्यापासून सुटलेल्या बाणाप्रमाणें रावण त्वरेनें जंगलें, नद्या, पर्वत व सरोवरें ओलांडत चालला होता. तिमि नांवाचे मत्स्य व नक्र यांचें निवासस्थान असलेला असा समुद्र ओलांडून रावण लंका नगरींत प्रविष्ट झाला ! अंतःपुरांत गेल्यावर त्यानें सीतेला राक्षसींच्या स्वाधीन केलें आणि त्यांना तो म्हणाला, " माझ्या परवानगीशिवाय हिच्याकडे कोणासहि येऊं देऊं नका ! ही जें जें मागेल, तें तें हिला द्या ! हिला

कोणी दुःख दिल्यास त्याला प्राणांस मुकावें लागेल !" अशी ताकीद दिल्यावर रावणानें आठ मांसभक्षक राक्षस रामाच्या हालचाली कळविण्यासाठीं जनस्थानाकडे पाठविले.

नंतर रावण अंतःपुरांत सीतेकडे गेला. त्यावेळीं सीता हरणाच्या कळपांतून निघालेल्या व कुत्र्यांच्या तावडींत सांपडलेल्या हरिणीप्रमाणें दिसत होती ! रावणानें बलात्कारानेंच सीतेला आपलें वैभवशाली गृह दाखविलें ! सोनें व रत्नें यांनीं विभूषित केलेलें रावणाचें गृह त्याच्या वैभवाची साक्ष देत होतें. मग तो सीतेला म्हणाला, " वृद्ध व बालराक्षस सोडल्यास बत्तीस कोटि राक्षस माझ्या दिमतीस आहेत ! ही शंभर योजनें लांब असलेली लंका समुद्रांकित असल्यानें अजिंक्य आहे ! देवादिकांतहि माझ्या तोडीचा कोणीच नाहीं ! हे सीते, तूं माझा स्वीकार करून या सर्व वैभवाची स्वामिनी हो ! तूं मजवर कृपा कर ! मी आपलीं दहाहि मस्तकें तुझ्या चरणांवर ठेवतों ! " हें ऐकून सीता तृण आड धरून रावणास म्हणाली, " सत्यवचनी व धर्मात्मा राम माझें दैवत असून तो तुझा प्राण खचित नाहींसा करील ! हे रावणा, देव व दैत्य यांना तूं अवध्य असशील, परंतु रामाच्या हातून तूं जिवंत सुटणार नाहींस ! तूं माझ्या जड देहाला बांध, किंवा मारून टाक ! परंतु मी आपल्या नांवाला कलंक कधींच लावून घेणार नाहीं !" मग रावण म्हणाला, " हे हट्टी स्त्रिये, ऐक. मी बारा महिनेपर्यंत वाट पाहतों. त्यापूर्वीं तूं मला वश न झाल्यास माझ्या न्याहारीसाठीं माझे आचारी तुझे तुकडे तुकडे करतील !" नंतर तो राक्षसींना म्हणाला, " तुम्ही अक्राळविक्राळ स्वरूपाच्या असून रक्तमांस भक्षक आहांत ! सीतेला अशोकवनांत ठेवून तिला धमक्या देऊन व चुचकारून तुम्ही वश करून घ्या ! " रावणाची ही आज्ञा ऐकून त्या राक्षसी सीतेला अशोक वनांत घेऊन गेल्या. त्यांच्या तावडींत सांपडलेली सीता वाघाच्या तावडींत सांपडलेल्या हरिणीप्रमाणें दिसूं लागली !

## ११. रामाचा शोक

इकडे राम आपल्या पर्णकुटीस परत चालला असतां त्याला चिंतेनें अगदीं ग्रासून टाकलें ! ' सीतेचा कांहीं घात तर झाला नसेल ना ? ' हा विचार त्याला सारखा त्रास देत होता ! एवढयांत त्यानें खिन्न व दुःखित लक्ष्मणास आपल्याकडे

येतांना अवलोकन केलें. लक्ष्मणाचा डावा हात धरून राम म्हणाला, "हे लक्ष्मणा, तूं सीतेला सोडून आलास, हें फारच निंद्य कर्म केलेंस! तिचें कुशल असेल ना ? ती मला पुनः भेटेल ना ? ती जर मृत झाली असेल, तर मी प्राणत्याग करीन." राम असा शोक करीत असतां लक्ष्मणानें त्याला झालेला सर्व प्रकार निवेदन केला. लक्ष्मण म्हणाला, "हे रामा, सीता मला अतिशय तोडून बोलली ! 'भ्रात्याचा नाश झाल्यावर मी तुला हस्तगत व्हावें, अशी पापबुद्धि तूं धरली आहेस !' याप्रमाणें सीता मला म्हणाली ! म्हणून मी रागानें आश्रम सोडून निघालों !" राम म्हणाला, "क्रुद्ध झालेल्या स्त्रीचें कठोर भाषण ऐकून क्रोधाच्या आधीन झालास व माझ्या आज्ञेप्रमाणें वागला नाहींस, हा सर्वस्वीं तुझा अपराध होय !"

याप्रमाणें बोलत राम-लक्ष्मण आश्रमास आले व तेथें सीता नाहीं, असें पाहून उद्विग्न झाले ! आश्रमांत सर्व विध्वंस झाला होता. कृष्णाजिनें व दर्भ अस्ताव्यस्त पडले होते, दर्भासनें व चटया फाटून गेल्या होत्या आणि पर्णकुटींत कोणीच नव्हतें ! तेव्हां सीतेला कोणी नेलें, तिला कोणी भक्षण केलें, ती भित्री कोठें दडून बसली, किंवा ती वनांत फुलें व फळें गोळा करण्यासाठीं गेली हें कांहींच न समजून राम शोकसागरांत बुडून गेला ! तो विलाप करूं लागला, "हे कदंबवृक्षा, सीतेला कदंब वृक्ष प्रिय आहेत, तेव्हां ती तुला दिसली काय ? हे ककुभ वृक्षा, सीतेच्या मांड्या तुझ्याप्रमाणें आहेत, सीता तुला कोठें दिसली काय ? हे शोक दूर करणाऱ्या अशोका, शोकामुळें मी भांबावून गेलों आहें ! माझी सीता मला दाखवून तूं आपलें नांव सार्थ कर व मलाहि तुझ्यासारखें होऊं दे !" याप्रमाणें अनेक झाडांकडे जाऊन राम वेड्याप्रमाणें त्यांस विचारूं लागला ! तो पुढें बोलूं लागला. "हे मृगा, तुझ्या पाडसासारखी डोळे असलेली सीता तुला ठाऊक आहे काय ? हे गजा, तुझ्या शुंडेप्रमाणें मांड्या असलेली सीता तूं पाहिली असल्यास मला तिची माहिती सांग ! हे सीते, हे कमळ नयने, मी खरोखरच तुला आतां पाहिलें ! तूं अशी धांवपळ कां करीत आहेस ? झाडाआड लपून तूं माझ्याशीं कां बोलत नाहींस ? पण छे, ही सीता नव्हेच ! त्या सुहास्यवदनेचा कोणीतरी वधच केला आहे ! भीतीनें कांपत असलेले तिचे हात व चंदनासारखी तिची गौरवर्ण मान राक्षसांनीं खाऊन टाकली आहे !" असा वारंवार विलाप करीत राम स्वैर

धांवूं लागला, उड्या मारूं लागला व गरगरा घिरट्या घालूं लागला! एखाद्या उन्मत्ताप्रमाणें त्याची स्थिति झाली! तो पुनः शोक करूं लागला– "हे सीते, झाडाआड लपून तूं थट्टा करीत असशील, तर ती तुझी थट्टा आज पुरे कर! तुझ्या विरहदुःखानें मी निधन पावून स्वर्गलोकास गेलों, तर पिता दशरथ तेथें भेटून तुझें रक्षण न केल्याबद्दल माझा धिःकार करील. दयेला पात्र अशा मला सोडून तूं कोठें गेलीस?" रामाचें सांत्वन करण्यासाठीं लक्ष्मण म्हणाला, "या पर्वतावर नानाप्रकारच्या गुहा असून सीतेला वनामध्यें संचार करणें आवडतें. तेव्हां ती जवळच कोठें असेल. हे रामा, आपण तिला हुडकून काढण्याचा प्रयत्न करूं. तूं आपला शोक आवर." नंतर रामलक्ष्मणांनीं अनेक वनें, पर्वत, नद्या व सरोवरें धुंडाळलीं. पण सीतेचा शोध लागला नाहीं! निराशेमुळें रामाचे सर्व अवयव गळून गेले व तो भान हरपून निश्चेष्ट पडला! सावध झाल्यावर तो "हे प्रिये! हे सीते!" असा वारंवार आक्रोश करूं लागला! लक्ष्मण सांत्वन करण्याचा प्रयत्न करीत होता, पण रामाचें कांहीं केल्या समाधान झालें नाहीं! "मी आतां जनक राजाला काय सांगूं? कौसल्येला कसें तोंड दाखवूं?" अशा प्रकारें तो एकसारखा विलाप करीत होता!

नंतर सीता गोदावरी नदीवर गेली आहे कीं काय, हें पाहण्यासाठीं राम व लक्ष्मण तिकडे गेले. परंतु तेथेंहि सीता त्यांच्या दृष्टीस पडली नाहीं! प्रत्यक्ष गोदावरी नदीलाच "सीता कोठें आहे?" असें रामानें विचारलें. तेथील प्राण्यांनाहि त्यानें तसाच प्रश्न केला. परंतु रावणाच्या भीतीनें कोणीच कांहीं सांगत नव्हतें! इतक्यांत रामाकडे कांहीं मृग सारखें पाहूं लागले. त्यांच्या आविर्भावावरून त्यांना कांहींतरी सांगावयाचें आहे, असें वाटत होतें! तेव्हां कंठ दाटून आल्यानें अस्पष्ट स्वरांत "सीता कोठें आहे?" असें रामानें त्यांना विचारलें. त्या बरोबर ते सर्व मृग एकदम उठले व दक्षिणेकडे तोंड करून आकाशमार्ग दाखवूं लागले! कारण, रावण दक्षिण दिशेकडेच आकाशमार्गानें गेला होता! मृगांनीं केलेला तो संकेत लक्ष्मणानें ओळखला. मग तो रामास म्हणाला, "हे मृग ज्याअर्थीं दक्षिण दिशा दाखवीत आहेत, त्याअर्थीं राक्षस वास करीत असलेल्या दक्षिण दिशेकडेच आपण गेलेलें बरें!" असें म्हणून ते दोघे दक्षिणेकडे जाऊं लागले. मार्गांत रामाला सीतेच्या वेणींतील फुलें पडलेलीं दिसलीं. थोडें पुढें

गेल्यावर राक्षसांचीं मोठीं पावलें जमिनीवर उमटलेलीं त्यानें पाहिलीं. जटायूशीं युद्ध करतांना मोडून पडलेला रावणाचा रथ रामास दिसला. जवळच पलीकडे जरीच्या झुली घातलेलीं गाढवें मरून पडलेलीं त्यानें अवलोकन केलीं. या सर्व खुणा पाहून सीतेला कोणी तरी हरण करून नेलें, याविषयीं रामाची खात्री पटली. "आतां सर्व त्रैलोक्याचाच मी नाश करतों!" असें म्हणून रामानें आपलीं वल्कलें व अजिन सांवरलें, जटाभार पुनः बांधला आणि तो धनुष्य घेऊन सज्ज झाला! तेव्हां लक्ष्मण म्हणाला, "हे रामा, सर्व त्रैलोक्याच्या नाशास कारणीभूत होण्याऐवजीं ज्यानें सीतेचें हरण केलें, त्यालाच तूं शोधून काढ! गोडीगुलाबीनें जर सीता प्राप्त न झाली, तर मग तूं त्रैलोक्याचा नाश कर!" असें म्हणून लक्ष्मणानें रामाचे पाय घट्ट धरले व त्याला तो पुनः म्हणाला, "हे पुरुषश्रेष्ठा, दैवाच्या कचाट्यांतून देवहि सुटत नाहींत! मग आपली काय कथा? असा शोक करणें तुला योग्य नाहीं! ज्यानें तुझ्या भार्येला नेलें असेल, त्याच दुष्ट शत्रूला ओळखून काढून तूं त्याचा नाश कर!"

## १२. जटायु निधन

लक्ष्मणाच्या सांगण्याप्रमाणें मन आंवरून राम भ्रात्यासह जनस्थान शोधण्यासाठीं संचार करूं लागला. तेव्हां त्याला सर्वांग रक्तानें भरून भूमीवर पडलेला जटायु पक्षी दिसला. त्याबरोबर राम म्हणाला, "यानेंच सीतेला भक्षण करून टाकलें, यांत शंका नाहीं! याचा मी वध करतों." असें म्हणून राम जटायूवर धांवून गेला. तेव्हां फेंस येत असलेलें रक्त ओकत पडलेला जटायु रामास म्हणाला, "हे रामा, संजीवनी औषधीप्रमाणें जिचा शोध करीत आहेस, ती सीता व माझे प्राण हीं दोन्ही रावणानें हरण करून नेलीं आहेत! त्यानें आधींच मारलेल्या मला तूं कसा मारूं इच्छितोस?" जटायूचें हें बोलणें ऐकून रामानें त्यानें सांगितलेला सर्व वृत्तांत श्रवण केला आणि तो त्या गृध्रराजास कडकडून भेटला. जटायूच्या निधनानें राम-लक्ष्मणांस अतिशय दुःख झालें. पित्याचा सखा व पक्षिगणांचा राजा, म्हणून रामानें जटायूस अग्नि दिला आणि त्याला उद्देशून पिंडदान केलें. नंतर नदीवर स्नान करून ते वनांत प्रविष्ट झाले.

## १३. कबंध-वध

राम व लक्ष्मण सीतेला शोधण्यासाठीं पश्चिम दिशेकडे जाऊं लागले. मध्यं-

तरी त्यांना 'क्रौंचारण्य' लागलें. तें ओलांडल्यावर त्यांना 'मातंगाश्रम' दिसला. पलीकडे गेल्यावर कायमचा अंधार वास करीत असलेली एक दरी त्यांना लागली. तिच्यांतून अयोमुखी नामक राक्षसी बाहेर येऊन लक्ष्मणाला बिलगली ! लक्ष्मणानें तिचें नाक व कान कापल्यावर ती आल्या वाटेनें पळून गेली ! आणखी पुढें गेल्यावर राम–लक्ष्मणांनीं कंठ व मस्तक नसलेला कबंध राक्षस अवलोकन केला. त्याला एकच डोळा होता व त्याचे हात अतिशय लांब होते. कबंधानें आपल्या दीर्घ बाहूंनीं त्या दोघांना धरलें. परंतु त्याचे हात छाटून त्यांनीं आपली सुटका करून घेतली. कबंधास शापामुळें हें विचित्र रूप प्राप्त झालें होतें. मरण्यापूर्वी तो रामास म्हणाला, "हे रामा, माझें पूर्वीचें रूप त्रैलोक्यांत प्रसिद्ध होतें. परंतु राक्षसरूप घेऊन मी ऋषींना त्रास देत असल्यानें स्थूलशिरा नामक ऋषींच्या शापानें मला हा चमत्कारिक देह प्राप्त झाला ! तुझ्या हातून मृत्यु आल्यावर मला पूर्वरूप प्राप्त होईल असा त्यांनीं उःशापहि दिला ! मी दनूचा पुत्र आहे, असें तूं समज." मग रामानें सीतेचा शोध लावण्याबाबत मदत करण्याची विनंति केली असतां कबंध म्हणाला, "मला पूर्वरूप प्राप्त झाल्याशिवाय दिव्यज्ञान होणार नाहीं ! म्हणून तूं मला प्रथम दग्ध करून टाक !" मग लक्ष्मणानें रामाच्या आज्ञेनें मृत्यु पावलेल्या कबंधास अग्नि दिला. तेव्हां एक मालाधारी दिव्यपुरुष चितेतून प्रगट झाला. तो रामास म्हणाला, "सीता प्राप्त होण्याचा तुला मी खरा उपाय कथन करतों. 'समाश्रय' युक्तीचा अवलंब करून तुला सीता परत मिळवितां येईल. हे रामा, तसें करण्यासाठीं मी सांगतों तें तूं ऐक. इंद्रपुत्र वालीनें आपला भ्राता सुग्रीव यास राज्यांतून घालवून दिलें आहे. सांप्रत पंपासरोवराजवळील ऋष्यमूक पर्वतावर सुग्रीव वास करतो. तो महाबलाढ्य व धर्मज्ञ असून सीताशुद्धीच्या कार्यांत तुला साहाय्यभूत होईल. म्हणून तूं सुग्रीवाशीं सख्य कर. त्याच्या जवळील असंख्य व पराक्रमी वानर तुझ्या अतिशय कामास पडतील." असें सांगून त्या मालाधारी पुरुषानें रामास सुग्रीवाकडे जाण्याचा मार्ग सांगितला. त्याचप्रमाणें, वाटेंत शबरी नांवाची तपस्विनी असल्याचें सांगून तिची भेट घेण्याचाहि त्यानें रामास आग्रह केला. नंतर तो मालाधारी पुरुष विमानांत बसून आकाशमार्गानें निघून गेला.

## १४. शबरीची भेट

कबंधानें सांगितलेल्या मार्गानें राम-लक्ष्मण सुग्रीवाकडे जाण्यास निघाले. वनशोभा पाहत पाहत ते पंपासरोवराच्या पश्चिम तीराला येऊन पोंचले. तेथें असंख्य वृक्षांनीं व्याप्त असा शबरीचा आश्रम त्यांना लागला. राम-लक्ष्मणांना पाहतांच शबरीनें त्या उभयतांचे पाय धरले व विधिपूर्वक त्यांचें स्वागत केलें. रामानें तिला कुशल प्रश्न विचारल्यावर ती म्हणाली, " हे रामा, तुझ्या दर्शनानें आज माझ्या तपाची सिद्धि झाली आहे ! तूं चित्रकूट पर्वतावर आल्यानंतर ज्यांची मी सेवा केली, ते तपस्वी ऋषि स्वर्गलोकाला गेले व जातांना मला म्हणाले ' राम व लक्ष्मण तुझ्याकडे अतिथि म्हणून आले असतां त्यांच्या दर्शनानें तुला अक्षय्य असे उत्तम लोक प्राप्त होतील. तो योग आज आला आहे ! हे रामा, त्या मुनींच्या सांगण्याप्रमाणें हीं वन्य फळें-मुळें मीं तुझ्यासाठीं गोळा केलीं आहेत. " मग रामानें विचारल्यावरून शबरीनें ' मतंगवन ' नांवानें प्रसिद्ध असलेलें विशाल अरण्य रामास दाखविलें. याच ठिकाणीं शबरीच्या गुरूंनीं यज्ञ केला होता. त्यांच्या तपःसामर्थ्यामुळें तेथें सात सागर प्रत्यक्ष येऊन राहिले होते ! शबरीच्या गुरूंनीं स्नान करून वाळत घातलेलीं वल्कलें अद्यापि ओलीं होतीं ! त्यांनीं आणून ठेवलेलीं नील कमळें व फुलें अद्यापि टवटवीत होतीं ! त्यांची ' प्रत्यक्स्थली ' नांवाची वेदी अद्यापि धगधगत होती ! हा सर्व प्रभाव त्या ऋषींच्या कठोर तपस्येचा होता ! ऋषींच्या प्रभावाच्या या खुणा पाहून रामास अतिशय आश्चर्य वाटलें ! मग रामाची आज्ञा घेऊन केसांच्या जटा होऊन वल्कलें व कृष्णाजिन धारण केलेली ती शबरी अग्नींत प्रविष्ट झाली आणि दिव्य देह धारण करून, पुण्यवान् महर्षि जातात, त्या लोकाला निघून गेली !

नंतर राम व लक्ष्मण पुढें जाण्यास निघाले. लौकरच ते पंपा सरोवराला येऊन पोंचले. तेथील वनशोभा निरुपम होती. तेथून जवळच ऋष्यमूक पर्वत होता. त्या पर्वतावर वास्तव्य करणाऱ्या सुग्रीवास भेटण्यास राम अत्यंत उत्सुक होता. समोर दिसत असलेलें रमणीय पंपासरोवर पाहून रामानें लक्ष्मणासह त्याच्या जलांत प्रवेश केला.

– अरण्यकांड संपूर्ण –

# किष्किंधा कांड



## १. पंपा-सरोवराच्या कांठीं

निळीं-पांढरीं कमळें व मत्स्य यांनीं गजबजलेल्या पंपा सरोवरास पाहून राम लक्ष्मणास म्हणाला, " हे लक्ष्मणा, नानाप्रकारच्या वृक्षांनीं विभूषित व वैडूर्यरत्ना-सारख्या निर्मल जलानें युक्त अशी ही पंपा पुष्करिणी पहा ! हिच्या कांठचें हें वन किती शोभा देत आहे ! वसंत ऋतु प्राप्त झाला असल्यामुळें वृक्ष व लता हीं फुलांनीं बहरून गेलीं आहेत. त्या फुलांवर भ्रमर गुंजारव करीत असून त्यांत वाराहि क्रीडा करीत आहे. वाऱ्यामुळें झाडांच्या शाखा एकमेकांत गुंतून तीं झाडें एकत्रित बांधल्यासारखीं भासत आहेत ! फुललेले कर्णिकार पीतांबर व सुवर्णभूषणें धारण केलेल्या पुरुषांप्रमाणें दिसत आहेत ! हे लक्ष्मणा, हा वसंत ऋतु माझ्या मनांतील सीता-विरहाचें दुःख वृद्धिंगत करीत आहे ! सीता पाणकोंबड्यांचा शब्द ऐकून हर्षित होत असल्यामुळें त्यांचा हा ध्वनि ऐकून मला तिचें स्मरण होत आहे, व तिच्या स्मरणानें माझें विरहदुःख वृद्धिंगत होत आहे ! अशोकाचे गुच्छ हेच ज्याचे निखारे आहेत, भ्रमरांचा गुंजारव हाच ज्याचा तडतडणारा ध्वनि आहे व आरक्तवर्णाची पालवी याच ज्याच्या ज्वाला आहेत असा हा वसंतरूपी अग्नि मला दग्ध करण्याच्या बेतांत आहे ! स्फटिकाच्या गवाक्षांप्रमाणें दिसणारे व वाऱ्यानें उडणारे पिसारे असलेले हे मोर व त्यांच्या लांडोरी यांना नर्तन करतांना पाहून माझ्या मनाला मदन पीडा देत आहे ! हे लक्ष्मणा, सीता वास्तव्य करीत असलेल्या प्रदेशांत जर असाच वसंतकाल असेल, तर तीहि माझ्या विरहानें शोकाकुल झाली असेल ! सीतेची गांठ पडून जर मला या स्थलीं वास करण्यास मिळेल, तर मी

अयोध्येची, किंबहुना, इंद्रपदाचीहि इच्छा करणार नाहीं! हे लक्ष्मणा, ती सुंदरी सीता या रमणीय पर्वतशिखरावर जर आतां सत्वर माझ्या दृष्टीस पडेल, तरच माझी धडगत आहे! तूं अयोध्येस परत जा व भरतास भेट! मी आतां त्या जनककन्येके-शिवाय प्राण धारण करण्यास सर्वस्वीं असमर्थ आहें!" याप्रमाणें रामाला अनाथाप्रमाणें शोक करतांना पाहून लक्ष्मण त्याला म्हणाला, "हे रामा, तुझ्या-सारख्या महात्म्याची मति अशी गुंग कशी होत आहे? प्रियवस्तु ही वियोगजन्य दुःख देणारी असल्यानें तिच्या ठायीं आसक्ति ठेवणें इष्ट नाहीं. कारण, अति 'स्नेहा' नें भिजलेली वातहि जळूं लागते! म्हणून तूं हा शोक सोडून दे. हे राघवा, रावणाची संपूर्ण बातमी आपणांस मिळाल्याबरोबर त्याला, एक तर, सीतेला परत द्यावें लागेल, किंवा मृत्युवश तरी व्हावें लागेल! सीतेला घेऊन तो दितीच्या गर्भांत जरी दडला, तरी मी त्याचा तेथेंहि वध करीन! हे सज्जना, उत्साहासारखी अन्य शक्ति नसून तीच कार्यसिद्धि करते!" लक्ष्मणाचें हें बोलणें ऐकून रामाचें मन पुष्कळच स्थिर झालें आणि ते दोघे वनशोभा पाहत पाहत पंपासरोवराकडे जाऊं लागले.

## २. हनुमान्-सुग्रीवांशीं भेट

ऋष्यमूक पर्वतासमीप महाबलाढ्य सुग्रीव आपल्या अमात्यांसह बसला असतां त्यानें दुरून राम-लक्ष्मणांस पाहिलें व तो अत्यंत भयभीत झाला. तो आपल्या मंत्र्यांस म्हणाला, "हे कपटानें वल्कलें धारण करणारे दोघे वीर वालीनेंच पाठविले असले पाहिजेत!" राम-लक्ष्मणांच्या आगमनामुळें त्या वानरांमध्यें भीति निर्माण झाली आणि ते एका ठिकाणीं न राहतां या पर्वतावरून त्या पर्वता-वर उड्या मारूं लागले! कांहीं वेळानें सुग्रीवाभोंवतीं ते सर्व वानर गोळा झाले, तेव्हां हनुमान् सुग्रीवास म्हणाला, "हे वानरराजा, तुम्ही सर्वजण ज्याच्या भीतीनें गडबडून गेलां आहांत, तो वाली तर येथें कोठेंच दिसत नाहीं! तेव्हां तुम्ही सर्वजण मनांतील भीति सोडून द्या." नंतर सुग्रीव हनुमानास म्हणाला, "हे हनुमाना, धनुष्यबाण व खड्ग हातीं घेतलेल्या त्या देवतुल्य उभय वीरांना पाहून कोण भयभीत होणार नाहीं? त्यांना वालीनेंच पाठविलें असलें पाहिजे! तूं त्यांच्याकडे सत्वर जाऊन त्यांचा अभिप्राय समजून घे." सुग्रीवाची ही आज्ञा

ऐकून हनुमान् तापस वेष धारण करून राम-लक्ष्मणांकडे गेला आणि त्यांना म्हणाला, " हे वीरांनो, राजर्षि व देव यांच्याप्रमाणें दिसणारे तुम्ही या प्रदेशांत कोणत्या हेतूनें आलांत? तुमच्या धनुष्यादि आयुधांवरून तुम्ही शत्रूचा वध करण्यासाठीं निघालां आहांत असें दिसत आहे! तुमचे भाते वज्रतुल्य बाणांनीं भरले असून तुमचे खड्ग सर्पाच्या कातीप्रमाणें दिसतात! अरे, पण मी इतकें बोलत असूनहि तुम्ही चकार शब्दहि काढत नाहीं, हें काय? मी वायुपुत्र हनुमान् असून वानरश्रेष्ठ सुग्रीवानें पाठविल्यावरून येथें आलों आहें!" यावर राम लक्ष्मणास म्हणाला, " हा हनुमान् महात्म्या सुग्रीवाचा मंत्रि दिसतो, तेव्हां त्याच्याशीं तूं भाषण कर. हा शुद्ध बोलणारा असून वेद व व्याकरण पढलेला दिसतो!" मग लक्ष्मण हनुमानास म्हणाला, " हे ज्ञानसंपन्न महात्म्या, आम्ही सुग्रीवाच्या शोधांत असून त्याचें जसें सांगणें असेल, तसें आम्ही वागूं." इतकें बोलून लक्ष्मणानें हनुमानास आपली सर्व हकीकत सांगितली. ती सांगून झाल्यावर लक्ष्मण पुनः म्हणाला, " दितीचा पुत्र दनु यानें सांगितल्यावरून सीतेचा शोध लावण्यासाठीं सुग्रीवाची मदत मिळविण्यास आम्ही निघालों आहोंत. जो राम सर्व लोकांचें आश्रयस्थान होता, तोच आज सुग्रीवाला शरण आला आहे!" हें बोलतांना लक्ष्मणाचे डोळे भरून आले. तेव्हां हनुमान् म्हणाला, " तुमच्यासारख्या सुयोग्य लोकांची भेट झाली, हें सुदैव होय. वालीच्या वैरामुळें सुग्रीवहि राज्यभ्रष्ट व स्त्री विरहित झालेला असल्यामुळें तो सीताशुद्धीसंबंधानें तुम्हांस अवश्य साहाय्य करील!" यानंतर ते तिघे सुग्रीवाकडे जाण्यास निघाले. हनुमानानें तापस वेष सोडून आपला विशाल देह धारण केला आणि राम-लक्ष्मणांस खांद्यावर घेऊन तो वेगानें सुग्रीवाकडे निघाला.

सुग्रीवाची भेट झाल्यावर हनुमानानें त्याला रामाचा सर्व वृत्तांत सांगून त्याच्या आगमनाचा हेतूहि निवेदन केला. हें ऐकून सुग्रीवास अतिशय आनंद झाला. तो प्रेमानें रामाजवळ गेला आणि त्यानें आपला हात त्याच्यापुढें केला. रामानेंहि उल्हासानें त्याचा हात धरून त्यास आलिंगन दिलें. हनुमानानें दोन काष्ठें घासून अग्नि उत्पन्न केला. त्याचें पूजन करून व त्याला प्रदक्षिणा घालून राम-सुग्रीव एकमेकांचे मित्र झाले. सुग्रीवानें सालवृक्षाची फांदी मोडून ती खालीं टाकली व

*

तिच्यावर तो रामासह बसला. मग सुग्रीव म्हणाला, " हे रामा, वालीनें मला घालवून देऊन माझ्या भार्येचा अपहार केला असल्यामुळें मी अरण्यांत फिरत आहें! तूं माझें वालीपासूनचें भय निवारण कर ! " राम हंसून म्हणाला, " हे महावानरा, मैत्रीचा परिणाम परस्परांवर उपकार करणें हा होय, हें तत्त्व मी जाणतों ! माझे अमोघ बाण वालीला अवश्य ठार करतील ! " हें ऐकून सुग्रीवहि प्रेमानें म्हणाला, " हे रामा, श्रुतीप्रमाणें नष्ट झालेली तुझी भार्या आणण्यास मीहि अवश्य मदत करीन. कांहीं दिवसांपूर्वी एक राक्षस " रामा ! लक्ष्मणा !" म्हणून टाहो फोडणाऱ्या एका स्त्रीला आकाशमार्गानें नेत असलेला आम्ही पाहिला. ती स्त्री निःसंशय सीताच असावी ! मी व चौघे वानर पर्वतावर बसलेले पाहून तिनें आपल्या उत्तरीय वस्त्रांत अलंकार बांधून खालीं टाकलें. त्या सर्व वस्तु आम्ही जपून ठेवल्या आहेत. तूं त्या ओळख. " असें म्हणून सुग्रीवानें गुहेंत ठेवलेल्या त्या वस्तु आणून रामास दाखविल्या. त्या पाहतांच ' हे प्रिये ' असें म्हणून राम रडत भूमीवर पडला ! तो सर्पाप्रमाणें सुस्कारे टाकूं लागला ! तो लक्ष्मणास म्हणाला, " हे लक्ष्मणा, हें वस्त्र व भूषणें तूं पहा ! तीं सर्व सीतेचींच दिसत आहेत ! " लक्ष्मण म्हणाला, " सीतेचीं बाहुभूषणें व कुंडलें माझ्या ओळखीचीं नाहींत ! मी तिला नित्य नमस्कार करीत असल्यामुळें तिच्या पायांतील तोरड्या मात्र माझ्या ओळखीच्या आहेत ! " मग राम सुग्रीवास म्हणाला, " हे सुग्रीवा, त्या दुष्ट राक्षसानें माझ्या प्रियेला कोणीकडे नेलें व तो कोठें वास करतो, हें तूं मला सांग. सीतेला हरण करून त्यानें स्वतःसाठीं मृत्यूचेंच दार उघडून ठेवलें आहे !" सुग्रीव हात जोडून म्हणाला, " हे रामा, त्या राक्षसाचें वसतिस्थान व त्याचें सामर्थ्य यांची मला मुळींच माहिती नाहीं! परंतु तुला सीता प्राप्त करून देण्याची खटपट मात्र मी अवश्य करीन ! तूं धैर्य धरून दुःख करणें सोडून दे. मित्रभावानें मी तुला ही प्रार्थना करीत आहें ! " हें बोलत असतां सुग्रीवाचे डोळे पाण्यानें भरून आले. त्याचें हें प्रेम पाहून रामानें त्यास आलिंगन दिलें व तो म्हणाला, " हे सुग्रीवा, तुझ्या सांत्वनामुळें मला धीर आला आहे ! सीतेच्या शोधासाठीं तूं मला मदत कर. तुझ्यासाठीं मीं काय करावें, हेंहि तूं मोकळेपणानें सांग ! " रामाच्या या बोलण्यानें सुग्रीव व त्याचे अमात्य फार आनंदित झाले.



सुग्रीव म्हणाला, "एक राक्षस एका स्त्रीला आकाशमार्गानें नेत असलेला आम्हीं पाहिला."

## ३. वाली-सुग्रीवाचें वैर

कांहीं दिवसांनीं राम, लक्ष्मण, सुग्रीव व इतर श्रेष्ठ वानर बोलत बसले असतां सुग्रीव रामास म्हणाला, " हे रामा, माझा ज्येष्ठ भ्राता वाली हा माझा शत्रु असून त्याचा नाश होण्यावरच माझें सुख व जीवित हीं अवलंबून आहेत ! म्हणून तूं वालीचा वध कर ! " हें ऐकून रामानें " तुमचें वैर कशामुळें निर्माण झालें ? " असें सुग्रीवास विचारलें असतां सुग्रीव आपला वृत्तांत सांगूं लागला. " वाली माझा ज्येष्ठ भ्राता असून पिता निवर्तल्यावर तो वानरांचा राजा झाला. दुंदुभीचा पुत्र मायावी हा स्त्रीवरून निर्माण झालेल्या वैरामुळें किष्किंधेच्या वेशीशीं येऊन वालीस युद्धास बोलावूं लागला. वाली त्याच्यावर चालून गेला असतां मीहि वालीबरोबर गेलों. मायावी राक्षस एका विवरांत शिरला. हें पाहून वाली मला म्हणाला, ' तूं या विवराच्या तोंडाशीं थांब. मी शत्रूला मारून येतों. ' असें म्हणून वाली आंत गेला व मी विवराच्या मुखाशीं थांबलों. अशा स्थितींत एक वर्ष गेलें ! वर्षानंतर फेंस येत असलेलें रक्त विवरांतून बाहेर आलें. तेव्हां वाली मेला, असें समजून मी दुःखी झालों आणि प्रचंड पाषाणानें विवराचें तोंड बंद करून किष्किंधेला परत आलों. मंत्र्यांनीं सर्व हकीकत ऐकून मला राज्याभिषेक केला. कांहीं काळानें वाली मायावीस मारून परत आला. मी पुष्कळ सांगितलें असतांहि त्यानें माझा धिःकार केला व राज्यलोभाचा माझ्यावर आरोप केला ! एका वस्त्रानिशीं त्यानें मला राज्याबाहेर काढून दिलें व माझ्या स्त्रीचाहि अपहार केला ! तेव्हांपासून मी ऋष्यमूक पर्वतावर येऊन राहिलों आहें ! हे राघवा, या वालीच्या संकटाचें तूं त्याला ठार मारून निवारण कर ! " तेव्हां राम म्हणाला, " हे माझे बाण तुला तुझी भार्या व राज्य निश्चित मिळवून देतील !" सुग्रीव पुनः म्हणाला, " हे रामा, तुझे बाण त्रैलोक्य दग्ध करून टाकतील, याविषयीं मला शंका नाहीं. परंतु वालीचा प्रभावहि तूं समजून घे. तो सूर्योदयापूर्वी चारी समुद्रावर फेरी करून येत असतो ! महिषाचें रूप घेतलेल्या दुंदुभि नांवाच्या असुराला महाबलाढ्य वालीनें यमसदनास पाठविलें ! हा त्याचा पराक्रम केवळ अद्भुत आहे ! हा दुंदुभि दैत्य एकदां समुद्राकडे जाऊन त्याला ' युद्ध दे ! ' असें म्हणाला. समुद्र म्हणाला, ' मी तुझ्याशीं युद्ध करण्यास असमर्थ आहें.

हिमवान् पर्वताशीं तूं युद्ध कर.' तेव्हां दुंदुभि हिमवान् पर्वताकडे गेला व त्याला त्यानें युद्ध करण्यास पाचारण केलें. हिमवान् म्हणाला, 'मी रणकर्मांत प्रवीण नाहीं. तूं इंद्रपुत्र वालीकडे किष्किंधा नगरीस जा. तो संग्रामांत प्रवीण आहे.' हें ऐकून दुंदुभि महिषवेष धारण करून किष्किंधेच्या दाराशीं आला आणि गर्जना करूं लागला. तेव्हां वाली त्याच्याशीं युद्ध करण्यासाठीं आला. इंद्रानें दिलेली सुवर्णमाला गळ्यांत घातलेल्या वालीनें दुंदुभीला उचलून भूमीवर पाडलें आणि मुष्टी, गुडघे व लत्ता यांचा प्रहार करून त्याला एक योजन लांब फेकून दिलें ! त्यावेळीं त्या दुंदुभीचें रक्त उडून मतंग ऋषींचा आश्रम अपवित्र झाला ! हें पाहून मतंगऋषि संतप्त झाले व त्यांनीं वालीला शाप दिला कीं, 'तूं या वनांत प्रवेश केल्यास मृत्यु पावशील !' तेव्हांपासून मतंगऋषींनीं शापांत सांगितलेल्या एक योजनाच्या सीमेंत असलेल्या या ऋष्यमूक पर्वतावर वाली कधींच येत नाहीं ! म्हणूनच मी येथें येऊन राहूं शकलों ! हे रामा, अशा त्या महासमर्थ वालीचा वध करण्यास तूं कसा समर्थ होशील ?" यावर लक्ष्मण हंसत म्हणाला, "काय केलें, म्हणजे रामाच्या सामर्थ्याचा तुला भरंवसा वाटेल ?" सुग्रीव म्हणाला, "पलीकडे दिसणारे हे जे वृक्ष आहेत, ते वाली जवळून गेला तरी त्याच्या प्रभावानें निष्पर्ण होतात ! या सात वृक्षांपैकीं एका वृक्षाला तरी रामानें एका बाणानें विदीर्ण करावें ! तसेंच, ज्या दुंदुभीला वालीनें एक योजन लांब फेंकून दिलें, त्याच्या अस्थींचा ढिगारा रामानें पायानें उचलून दोनशें धनुष्येंपर्यंत फेंकावा ! म्हणजे तो वालीचा वध करील, अशी मला खात्री वाटेल." यावर रामानें हंसत हंसत दुंदुभीच्या अस्थींचा ढीग पायाच्या केवळ अंगठ्यानें दहा योजनें लांब फेंकून दिला ! त्याचप्रमाणें, रामानें आपला एक बाण सोडून सातहि साल वृक्ष भेदले व रसातलास जाऊन तो बाण त्याच्या भात्यांत पुनः प्रविष्ट झाला ! रामाचा हा पराक्रम पाहून सुग्रीव आनंदित झाला व त्यानें त्यास साष्टांग नमस्कार घातला. रामानें सुग्रीवास उचलून कडकडून आलिंगन दिलें.

## ४. वालीचा वध

नंतर ते सर्वजण किष्किंधा नगरीस गेले. राम, लक्ष्मण व इतर वीर झाडाआड लपले. सुग्रीवानें भयंकर गर्जना करून वालीस युद्ध करण्यास बोलावलें. वाली संतप्त

होऊन येतांच बुध व मंगळ या ग्रहांच्या घोर युद्धाप्रमाणेंच कीं काय, वाली व सुग्रीव यांचें भीषण युद्ध सुरू झालें ! ते दोन्ही भ्राते इतके एकसारखे दिसत होते कीं, यांतील वाली कोणता व सुग्रीव कोणता, याचा बोध रामास झाला नाहीं. म्हणून त्यानें बाण मारून वालीचा वध करण्याचा विचार रहित केला ! वालीनें सुग्रीवास पराभूत केल्यामुळें सुग्रीव ऋष्यमूक पर्वताकडे पळून गेला ! राम, लक्ष्मण व हनुमान् हे सुग्रीवाच्या मागें तिकडे गेले. लज्जित झालेला सुग्रीव रामास म्हणाला, " हें तूं काय केलेंस ? आपण वालीला मारणार नसल्याचें तूं आधींच बोलला असतास, तर मी वालीची खोडी केली नसती ! " राम म्हणाला, " हे सुग्रीवा, रागावूं नकोस. तुम्ही दोघे अतिशय सारखे दिसत असल्यामुळें वाली समजून मी तुलाच बाण मारला असता, तर जगांत माझी अपकीर्ति झाली असती ! तूं कांहींतरी खूण अंगावर बाळगून वालीशीं पुनः युद्ध कर. म्हणजे मी याला तात्काळ लोळवतों ! " असें म्हणून रामानें जवळच फुललेली गजपुष्प वेली सुग्रीवाच्या गळ्यांत अडकविण्यास लक्ष्मणास सांगितलें. लक्ष्मणानें त्याप्रमाणें केलें. मग सुग्रीव रामप्रभृतींस घेऊन पुनः किष्किंधेस निघाला.

किष्किंधेकडे जातांना त्यांना एक वन लागलें. तें पाहून राम सुग्रीवास म्हणाला, " या दाट झाडांच्याभोंवतीं कदलीवन दिसत आहे. हें काय आहे, हें मला सांग. " सुग्रीव म्हणाला, " हे राघवा, हा एक आश्रम आहे. सप्तजन नांवाचे सात ऋषि येथें वर पाय व खालीं मस्तक करून तप करीत होते. ते सदेह स्वर्गाला गेले ! त्यांच्या प्रभावानें या आश्रमांत कोणीहि जाऊं शकत नसून जे मोहानें जातात, ते परत येत नाहींत ! अप्सरांच्या गायन-वादनाचा ध्वनि येथून कानीं पडतो व दिव्य सुगंधहि तेथून येत असतो. येथें अग्निहोत्राचा अग्नि नेहमीं प्रज्वलित असून त्याचा कपोत पक्षाच्या रंगासारखा धूर वर निघत असतो. हे रामा, तूं व लक्ष्मण ऋषींना उद्देशून नमस्कार करा. " त्याप्रमाणें सर्वांनीं केल्यावर ते पुढें निघाले.

सुग्रीव सोडून इतर सर्वजण झाडांआड लपून राहिले. सुग्रीवानें नभोमंडळ भेदून जाणारी गर्जना केली. ती अंतःपुरांत वालीच्या कानीं जातांच तो त्वेषानें बाहेर पडण्यास निघाला. त्याची पत्नी तारा त्याला म्हणाली, " हे वीरा, तुझ्याकडून एकदां पराभव पावून पळून गेलेला हा सुग्रीव ज्याअर्थी पुनः येऊन युद्धाची हांक

देत आहे, त्याअर्थीं त्याला कोणाचें तरी साहाय्य मिळालें असलें पाहिजे ! तुझा व माझा पुत्र अंगद याला हेरांकडून अलीकडेच असें कळलें कीं, अयोध्येच्या दशरथ राजाचे पुत्र राम व लक्ष्मण सुग्रीवाचें साहाय्य करण्यास आले आहेत. तेव्हां सुग्रीवाशीं युद्ध न करतां त्याला तूं यौवराज्याचा अभिषेक कर म्हणजे राज्य व भ्राता या उभयतांची तुला प्राप्ति होईल. " हें ऐकून तारेची निर्भर्त्सना करून वाली म्हणाला, " मित्र, शूरांना युद्धाचें आव्हान केल्यास ते कधीं पाठ दाखवीत असतात काय ? रामाबाबत तूं चिंता करूं नकोस ! त्याचा मीं कांहींच अपराध केला नसतां मला मारण्याचें पाप तो कसें करील ? " यावर तारा दुःखानें वालीच्या इतर वानरस्त्रियांसह अंतःपुरांत परत गेली.

नंतर वाली व सुग्रीव यांचें भयंकर द्वंद्वयुद्ध सुरू झालें. मुष्टी लत्ता, पाषाण व वृक्ष यांचा ते एकमेकांवर प्रहार करूं लागले ! वालीपुढें सुग्रीवाचें तेज कमी होत असलेलें पाहून रामानें सर्पासारखा प्राणनाशक बाण काढून तो वालीच्या वक्षः-स्थलावर सोडला. बाण लागतांच वाली जमिनीवर पडला ! वाली खालीं पडतांच राम व लक्ष्मण झाडांमागून बाहेर आले व वालीकडे गेले. त्यांना पाहून वाली कठोर वाणीनें म्हणाला, " हे रामा, मी तुझ्यासमोर युद्धास उभा नसतांना तूं मला आडून बाण कसा मारलास ? तूं राजकुलांत जन्मलेला असून जटावल्कलेंहि धारण केलेलीं दिसतात. मग तूं अधर्मानें माझा वध कां केलास ? दशरथासारख्या महात्म्याच्या पोटीं तूं पापी कसा जन्माला आलास ? तुला रावणाचाच वध करावयाचा होता, तर मीं एका दिवसांत त्याला मारून सीता तुझ्या स्वाधीन केली असती ! " इतकें म्हणून मरणोन्मुख झालेला तो वाली तोंड कोरडें पडल्यामुळें स्वस्थ राहिला. राम वालीस म्हणाला, " धर्म, अर्थ, काम व लौकिक व्यवहार यांपैकीं कांहींच न जाणतां तूं मूर्खासारखें कसें बोलतोस ? मनूनें ही भूमि इक्ष्वाकु वंशांतील राजांना दिली असून सांप्रत त्यांच्यांतील भरत राजा राज्य करीत आहे. त्याच्या आज्ञेनें धर्मवृद्धीसाठीं आम्ही जगांत संचार करीत आहोंत ! पित्यासारखा असलेला सुग्रीवाचा तूं ज्येष्ठ भ्राता असून त्याची भार्या रुमा हिचा तूं अपहार केला आहेस ! त्या तुझ्या पातकासाठीं तुला मीं प्राणदंड केला आहे ! शिवाय, लक्ष्मणासारखें सुग्रीवाशींहि माझें सख्य असून त्याला भार्या व राज्य प्राप्त करून देण्याची मीं

प्रतिज्ञा केली आहे! म्हणूनहि तुझा वध करणें मला प्राप्त झालें! धर्मवेत्त्या राज-र्षींना मृगयेंतील मृगवध सदोष मानला नसून तूं 'शाखामृग' असल्यानें तुझा वध करण्यांत मला कांहींच दोष लागत नाहीं!" रामाचें हें भाषण ऐकून वाली हात जोडून म्हणाला, "हे रामा, तूं म्हणतोस तें बरोबर आहे. तुला श्रेष्ठाला मी निकृष्ट काय उत्तर देणार? माझ्या कटु भाषणाची तूं क्षमा कर!" हें बोलतांना वालीचा कंठ दाटून आला व तो रामाकडे पाहून रडत रडत म्हणाला, "मला स्वतःबद्दल किंवा तारेबद्दलहि वाईट वाटत नाहीं! परंतु माझ्यामागें माझा हा एकुलता एक पुत्र अंगद दीन होऊन पाणी संपलेल्या तडागासारखा शुष्क होऊन जाईल! तेव्हां माझ्यामागें अंगदाची नीट व्यवस्था लाव! तारेकडेहि लक्ष्य असूं दे!" मग वाली स्तब्ध राहिला. रामानें त्याचें सांत्वन केलें व "अंगदाचें सर्व ठीक होईल!" असें त्यास आश्वासन दिलें.

## ५. वालीची अंत्यक्रिया

वाली पडल्याची वार्ता ऐकतांच त्याची पट्टराणी तारा इतर वानर-राण्यांसह तेथें आली. अजून धुगधुगी असलेल्या वालीच्या अंगावर पडून ती विलाप करूं लागली. "हे महावीरा, तूं माझ्याशीं कां बोलत नाहींस? ऊठ व उत्तम शय्येवर शयन कर. कारण, तुझ्यासारखे राजे जमिनीवर निजत नाहींत! तूं गेल्यानें मला वैधव्यांत व दुःखांत राहण्याचा प्रसंग येणार आहे! तुझ्यामागें आपल्या अंगद पुत्राचें कसें होईल? अंगदाला सोडून तूं कोठें बरें निघालास? हे सुग्रीवा, आतां तुझ्या मनासारखें होऊं दे! आतां तुला रुमा प्राप्त होईल!" याप्रमाणें तारा मुक्तकंठानें शोक करूं लागली. तिला हनुमान् म्हणाला, "प्राण्याच्या हातून घड-णाऱ्या बऱ्यावाईट कर्मांचें फल त्याला प्राप्त होत असतें! सर्वच प्राणी शोचनीय असल्यानें तुझें वालीसाठीं शोक करणें व्यर्थ आहे! तूं अंगदाकडे पहा व वालीच्या पुढील अंत्यविधीची व्यवस्था कर." तारा हनुमानास म्हणाली, "यापुढें हें वानरराज्य किंवा हा अंगद यांच्यावर माझी कांहींच सत्ता नाहीं! अंगदास सुखी करण्याचा अधिकार यापुढें फक्त सुग्रीवास आहे!" मृत्युपंथास लागलेला व कष्टानें श्वासोच्छ्वास करणारा वाली इकडे-तिकडे पाहत असतां त्याला जवळच सुग्रीव उभा असलेला दिसला. त्याला पाहून वाली प्रेमानें म्हणाला, "हे सुग्रीवा, प्राक्-

नाच्या प्रभावामुळें झालेल्या गोष्टी घडून आल्या ! तूं मला बोल लावूं नकोस ! या वानर–राज्याचा तूंच स्वीकार कर ! अंगदाचें पुत्राप्रमाणें पालन कर ! ही सुषेण–कन्या तारा कोणत्याहि गोष्टीचा सूक्ष्म विचार करून संकट आलें असतां त्याचें निवारण करण्याचा मार्ग सांगण्यास अत्यंत समर्थ आहे ! हिच्या विचारानें वागत जा ! ही इंद्रानें दिलेली दिव्य सुवर्णमाला तूं धारण कर ! " मग वाली अंगदास म्हणाला, " हे वत्सा, सुग्रीवाच्या आज्ञेप्रमाणें वागत जा. त्याच्याशीं जास्त लगटपणानें वागूं नकोस; तसेंच, तुटकपणानेंहि वागूं नकोस ! " असें म्हणून वाली तोंड वांसून गतप्राण झाला ! तेव्हां सर्वच वानर शोक करूं लागले ! तारा त्याचें मुख हुंगून म्हणाली, " हे वानर–राजा, तुझा वध झालेला पाहूनहि माझें हृदय भग्न होत नाहीं, तेव्हां तें पाषाणाचेंच बनलेलें आहे, असें म्हटलें पाहिजे ! आज रामाच्या केवळ एका बाणानें सुग्रीवाची भीति नाहींशीं झाली आहे ! " मग ती अंगदाला म्हणाली, " हे वत्सा, आपल्या पित्याची ही भयंकर स्थिति पहा ! प्राक्तनदोषानें निर्माण झालेल्या भाऊबंदकीचा किती भीषण शेवट झाला ! ये, आपल्या पित्याला वंदन कर." मग अंगदानें वालीस प्रणाम केला.

आतापर्यंत स्तब्ध असलेला सुग्रीव वालीच्या वधानें शोकाकुल झाला व रामाजवळ जाऊन म्हणाला, " हे राजा, भावाचा वध करून मिळालेलें हें राज्य मला नको ! त्याच्या वधामुळें मला घोर पातक प्राप्त झालें आहे ! वालीच्या दुःखानें अंगद शोकाकुल होऊन प्राणत्याग करील व त्याची माता तारा अंगदावांचून क्षणभरहि जीवंत राहणार नाहीं ! तेव्हां मी अग्नींतच प्रवेश करतों ! हे वानर सीतेचा शोध लावतील ! तूं मला अग्निप्रवेश करण्याला परवानगी दे ! " सुग्रीवाचें हें दुःख पाहून रामाच्याहि डोळ्यांत अश्रु आले. नंतर अमात्यांनीं तारेला वालीपासून दूर केलें. तेव्हां ती रामाला उद्देशून आक्रोश करूं लागली. " हे वीरा, ज्या बाणानें तूं माझ्या प्रिय पतीचा वध केलास, त्याच बाणानें माझा वध कर ! म्हणजे मी स्वर्गलोकीं त्याच्या भेटीस तरी जाईन ! " तेव्हां राम तिला म्हणाला, " हे वीरपत्नी, सर्व सुखदुःखें विधात्याच्या इच्छेप्रमाणें भोगावीं लागतात ! तरी तूं हा शोक सोडून दे ! शूराच्या बायका दुःख करीत बसत नाहींत ! " नंतर वालीचा अंत्यविधि करण्याची तयारी झाली. तार वानरानें पालखी आणली. तींत वालीचा देह

अलंकारादिकांनीं भूषित करून ठेवला. असंख्य रत्नें उधळीत पालखीपुढें वानर चालूं लागले. श्रेष्ठ वानरांनीं पालखी उचलून नेली. " हे वीरा ! हे वीरा ! " असा तारा–प्रभृति स्त्रियांचा विलाप चालू होता ! चंदनादि काष्ठांची चिता रचून व तिच्यावर वालीचा देह ठेवून चितेस अग्नि दिला. नंतर सर्व वानर दुःखानें किष्किंधेस परत गेले.

## ६. सुग्रीवास राज्याभिषेक

यानंतर मुख्य मुख्य वानर रामाभोंवतीं गोळा झाले. हनुमान् हात जोडून रामास म्हणाला, " हे प्रभो, सुग्रीवास हें प्रचंड राज्य तुझ्याच प्रसादानें प्राप्त झालें आहे ! आतां तूं सुग्रीवासह नगरींत प्रवेश कर, म्हणजे तो तुझी यथाविधि पूजा करील. सुग्रीवाचा राजा या नात्यानें वानरांशीं संबंध आणून दे. " हें ऐकून राम म्हणाला, " हे हनुमाना, चौदा वर्षे संपल्याखेरीज नगरांत प्रवेश न करण्याची मीं प्रतिज्ञा केली आहे. तरी सुग्रीवालाच नगरांत जाऊं दे व स्वतःस राज्याभिषेक करून घेऊं दे. " मग राम सुग्रीवाला म्हणाला, " हे सुग्रीवा, अंगदाला यौवराज्याचा अभिषेक कर. तो शौर्यांत वालीची बरोबरी करणारा असल्यामुळें या मानास पात्र आहे. हे पावसाळ्याचे दिवस आहेत. चार महिने तूं किष्किंधेंत रहा व मी लक्ष्मणासह पर्वताच्या गुहेंत वास्तव्य करतों. कार्तिक लागल्यावर तूं रावणास मारण्याची तयारी कर. " याप्रमाणें रामानें सांगितल्यानंतर सुग्रीवानें त्यास साष्टांग नमस्कार केला व तो सर्व वानरांसह नगरास गेला. तेथें सुग्रीवास यथाविधि राज्याभिषेक झाला. सर्व नद्या, तीर्थें व समुद्र यांचें सुवर्ण-कुंभांत उदक आणून त्या उदकानें सुग्रीवास शास्त्रोक्तपद्धतीनें अभिषेक झाला. सुग्रीवानें अंगदास आलिंगन दिलें व त्याला यौवराज्याचा अभिषेक केला. सर्व वानर आनंदित झाले. सुग्रीवाला त्याची भार्या रुमा पुनः प्राप्त झाली व तो आनंदांत काळ घालवूं लागला.

## ७. वर्षाऋतु-वर्णन

इकडे राम प्रस्रवण पर्वतावरील एका प्रशस्त गुहेंत लक्ष्मणासह वास करूं लागला. राम लक्ष्मणास म्हणाला, " हे लक्ष्मणा, ही गुहा रम्य व विशाल आहे. पावसाळा संपेपर्यंत आपण येथें राहूं. हें पर्वतशिखर रमणीय असून पांढऱ्या, काळ्या व लाल पाषाणांनीं युक्त असें आहे. या शिखराला मालती, कुंद, कळंब, अर्जुन,

साल-वगैरे वृक्षांनीं शोभा आली आहे. कमळांनीं भरलेलें हें सुंदर सरोवरहि येथून जवळच आहे. ईशान्येला उतरण व पश्चिमेला चढ असलेली ही गुहा जशी सुखदायक, तशीच, निवाऱ्याचीहि आहे. गुहेच्या उत्तरेस व दक्षिणेस एकेक उंच पर्वत शिखर आहे. गुहेभोंवतीं निर्मळ अशी पूर्व वाहिनी नदी वाहत आहे, ती तूं अवलोकन कर. हिच्या तीरावर नाना प्रकारचीं झाडें व वेलूंचीं बेटें आहेत. पक्षिगणांच्या शब्दानें ही नदी नादित झाली आहे. तींत निळीं, पांढरीं व लाल कमळें शोभत असून हंस, सारस व क्रौंच पक्षी तिच्या जलांत विहार करीत आहेत. येथून सुग्रीवाची किष्किंधा नगरी फार लांब नाहीं. आपण येथें आनंदानें राहूं." नंतर ते दोघे भ्राते प्रस्रवणावरील त्या गुहेंत वास्तव्य करूं लागले. तें स्थान रम्य असूनहि सीतेच्या विरहामुळें रामास सुखदायक वाटत नसे ! चंद्र उगवला असतां त्याला सीतेचें जोरानें स्मरण होई ! रात्रभर तो निद्रेवांचून तळमळत असे ! त्याचा शोक पाहून लक्ष्मण एकदां म्हणाला, "हे वीरा, आतां दुःख करणें सोड ! शोकामुळें सर्व इच्छा जागच्या जागीं राहतात ! तूं एकसारखा प्रयत्न चालूं ठेव, म्हणजे रावणाचा सपरिवार नाश झाल्यावांचून राहणार नाहीं ! सांप्रत हा वर्षाऋतु सुरूं झाला आहे. शरत्काल येईपर्यंत तूं वाट पहा. भस्माच्छादित अग्नीला आहुति देऊन ऋत्विज जसे त्याला प्रज्ज्वलित करतात, त्याप्रमाणें तुझ्या प्रसुप्त तेजाला मी जागृत करीत आहें !" लक्ष्मणाचें हें भाषण ऐकून राम म्हणाला, "हे लक्ष्मणा, भ्रात्यानें बोलावें, तसेंच तूं बोलत आहेस. मी शोक सोडून देऊन अकुंठित असें तेज अंगीं आणण्याचा प्रयत्न करतों ! वर्षाऋतु संपून नद्यांचीं जलें निर्मळ होण्याची मी वाट पाहतों."

सुग्रीवाला राज्याभिषेक होऊन राम--लक्ष्मण माल्यवान् पर्वतावर राहूं लागले असतां राम लक्ष्मणास म्हणाला, "पर्जन्यकाळ आला असून आकाश मेघांनीं व्याप्त झालें आहे. सूर्यकिरणांनीं समुद्रजल शोषून घेऊन नऊ महिने धारण केलेला जलरूप गर्भ नभोरूपी स्त्री टाकून देत आहे ! संध्याकाळच्या वेळीं तांबडें--पांढरें दिसणारें व पावसानें आर्द्र झालेलें आकाश पाहून असें वाटतें कीं, जखमी झालेल्या आकाशपुरुषाला कोणी ढगांच्यारूपानें पट्टयाच बांधल्या आहेत ! मंद वाहणारा वारा हाच ज्याचा निःश्वास, संध्याराग हेंच ज्याचें अंगाला माखलेलें रक्तचंदन आणि पांढुरके

ढग हेच ज्याचे फिकट गाल असा हा आकाशपुरुष कामी पुरुषाप्रमाणें दिसत आहे ! ढगांचें कृष्णाजिन व पर्जन्यधारांचें जानवें घातलेले हे पर्वत त्यांच्यावरील गुहांतून निघणाऱ्या वाऱ्याच्या आवाजामुळें वेदाध्ययन सुरू केलेल्या ब्रह्मचारी बटुंप्रमाणें दिसत आहेत ! हे लक्ष्मणा, पावसानें भिजलेल्या जमिनींतून वाफा निघत आहेत, धूळ नाहींशी झाली आहे, वारा शीतल झाला आहे, राजे लोकांच्या स्वाऱ्या बंद पडल्या आहेत आणि प्रवासी स्वगृहांकडे परतत आहेत. चक्रवाक पक्षी आपापल्या भार्यांसह मानस सरोवराकडे उड्डाण घेत आहेत. साल व कदंब यांच्या फुलांनीं युक्त आणि पर्वतांवरील धातूंनीं लाल झालेलें पावसाचें उदक नद्या वेगानें घेऊन जात आहेत. त्यांच्या खळखळाटांत मोरांचा उंच टाहो मिसळून अद्भुत शब्द कानांवर येत आहे. भुंग्यांसारखीं काळीं जांभळें वनचर भक्षण करीत आहेत. नवीन तृण उगवलें असून त्यावर तांबड्या रंगाचे इंद्रगोप कीटक इतस्ततः पसरले आहेत. यामुळें भूमातेनें लाल ठिपके असलेला हिरवा शालूच परिधान केला कीं काय, असें वाटत आहे ! निद्रा मंदगतीनें केशवाकडे जात आहे, नद्या समुद्राकडे वेगानें धांवत आहेत, बगळे आनंदानें मेघांकडे उडत आहेत आणि कामुक स्त्री प्रियकराकडे उत्कंठेनें गमन करीत आहे. सागरगर्जनेलाहि मागें टाकणारी गर्जना करून मेघ पृथ्वीला उदकमय करीत आहेत. पावसाच्या धों धों धारा पडत आहेत, सोसाट्याचा वारा वाहत आहे, पुरांनीं नद्यांचे कांठ ढांसळत आहेत व प्रवाशांच्या वाटा बंद झाल्या आहेत. जलधारांनीं धुवून गेलेल्या पर्वतांवरून वाहणारे उदकाचे प्रचंड लोट मोठमोठ्या पाषाणांमधून उंचीवरून कोसळत असल्यामुळें धबधबे निर्माण होत आहेत व त्यांनीं त्या पर्वतांना विशेषच शोभा येत आहे. हे लक्ष्मणा, सुग्रीव रुमेचा संयोग झाल्यामुळें या वर्षाऋतूंत आनंदानें काळ घालवीत असेल; परंतु राज्य व भार्या यांना मुकल्यामुळें माझी मात्र पुरांनीं तीर खचत गेलेल्या नद्यांसारखी अवस्था झाली आहे ! माझा शोक वाढत आहे, हे पावसाळ्याचे चार महिने दीर्घ भासत आहेत आणि महान् शत्रु रावण अजिंक्य वाटत आहे ! परंतु पावसानें मार्ग दुर्गम झाल्यामुळें सुग्रीवाला मी सध्यांच सीताशुद्धीसाठीं कांहीं खटपट करण्यास सांगितलें नाहीं ! पावसाळा संपल्यावर सुग्रीवाला माझ्या उपकारांचें स्मरण होऊन तो आपल्या वचनाला जागेल यांत शंका नाहीं ! " रामाचें हें भाषण ऐकून लक्ष्म-

णहि म्हणाला, " वानरराज सुग्रीव तुझा मनोरथ अवश्य सिद्धीस नेईल ! तूं शरदृतु येईपर्यंत धीर धर ! "

## ८. शरदृतु-वर्णन

विजा व मेघ नाहींसे होऊन रम्य चंद्रिकेनें युक्त असें निर्मल आकाश पाहून हनुमान् सुग्रीवाकडे गेला. मनोरथ पूर्ण झाल्यानें सुग्रीवाचें धर्म व अर्थ प्राप्त करून घेण्याकडे लक्ष नव्हतें. तो विषयोपभोगांत गढून गेला होता ! स्वतःची भार्या रुमा व तारा यांची त्याला प्राप्ति झाली होती ! मंत्र्यांवर त्यानें सर्व राज्यकारभार सोंपविला होता ! खुद्द मंत्र्यांनाहि त्याची भेट कष्टानेंच होत असे ! हें सर्व जाणून हनुमान् सुग्रीवाशीं बोलूं लागला, " हे वानरराजा, राज्य व यश तुला प्राप्त झालें आहे. मित्रकार्य तेवढें उरलें असून तें करणाऱ्या पुरुषाची नेहमीं उन्नति होत असते ! रामासाठीं जें कार्य करण्याची तूं प्रतिज्ञा केली आहेस, तें शेवटास नेण्याची वेळ आतां आली आहे ! रामाला कार्य सिद्धीस नेण्याची त्वरा असूनहि तो तुला त्याविषयीं कांहींच म्हणणार नाहीं ! परंतु रामाचा अतुल प्रभाव जाणून व तुझ्या कुलाच्या अभिवृद्धीला तो कारण होणार असल्याचें लक्ष्यांत घेऊन तूं त्याचें कार्य सत्वर हातीं घे ! तुझ्यावर त्यानें केलेले उपकार ध्यानांत आण ! तुझ्या पदरीं कोटयवधि वानर आहेत, त्यांना पाचारण कर. " हनुमानाचें हें विचारपूर्ण भाषण ऐकून सुग्रीवानें नील वानरास सर्व वानरसेना जमविण्याची आज्ञा केली. सुग्रीव म्हणाला, " माझी सर्व सेना, सर्व सेनापति व मुख्य सेनापति हे सत्वर येतील, अशी व्यवस्था कर. पंधरा दिवसांच्या आंत जो वानर येथें येणार नाहीं, त्याला प्राणदंड होईल, असें सर्वांना सांग ! " याप्रमाणें आज्ञा करून सुग्रीव अंतःपुरांत गेला.

शरदृतु प्राप्त झाल्याचें पाहून राम सीतेच्या शोधासाठीं अधीर झाला. आपलें कार्य साधून घेतल्यामुळें सुग्रीव बेपर्वा झाला आहे, सीतेचा पत्ता नाहीं व सैन्य जमा करण्याची वेळ निघून जात चालली आहे, हें पाहून राम अस्वस्थ झाला ! पर्वतशिखरावर बसून शरदृतूंतील निर्मल आकाशाकडे पाहत असतां त्याला सीतेचें स्मरण झालें व तो स्वतःशीं म्हणाला, " सारस पक्ष्याप्रमाणें स्वर असलेल्या सीतेची पूर्वी सारस पक्ष्याच्या शब्दामुळें करमणूक होत असे ! ती आतां आपलें मन कशानें रमवीत असेल बरें ? शरदृतूंतील निर्मल आकाश वगैरे पाहून सीतेला

माझ्या आठवणीनें अतिशय पीडा होत असेल ! " याप्रमाणें राम विलाप करीत असतां वनांतून फळें घेऊन येणाऱ्या लक्ष्मणाची त्याच्याकडे दृष्टि गेली. रामाच्या दुःखानें दुःखित झालेला लक्ष्मण त्यास म्हणाला, " हे आर्या, दुःखानें पौरुष व्यर्थ झाल्यास आपलें कार्य कसें सिद्धीस जाईल ? पौरुष-वृद्धीला कारणीभूत होणारें जें स्वकर्म तेंच तूं करीत जा ! तुझ्याशिवाय कोणालाहि सीता अनुकूल होणें शक्य नाहीं ! " हें ऐकून राम म्हणाला, " तुझें हें भाषण अत्यंत उचित आहे. फलाची अपेक्षा न ठेवतां कर्माचें अनुष्ठान केलेंच पाहिजे. " हें बोलत असतांना रामाचें मुख सीतेच्या स्मरणानें पुनः निस्तेज झालें व तो लक्ष्मणास म्हणाला, " हे लक्ष्मणा, जलवृष्टीनें वसुंधरेला तृप्त करून व धान्यें निर्माण करून इंद्रानें आपलें कार्य पार पाडलें आहे. मेघ वेगरहित झाले आहेत. मेघांचा, मोरांचा व वानरांचा शब्द आतां बंद झाला आहे. शरत्काल पुढें सरसावला असून त्यानें सांतवण ( सप्तपर्ण ) वृक्षाच्या फांद्या, सूर्य-चंद्र-तारे यांची प्रभा व मत्त हत्तींच्या क्रीडा यांत सौंदर्य विखरून ठेवलें आहे. अनेक वस्तूंच्या ठायीं विलसणारी सौंदर्यलक्ष्मी शरदृतूं-तील कांतीनें अधिकच खुलून कमलयुक्त सरोवरांच्या ठिकाणीं सांप्रत विशेष-रूपानें आविर्भूत झाली आहे. त्याचप्रमाणें, ही सौंदर्यलक्ष्मी मदमत्त गज, मदमत्त गो-समूह व निर्मल--जल--युक्त नद्या यांच्याहि ठायीं प्रादुर्भूत झालेली दिसते. आकाशांतील मेघ नाहींसे झाल्यानें पिसारा हाच अलंकार त्याचा त्याग करून व प्रियेविषयींची आसक्ति सोडून मयूर पक्षी वनांत ध्यानस्थ झाल्यासारखे भासत आहेत. सहाणेवर घांसलेल्या शस्त्रासारखें आकाश लखलखीत झालें आहे. वारा कमलगंध घेऊन व शीतल होऊन वाहत आहे. दिशा अंधारापासून मुक्त झाल्या आहेत. सूर्याच्या सौम्य उन्हामुळें चिखल नाहींसा झाला आहे. परस्परांशीं शत्रुत्व करणाऱ्या राजे लोकांच्या हालचाली सुरू होण्याचा काळ प्राप्त झाला आहे ! पावसाळ्यांत बिळांमध्यें दडून राहिलेले भयंकर विष धारण करणारे चित्र-विचित्र साप बाहेर पडूं लागले आहेत. प्रियपति चंद्र याच्या किरणरूपी हाताचा स्पर्श झाल्यामुळें आनंदित झालेली कामुक संध्यादेवी तारकारूप नेत्र उघडून ' अंबरा ' चा त्याग करीत आहे ! चंद्र हेंच जिचें प्रसन्न मुख, चांदण्या हेच जिचे नेत्र आणि चंद्रिका हीच जिचें धवल वस्त्र--अशी रात्र शुभ्र उत्तरीय परिधान केलेल्या

स्त्रीप्रमाणें भासमान् होत आहे ! परिपक्व झालेल्या साळींचीं लोंबरें खाऊन आनंदित झालेले सारस पक्षी हारीनें आकाशांत उडत आहेत. त्यांना पाहून ही वाऱ्यानें उडालेली पुष्पमालाच कीं काय, असें दृश्य दिसत आहे ! नद्यांचें स्वच्छ उदक, क्रौंच पक्ष्याच्या शब्दानें घुमणारें भाताचें शेत, हळूं हळूं वाहणारा वारा व निर्मल चंद्र--इतक्या वस्तु पावसाळा संपून शरत्काल आल्याचें सूचित करीत आहेत. उपभुक्त रमणी ज्याप्रमाणें प्रातःकाळीं मंदगतीनें चालतात, त्याप्रमाणें मत्स्यसमूहाचा कमरपट्टा धारण केलेल्या नद्या मंदगतीनें वाहत आहेत ! संगम समयीं नववधू ज्याप्रमाणें हलकेंच पतीला जघनप्रदेश दाखविते, त्याप्रमाणें शरदृतूंतील नद्या हळूं हळूं आपल्या कांठचीं वाळवंटें प्रगट करूं लागल्या आहेत ! हे लक्ष्मणा, राजांच्या स्वाऱ्या होण्याची ही वेळ असूनहि सुग्रीव मला भेटत नाहीं व त्याचा कांहीं प्रयत्नहि दृष्टीस पडत नाहीं ! पर्जन्यकाळचे हे चार महिने मला शंभर वर्षांसारखे दीर्घ वाटले ! अजूनहि सुग्रीवास माझी करुणा येऊं नये ना ! मुदत ठरवून सीतेचा शोध लावण्याचें त्यानें कबूल केलें असूनहि आपला कार्यभाग साधल्यामुळें त्या दुष्टाला आतां त्या गोष्टीचें स्मरण सुद्धां राहिलेलें नाहीं ! म्हणून तूं किष्किंधेस जा व त्या मूर्खाला आपल्या प्रतिज्ञेची आठवण दे ! त्याला असेंहि सांग कीं, 'वाली मरून ज्या मार्गानें गेला, तो मार्ग अरुंद नाहीं ! मीं एकट्या वालीचाच वध केला, पण सत्यापासून ढळल्यामुळें मी तुझा सपरिवार वध करीन !' हे लक्ष्मणा, सुग्रीवाला हा माझा निरोप जाऊन निवेदन कर !" रामाचें हें भाषण ऐकून लक्ष्मणाच्या मनांत सुग्रीवाबद्दल तीव्र संताप उत्पन्न झाला !

## ९. लक्ष्मणाचा कोप

लक्ष्मण रामाला म्हणाला, "हा वानर साधुवृत्तीनें वागणारा नाहीं ! तुझ्याशीं केलेलें सख्य रक्षण करण्याची त्यास विशेष उत्सुकता नाहीं ! म्हणून माझ्या हातून ठार होऊन तो आज वालीच्या भेटीस गेल्यावांचून राहणार नाहीं !" असें म्हणून धनुष्य घेऊन चालूं लागलेल्या लक्ष्मणास राम शांत करण्यासाठीं म्हणाला, "हे लक्ष्मणा, सुग्रीवास मारण्याचें पाप तूं करूं नकोस ! कठीण शब्द न बोलतां सीताशुद्धीची मुदत जात आहे, इतकेंच त्याला सांग !" मग लक्ष्मण किष्किंधेकडे निघाला. क्रुद्ध झालेल्या व लांब लांब पावलें टाकणाऱ्या लक्ष्मणास पाहून वानर

भयभीत झाले. किष्किंधेंत अंगदाची भेट होतांच लक्ष्मणानें त्याला आपण आल्याची सुग्रीवाला वर्दी देण्यास सांगितलें. अंगदानें त्याप्रमाणें सांगतांच सुग्रीवाची धुंदी तात्काळ उतरली! सुग्रीव आपल्या मंत्र्यांना म्हणाला, "मी कांहीं अनुचित बोलल्याचें वा केल्याचें मला स्मरत नाहीं! असें असतां लक्ष्मण क्रुद्ध कां व्हावा, हें मला समजत नाहीं." यावर हनुमान् म्हणाला, "हे वानरराजा, तुला कालाचें भान न राहिल्यामुळें मित्रप्रेमानें राम तुझ्यावर रागावलेला दिसत आहे! त्यानेंच लक्ष्मणास पाठविलें असावें! त्या उभयतांची कृपा संपादन करणें हेंच तुला इष्ट आहे!"

सुग्रीवानें लक्ष्मणास आंत येऊं देण्यास परवानगी दिली असतां तो सुग्रीवाच्या अंतःपुरांत येऊं लागला. घाबरलेला सुग्रीव तारेला म्हणाला, "तूं स्वतः लक्ष्मणास भेटून त्याला शांत कर. विशुद्ध मनाचा लक्ष्मण तुला पाहून रागावणार नाहीं! कारण महात्मे स्त्रियांवर रागवत नसतात! तूं शांत केल्यानंतर मग मी लक्ष्मणास भेटेन!" हें ऐकून तारा लक्ष्मणास सामोरी गेली व म्हणाली, "हे राजकुमारा, तूं कां रागावला आहेस? तुझी आज्ञा कोण मोडूं शकतो?" लक्ष्मण म्हणाला, "हे तारे, चार महिन्यांनीं सीतेचा शोध करण्याचा करार केलेला असूनहि विलासांत मग्न झालेला हा सुग्रीव कर्तव्य करणें विसरला आहे! तेव्हां आतां आम्हीतरी काय करावें, हें तूंच सांग." तारा म्हणाली, "हे राजपुत्रा, आपल्या माणसावर कोप करणें उचित नाहीं! त्यांतहि तुझ्यासारख्या श्रेष्ठ पुरुषानें क्षुद्र जीवावर क्रुद्ध होणें मुळींच योग्य नाहीं! आतांपर्यंत कसलेंच सुख प्राप्त न झालेला सुग्रीव तें सुख मिळालेलें पाहून त्यांत रमून गेला असल्यास नवल काय?"

याप्रमाणें बोलून तारेनें लक्ष्मणास अंतःपुरांत नेलें. सुग्रीव सिंहासनावर बसला असून वानरस्त्रिया त्याच्याभोंवतीं गोळा झाल्या आहेत, असा देखावा लक्ष्मणाला दिसला. त्याला पाहतांच सुग्रीवानें सिंहासनावरून उडी मारली व तो हात जोडून लक्ष्मणापुढें उभा राहिला. सुग्रीवाच्या स्त्रियांनींहि सिंहासनावरून पटापट उड्या मारल्या. लक्ष्मण सुग्रीवास म्हणाला, "कृतज्ञ व सत्यवचनी राजाच लोकांत मान्यता पावतो. उपकार करणाऱ्या मित्राला वचन देऊनहि तें न पाळणाऱ्या राजापेक्षां अधिक दुष्ट कोण असेल? ब्रह्मदेवानें म्हटल्याप्रमाणें, 'इतर सर्व पापाला प्रायश्चित्त आहे, पण कृतघ्नपणाला प्रायश्चित्त नाहीं!' हे वानरा, रामामुळेंच तूं या पदावर आला

असतांना त्याचे उपकार फेडण्यासाठीं सीतेचा शोध लावण्याचा प्रयत्न तूं करावयास नको होता काय ? रामाचा उपकार अजून तूं जाणत नसशील, तर माझ्या बाणानें तूं आतांच वालीच्या भेटीस जाशील. ज्या मार्गानें वाली गेला, तो मार्ग अरुंद खासच नाहीं !" संतप्त लक्ष्मणाचें हें भाषण ऐकून तारा म्हणाली, "हे लक्ष्मणा, असें निष्ठुरपणें बोलूं नकोस. सुग्रीव कृतघ्न नाहीं व कपटीहि नाहीं ! रामाचे उपकार तो विसरला नाहीं ! रामासाठीं सुग्रीव राज्याचा, रुमेचा व माझाहि त्याग करील ! तो रामाची सीतेशीं गांठ अवश्य घालून देईल ! रावणाजवळ एक महापद्म, तीन लाख व नव्याण्णव हजार सहाशें राक्षस आहेत ! सुग्रीवाच्या सहाय्याशिवाय रामाला रावणाचा वध करणें शक्य नाहीं ! वानरसेना जमविण्याचें काम सुग्रीवानें सुरू केलें आहे, तेव्हां हें सर्व जाणून तूं आपला राग सोड !" तारेचें हें धर्माला अनुसरून असें विनययुक्त भाषण ऐकून लक्ष्मण शांत झाला व सुग्रीवहि त्याला नम्रपणें म्हणाला, "हे लक्ष्मणा, रामानें माझ्यावर केलेले उपकार कोण कसे फेडूं शकणार ? पराक्रमी राम स्वतःच रावणाला मारील ! त्याला माझ्या सारख्याच्या साहाय्याची काय आवश्यकता आहे ? तथापि राम रावणावर चालून गेला असतां त्याच्याबरोबर मीहि अवश्य जाईन ! या दासाचा कांहीं अपराध घडला असल्यास क्षमा कर !" सुग्रीवाचें हें भाषण ऐकून लक्ष्मण संतुष्ट झाला व म्हणाला, "हे सुग्रीवा, तुझें साहाय्य मिळाल्यामुळें राम खचित विजयी होईल ! तूं रामाची बरोबरी करणारा आहेस. माझ्याबरोबर तूं चल व आपल्या त्या दुःखी मित्राचें सांत्वन कर ! माझ्या कठोर बोलण्याची तूंहि क्षमा कर." मग सुग्रीव हनुमानास म्हणाला, "हे वीरा, चारी दिशांना दूत पाठवून सर्व पृथ्वीवरील वानरांना येथें बोलावून आण. दहा दिवसांच्या आंत त्यांना येथें येण्याची आज्ञा कर ! जे विलंब करतील त्यांना देहांत शासन कर."

## १०. वानरसैन्याची जमवाजमव

सुग्रीवाची ही आज्ञा ऐकून हनुमानानें सर्व दिशांना वानर पिटाळले. नंतर रामाला भेटण्यासाठीं सुग्रीव पालखींत बसून निघाला. सुग्रीवावर शुभ्र छत्र धरलें असून शुभ्र चामरें वारलीं जात होतीं. समोर नगारे व शंख वाजत असून भाट स्तुति करीत होते. रामाच्या गुहेशीं येतांच सुग्रीव लक्ष्मणासह खालीं उतरला व हात जोडून

उभा राहिला. रामानें सुग्रीवास आलिंगन दिलें. मग राम म्हणाला, " योग्यवेळीं योग्य गोष्ट करतो, तोच खरा राजा होय! आतां उद्योगाचा समय प्राप्त झाला असून तूं आपल्या अमात्यांसह पुढील योजना निश्चित कर. " सुग्रीव म्हणाला, " माझें सर्व वैभव तुझ्यामुळेंच मला मिळालें आहे! तुझे हे उपकार मी कसा विसरेन? हे राघवा, देशोदेशींचे वानर आले आहेत व अजून येत आहेत. ते सर्व राक्षसांशीं लढण्याकरतां तुझ्याबरोबर येतील व रावणास मारून सीता तुला परत मिळवून देतील! " सुग्रीवाचें हें भाषण ऐकून रामानें त्याला कडकडून आलिंगन दिलें व तो म्हणाला, " हे सुग्रीवा, तुझ्यासारख्यानें मित्रावर प्रेम केल्यास त्यांत नवल काय? इंद्रानें पर्जन्यवृष्टि केली किंवा चंद्रानें रात्र उजळली, तर त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहींच नाहीं! तुझ्यामुळेंच मी सनाथ झालों असून युद्धांत शत्रूला जिंकणार आहें! " याप्रमाणें राम–सुग्रीव यांचें पुढील कार्यासंबंधीं मैत्रीचें संभाषण झालें.

## ११. वानरसैन्याची चारी दिशांस रवानगी

इकडे पृथ्वीवरील ठिकठिकाणचे वानर किष्किंधेंत गोळा झाले. बालसूर्यासारख्या तांबूस रंगाचे, चंद्रासारख्या गौरवर्णाचे व हिमालयासारख्या शुभ्रवर्णाचे वानर त्यांत होते. वानर, ऋक्ष व गोलांगूल असे कोट्यवधि सैनिक तेथें जमा झाले. किष्किंधेस आलेले वानर टणटणा उड्या मारीत व भुभुःकार करीत सुग्रीवाभोंवतीं जमा झाले. याप्रमाणें अगणित वानरसैन्य जमा झाल्यानंतर सुग्रीव रामाला म्हणाला, " हे रामा, हे बलाढ्य वानरवीर तळ देऊन राहिले आहेत. ते तुझ्या आज्ञेंत वागणारे असून तुझा मनोरथ सिद्धीस नेणारे असे आहेत. हे सर्व सैन्य तुझेंच असून त्याला तूं योग्य ती आज्ञा कर. " राम म्हणाला, " हे सुग्रीवा, प्रथम रावण कोठें राहतो व सीता जीवंत आहे किंवा नाहीं, याचा शोध घेतला पाहिजे. रावणाच्या प्रदेशाला गेल्यानंतर या सैन्याला जें काय सांगावयाचें, तें तुझ्या मदतीनें सांगतां येईल. हे वीरा, माझ्या कार्याचें महत्त्व तूं जाणतोस, यांत शंका नाहीं. " नंतर सुग्रीवानें चार दिशांना चार श्रेष्ठ वानरवीर इतर असंख्य वानरांसह रवाना केले. विनत नांवाचा वानर सुग्रीवानें पूर्व दिशेकडे पाठविला. दक्षिण दिशेकडे हनुमान्, अंगद, नील, जांबवान् वगैरे निवडक वानरवीर त्यानें पाठविले. पश्चिमेस तारेचा बाप सुषेण व उत्तरेस शतबल यांना मोठ्या सैन्यासह सुग्रीवानें जाण्यास सांगितलें. या

सर्वांना त्यानें एक महिन्याच्या आंत रावणाच्या प्रदेशाचा व सीतेचा शोध लावून परत येण्याची आज्ञा केली. एक महिन्यापेक्षां जो अधिक विलंब लावील, त्याला त्यानें देहांत शासन देण्याचें ठरविलें ! याप्रमाणें हे सर्व श्रेष्ठ वानरवीर आपल्या नेमून दिलेल्या दिशेकडे रवाना झाले. पूर्व, पश्चिम व उत्तर या दिशांना गेलेले वानर मुदतीच्या आंत जाऊन आले. परंतु ते सर्व हात हलवीतच परत आले ! प्रस्त्रवण पर्वतावर रामासह बसलेल्या सुग्रीवास पाहून या तीन दिशांना गेलेले वानर-वीर म्हणाले, " आम्ही सर्व पर्वत, अरण्यें, नद्या व समुद्रांतील बेटें शोधलीं. सर्व गुहा व लतागृहें धुंडाळलीं. इतरहि अवघड स्थानें शोधलीं. परंतु आम्हांस कोठेंहि रावण किंवा सीता यांचा पत्ता लागला नाहीं ! "

## १२. ऋक्षबिल विवरांत

इकडे हनुमान्, अंगद-वगैरे जे श्रेष्ठ वानरवीर दक्षिण दिशेला गेले होते, त्यांनीं विंध्य पर्वतांतील गहन अरण्यें, पर्वत शिखरें, नदीकांठ, गुहा वगैरे धुंडाळल्या. परंतु त्यांना कोठेंच रावण किंवा सीता यांचा पत्ता लागला नाहीं ! तेथून ते दुसऱ्या प्रदेशांत गेले असतां तो प्रदेश निर्जल असल्यामुळें कोरडा ठणठणीत होता ! तेथें नद्या, झाडें, प्राणी यांपैकीं कांहींच नव्हतें ! कंडु नामक ऋषि तेथें राहत असतां त्याचा मुलगा अकालीं निधन पावला, म्हणून त्यानें शाप दिल्यामुळें हा प्रदेश निर्जल झाला होता. याहि प्रदेशांत त्यांना सीतेचा शोध लागला नाहीं. तेव्हां अंगद निरुत्साही झालेल्या वानरांना म्हणाला, " तुम्ही आणखी शोध करा. निराश होऊं नका. सुग्रीव रागीट असून त्याचें शासन कडक आहे. सुग्रीवाला व रामाला आपण नेहमीं भ्यालें पाहिजे ! " अंगदाच्या या भाषणाला तहानलेल्या व शिणलेल्या गंधमादन वानर वीरानें दुजोरा दिला. मग ते सर्व वानर उठून विंध्य पर्वताच्या भोंवतालच्या अरण्यांत पुनः शोध करूं लागले. शोधतां शोधतां ते त्या पर्वताच्या नैऋत्य भागाला आले. यावेळीं किष्किंधेस परत जाण्याची एक महिन्याची मुदत संपून गेली होती ! तथापि त्यांनीं तो वनप्रदेश शोधण्याचें काम तसेंच चालू ठेवलें. एका ठिकाणीं ' ऋक्षबिल ' नांवाचें एक विवर दिसलें. तहानेनें व भुकेनें व्याकुळ झाल्यामुळें ते सर्व पाण्याच्या शोधांत होते. त्या विवरांतून हंस, सारस, क्रौंच वगैरे पक्षी पाण्यानें भिजलेले असे बाहेर पडत होते. त्यांना पाहून येथें सरोवर

असलें पाहिजे, अशी त्या वानरांची खात्री झाली ! म्हणून ते सर्वजण एकमेकांचा हात धरून त्या विवरांतून एक योजनपर्यंत चालत गेले. तहानेनें व भुकेनें ते सर्व व्याकुळ झाले होते ! जातांना सोन्याचीं झाडें व सोन्याचे वाडे दिसून आले. पुष्कळ चालून गेल्यावर त्यांना कृष्णाजिन व वल्कलें धारण केलेली एक तापसी दिसली. तिला हात जोडून हनुमान् म्हणाला, " तूं कोण आहेस व हें विवर कोणाचें आहे ? आम्ही तृषा व क्षुधा यांनीं व्याकुळ झालों आहोंत. " मग ती तपस्विनी म्हणाली, " मयानें उत्पन्न केलेलें हें सुवर्णवन आहे. हेमा नांवाच्या अप्सरेसह तो येथें राहत होता. मयाचा इंद्रानें वध केल्यानंतर हें सुवर्णवन हेमा अप्सरेला प्राप्त झालें. मी मेरुसावर्णीची स्वयंप्रभा नांवाची कन्या असून हेमा माझी सखी आहे. तिच्या सांगण्यावरून मी या स्थळाचें रक्षण करीत आहें. तुम्ही येथील फळें व मुळें भक्षण करा व जल प्राशन करा. " हें ऐकल्यावर त्या सर्व वानरांनीं फळें-मुळें भक्षण केलीं व यथेच्छ जल प्राशन केलें ! तापसीनें विचारल्यावरून त्यांनीं रामाची व आपली सर्व हकीकत सांगितली. नंतर ते वानर-वीर विवराबाहेर जाण्यास निघाले. त्या तपस्विनीनें सांगितल्याप्रमाणें त्यांनीं हातांनीं आपले डोळे झांकले आणि पुनः डोळे उघडून पाहतात, तों आपण विवराबाहेर आलों असून एका भयंकर समुद्राच्याजवळ उभे आहोंत, असें त्यांना आढळलें !

## १३. प्रायोपवेशन व संपातीची भेट

यावेळीं सर्व वानर भयभीत झाले होते. कारण, किष्किंधेस जाण्याची मुदत केव्हांच संपून गेली होती व वसंत ऋतु प्राप्त झाला होता. युवराज अंगद त्यांना म्हणाला, " हे वानरहो, आपली मुदत संपून गेली आहे ! आश्विन महिन्यांत आपण निघालों होतों ! आतां वसंत ऋतु प्राप्त झाला आहे ! सुग्रीवाचा कडक स्वभाव तुम्हांस ठाऊकच आहे ! तेव्हां यापुढें आपण काय करावें, याचा तुम्ही विचार करा. मुदत गेलेली आहे व सीतेचा शोध लागला नाहीं ! तेव्हां आपण असेंच गेल्यास सुग्रीव आपणांस क्षमा करणार नाहीं ! मला यौवराज्याचा अभिषेक सुग्रीवामुळें झाला नसून रामामुळें झाला आहे ! माझ्या बापाशीं घोर वैर करणारा सुग्रीव मला ठार केल्याशिवाय राहणार नाहीं ! म्हणून मी या समुद्रतीरावर प्रायोपवेशन करून प्राण देण्याचें ठरविलें आहे ! " अंगदाचें हें भाषण ऐकून सर्व वानर म्हणाले,

" कार्यसिद्धि न झाल्यामुळें सुग्रीव आमचा वध केल्याशिवाय खरोखरच राहणार नाहीं ! " तार वानर म्हणाला, " आपण या विवरांतच राहूं, म्हणजे आपणांला राम किंवा सुग्रीव यांचें भय राहणार नाहीं ! " सर्व वानरांस ही कल्पना पसंत पडली. परंतु हनुमान् म्हणाला, " हे अंगदा, येथें राहून तूं वेगळें वानरराज्य स्थापन करशील, हें खरें; परंतु हे सर्व वानर बायकामुलांना कायमचें सोडून तुझ्या राज्यांत सदैव कदापि राहणार नाहींत ! या ऋक्षबिलांत तूं वास केल्यास राम-लक्ष्मणांच्या बाणापुढें तुझें हें विवर क्षणभरहि टिकणार नाहीं ! आपण नम्रपणें सुग्रीवाकडे जाऊं, तो तुझा घात खचित करणार नाहीं ! तुझ्या मातेच्या मर्जीप्रमाणें तो वागणारा असून त्याला दुसरें अपत्यहि नाहीं, तरी तूं सुग्रीवाची भीति सोड ! " यावर अंगद म्हणाला, " मनाची शुद्धता व सौजन्य सुग्रीवाच्या ठायीं बिलकुल नाहीं ! ज्यानें ज्येष्ठ भ्रात्याच्या पट्टराणीचा स्वीकार केला, त्याला धर्माची पर्वा कोठली ? रामाचेहि उपकार जो विसरला, तो दुसऱ्याचे उपकार काय आठवणार आहे ? केवळ लक्ष्मणाच्या भीतीनें त्यानें आपणांस सीतेचा शोध करण्यासाठीं पाठविलें ! अशा त्या सुग्रीवाचा भरंवसा कोण धरणार ? मी येथेंच अन्न-पाणी सोडून प्राणत्याग करतों ! तुम्ही किष्किंधेस जाऊन राम, लक्ष्मण, सुग्रीव, रुमा व माझी माता तारा यांना माझे प्रणाम सांगा ! " इतकें बोलून तो अंगद दर्भांत शिरला व त्यांवर पडून राहिला. तेव्हां सर्व वानर रडूं लागले ! त्यांनींहि प्रायोपवेशनाचा निश्चय केला. सर्व वानरश्रेष्ठांनीं स्नान केलें व ते पूर्वेकडे तोंड करून दर्भांवर बसले.

ज्या पर्वतशिखरावर ते वानर प्रायोपवेशनासाठीं बसले होते, तेथें संपाति नांवाचा गृध्रराज आला. तो आपल्याशीं मोठ्यानें म्हणाला, " खरोखर दैवानेंच मला पुष्कळ दिवसांनीं हें भक्ष्य प्राप्त होत आहे ! प्रायोपवेशन करण्यासाठीं बसलेल्या या वानरांपैकीं जो जो मरेल, त्या त्या वानरांस मी खाऊन टाकीन ! " त्या गृध्राचें हें भाषण ऐकून अंगद हनुमानाला म्हणाला, " हे वायुपुत्रा, आपल्या हातून रामाचें कार्य शेवटास गेलें नाहीं व सुग्रीवाची आज्ञाहि पण पाळली गेली नाहीं ! अशा स्थितींत या गृध्राच्या भक्ष्यस्थानीं पडण्याची वेळ मात्र आपणांवर आली आहे. कैकेयीला दशरथानें दोन वर दिले, त्या अनर्थ परंपरेचा हा दारुण परिणाम होय ! " अंगदाच्या या भाषणांत रामाचा वृत्तांत थोडक्यांत येऊन जटायूचाहि उल्लेख आला

होता. तो ऐकून संपाति मोठ्यानें म्हणाला, " हे वानरांनो, जटायु माझा भ्राता असून त्याची हकीकत कळण्यास मी उत्सुक आहें ! तरी जटायूबद्दल तुम्हांस असलेली माहिती मला सांगा. तसेंच माझे पंख दग्ध झाल्यानें मला उडतां येत नाहीं ! तेव्हां तुम्हीं मला पर्वतशिखरावरून खालीं उतरून ठेवा." वानरांनीं संपातीला पर्वतशिखरावरून खालीं आणून ठेवलें व मग अंगदानें त्यास रामाचा व जटायूच्या मृत्यूचा सर्व वृत्तांत निवेदन केला.

जटायू मेल्याची बातमी ऐकून संपाति डोळ्यांत पाणी आणून वानरांना म्हणाला, " एकदां जटायु व मी आकाशांत उडत असतां सूर्यकिरणांनीं जटायु व्याकुळ झाला ! म्हणून त्याला मीं माझ्या पंखाखालीं घेतलें व त्याचें रक्षण केलें. त्यावेळीं माझे पंख जळून गेले ! " ही हकीकत सांगून संपाति पुढें म्हणाला, " दुरात्मा रावण एका स्त्रीला आकाशांतून नेत असतांना मीं प्रत्यक्ष पाहिला. ती स्त्री ' हे राम ! ' असा आक्रोश करीत होती. तेव्हां ती सीताच असली पाहिजे ! हा रावण विश्रव्याचा मुलगा व कुबेराचा भाऊ असून लंकेंत राहतो. लंका येथून शंभर योजनें अंतरावर समुद्रांत आहे. विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या त्या लंकेचे तट व वेशी सुवर्णाच्या आहेत. रावण व सीता हीं दोन्हीं मला येथून दिसत आहेत ! तुम्ही समुद्र ओलांडून जाण्याचा कांहीं उपाय शोधा, म्हणजे तुम्ही लंकेला अवश्य जाऊन पोंचाल. " संपातीनें रावण व सीता यांची सांगितलेली माहिती ऐकून वानरांना पराकाष्ठेचा आनंद झाला ! हें बोलत असतांच संपातीला पंख फुटूं लागले ! निशाकर नांवाच्या ऋषीच्या वरानें संपातीस पुनः पंख प्राप्त झाले. हा चमत्कार पाहून वानरांचा आनंद द्विगुणित झाला !

## १४. हनुमानाचें उड्डाण

नंतर सर्व वानर समुद्रतीरावर आले. त्यांना अंगद म्हणाला, " तुमच्यापैकीं हा समुद्र ओलांडण्यास कोण समर्थ आहे ? जो असेल, त्यानें सत्वर ही अभयदक्षिणा सर्वांना द्यावी ! " परंतु कोणीच वानरवीर समुद्रावरून शंभर योजनें उडून जाऊन लंकेस जाण्यास तयार होईना ! अखेर जांबवान् हनुमानास म्हणाला, " हे वीरा, तूं बोलत कां नाहींस ? पराक्रमांत तूं राम, लक्ष्मण व सुग्रीव यांच्या बरोबरीचा आहेस ! गरुड पक्षी महाभुजंगांना उचलून समुद्र ओलांडून जातांना मीं



हनुमान् उड्डाण करण्यासाठीं महेंद्र पर्वताच्या शिखरावर चढला.

अनेकदां पाहिला आहें ! त्याप्रमाणें तुला समुद्र ओलांडून जातां येणार नाहीं काय ? केसरी नामक वानराच्या अंजना नांवाच्या स्त्रीला तूं वायूपासून झालेला पुत्र आहेस ! अंजना ही पूर्वी पुंजिकस्थला नांवाची अप्सरा होती ! असा तूं अप्सरेला देवापासून झालेला तेजस्वी पुत्र आहेस ! ब्रह्मदेवानें व इंद्रानें तुला मोठमोठे वर दिलेले आहेत ! तेव्हां लंकेंत जाऊन सीतेला भेटून येण्याची कामगिरी तूंच अंगावर घे ! " जांबवानाचें हें भाषण ऐकत असतां स्वतःच्या सामर्थ्याची जाणीव होऊन हनुमान् प्रचंड रूप धारण करूं लागला ! त्रैलोक्य व्यापण्यासाठीं त्रिविक्रमावतार घेणाऱ्या नारायणासारख्या त्या हनुमानास पाहून सर्व वानर त्याची प्रशंसा करूं लागले. मग हनुमान् म्हणाला, " मी शीघ्रगामी वायूचा त्याच्या बरोबरीचा औरस पुत्र आहे ! मी मेरु पर्वताला न थांबतां एकाच वेळीं हजार प्रदक्षिणा करण्यास समर्थ आहें ! सर्व जग बुडवून टाकण्याचें माझ्यांत सामर्थ्य आहे ! मी उडूं लागलों असतां आपल्या वेगानें पर्वतांचें चूर्ण करीन व महासागराला आपल्यामागें ओढून आणीन ! मी आकाशांतून उड्डाण करीत असतां वृक्षलतांचीं फुलें एका रांगेत माझ्या मागें उडत येतील व आकाशांतील स्वातिमार्गाप्रमाणें तीं दिसूं लागतील ! हे वानरहो, तुम्ही हर्षित व्हा; कारण, मी सीतेचा शोध निश्चित लावून येतों ! " गर्जना करीत असलेल्या हनुमानाचें हें भाषण ऐकून सर्व वानर हर्षित व चकित झाले आणि त्याच्याकडे पाहूं लागले ! जांबवान् म्हणाला, " हे वीरा, तूं आपल्या ज्ञाति बांधवांचें दुःख नष्ट केलें आहेस ! आम्ही सर्व वानर तुझें मंगल करूं ! ऋषींच्या प्रसादानें व वृद्ध वानरांच्या आशीर्वादानें तूं महासागर ओलांडून जाशील ! तूं येईपर्यंत आम्ही तुझी वाट पहात राहूं ! आमचे प्राण तुझ्यावर अवलंबून आहेत ! " नंतर हनुमान् उड्डाण करण्यासाठीं महेंद्र पर्वताच्या शिखरावर चढला. उड्डाण करण्यापूर्वी त्यानें तो पर्वत हातांनीं आवळून धरतांच त्यावरील वृक्ष कंपित झाले, पाषाण गडगडूं लागले व पर्वतांतून त्याच्या आंतील उदकप्रवाह बाहेर वाहूं लागला ! त्या पर्वतावर विहार करणारे गंधर्व व विद्याधर पर्वत सोडून जाऊं लागले आणि त्यावर तपश्चर्या करणारे ऋषि त्रासून तेथून जाण्यास निघाले ! अशा प्रकारें बरोबरचे सहप्रवासी सोडून रस्ता चुकलेल्या एकाकी प्रवाशासारखा महेंद्र पर्वत खिन्न दिसूं लागला !

**– किष्किंधा कांड संपूर्ण –**

# सुंदर कांड



## १. हनुमानाचें गमन

रावणानें हरण करून नेलेल्या सीतेचा सिद्धचारणांच्या आकाशमार्गानें उड्डाण करून शोध करण्याचें हनुमानानें ठरविलें. प्रथम तो निर्मल धातूंनीं भूषित अशा एका श्रेष्ठ पर्वताच्या पृष्ठभागावर जाऊन उभा राहिला. पर्वकालीं वाढणाऱ्या समुद्राप्रमाणें त्यानें आपला देह दहा योजनां इतका वृद्धिंगत केला. त्याच्या भारानें तो पर्वत दबून, मत्त हत्तीच्या गंडस्थलांतून मदस्राव व्हावा, त्याप्रमाणें त्या पर्वतांतून जलप्रवाह बाहेर पडूं लागला. पर्वताच्या आंतील गुहांमधले प्राणी आर्तस्वर काढूं लागले आणि मस्तकावर स्वस्तिक चिन्ह असलेले महाभुजंग खवळून विषदंतांनीं दगडांना चावा घेऊं लागले. अग्नितुल्य तेजस्वी अशा त्या हनुमानानें अंग झाडून केस हालविले व मोठ्यानें गर्जना केली. तो आपलें केसाळ व जाड शेपूट वारंवार उचलून जमिनीवर आपटूं लागला. पक्षिराज गरुड ज्याप्रमाणें मरलेल्या सर्पाला वरचेवर उचलून खालीं आपटतो, त्याप्रमाणें हनुमानाची ती क्रिया भासत होती ! उड्डाण करण्यापूर्वी तो सोबतच्या वानरांना म्हणाला, "रामबाणाप्रमाणें वायूवेगानें मी लंकेला जाईन. पण सीता जर मला कोठें आढळली नाहीं, तर मी त्या राक्षसराज रावणालाच बांधून आणतों !" असें म्हणून त्यानें वेगानें उड्डाण केलें. त्यासरशीं भोंवतालचीं झाडेंहि उड्डाण घेऊं लागलीं ! त्या झाडांचीं फुलें हनुमानावर उडालीं असतां तो काजव्यांनीं व्याप्त अशा पर्वतासारखा दिसूं लागला. उडत असतांना वोटें पसरलेले त्याचे हात पांच फडांच्या नागांप्रमाणें शोभत होते. वर्तुलाकार पुच्छ व पांढरे शुभ्र दांत यांनीं युक्त असा तो हनुमान् भोंवतीं खळें पडलेल्या सूर्याप्रमाणें

भासत होता! त्याच्या उड्डाणामुळें पृथ्वीवरचा समुद्र अतिशय खवळून गेला. समुद्रांत पडलेली त्याची छाया शुभ्र मेघाप्रमाणें शोभत होती. हनुमानाला पाहून समुद्र मनांत म्हणाला, " इक्ष्वाकु-कुलाचा स्वामी सगरवंशज भगीरथ याच्यामुळें जान्हवी वगैरे नद्यांच्या पाण्यानें मी पुष्ट झालों, तेव्हां भगीरथाच्या कुळांतील रामाचें कार्य करणाऱ्या या कपिश्रेष्ठाला मीं साहाय्य केलें पाहिजे. " असा विचार करून समुद्रानें आपल्यामध्यें दडून बसलेल्या सुवर्णमय मैनाक पर्वताला म्हटलें, " हे पर्वत-श्रेष्ठा, तूं आकाशापर्यंत उंच हो आणि तुझ्या शिखरावर हनुमानाला कांहीं काळ विश्रांति घेऊं दे. " मैनाक पर्वत त्याप्रमाणें उंच होऊन आकाशाला जाऊन भिडला व त्यानें उडणाऱ्या हनुमानाला विसावा घेण्याची विनंति केली. परंतु उड्डाण केल्या-नंतर मध्यें थांबावयाचें नाहीं, अशी प्रतिज्ञा केल्यामुळें हनुमानानें ती विनंति साभार नाकारून त्या पर्वतराजास हातानें स्पर्श केला व तो पुढें निघाला.

हनुमानाचें सामर्थ्य अजमावण्यासाठीं देव, गंधर्व व सिद्ध यांनीं नागमाता सुरसा हिला त्यास अडविण्यास सांगितलें. यावर सुरसा प्रचंड ' आ ' पसरून हनुमानाच्या आड आली व त्याला म्हणाली, " मी तुला खाणार ! तूं माझ्या तोंडांत प्रवेश कर ! " हनुमान् म्हणाला, " मी मावेन, असें मोठें तोंड कर, म्हणजे मी तुझ्या मुखांत प्रवेश करतों ! " हनुमान् दहा योजनें लांब होता, तर सुरसा वीस योजनें लांब झाली ! तेव्हां हनुमान् केवळ अंगठ्या एवढा होऊन तिच्या तोंडांत शिरून लगेच बाहेर पडला व म्हणाला, " हे दाक्षायणि, नमस्ते ! मी आतां सीताशुद्धी-साठीं निघालों ! " नंतर तो पुढें गेला असतां त्याला सिंहिका नामक एका वृद्ध राक्षसीनें अडविलें व तिनें त्याची छाया पकडली. सिंहिकेनें त्याला गिळण्यासाठीं अक्राळ-विक्राळ रूप धारण केलें. तेव्हां हनुमानानें सूक्ष्म होऊन तिच्या मुखांत प्रवेश केला व तीक्ष्ण नखांनीं तिचें मर्मस्थळ विदारण केलें ! ती मरून समुद्रांत कोसळली ! हनुमान् उड्डाण करीत पुढें मार्गक्रमण करीत असतांना शंभर योजनें पार पडल्या-नंतर त्याला त्रिकूटाचलावर वसलेली लंका नगरी दिसली. तिला पाहतांच तो उड्डाण थांबवून त्या पर्वतावर थांबला व त्या नगरीचें अवलोकन करूं लागला.

## २. लंका-वर्णन

ती लंकानगरी नीळवर्ण तृणानें आच्छादिलेली जमीन व वृक्षांनीं झांकलेले पर्वत

यांनीं युक्त अशी होती. सुरू, पांगारे, कळंब वगैरे वृक्षांनीं ती फुललेली असून हंस व कारंडव हे पक्षी आणि उत्फुल्ल कमळें यांनीं विभूषित असे जलाशय तिच्यांत दिसून येत होते. ती विश्वकर्म्यानें मनानें निर्माण केली असून तिच्या भोंवतीं सुवर्णमय तट व वेशी होत्या. चिमुकल्या घंटिकांनीं शब्दायमान अशा पताका तेथें डुलत होत्या. तिच्या देवड्या वैडूर्यांच्या असून जमिनी रत्नमय होत्या. शरदृतूंतील मेघांसारख्या शुभ्र व उंच वाड्यांनीं व गच्च्यांनीं लंकेला अपूर्व शोभा आली होती. शस्त्रास्त्रें हातांत घेतलेले बलाढ्य राक्षस तिचें रक्षण करीत होते. यामुळें देवांनाहि ती अजिंक्य झाली होती ! अशा त्या लंका नगरीचें अवलोकन करीत हनुमानानें दिवस मावळूं दिला आणि रात्रीच्या वेळीं मांजराएवढें सूक्ष्म रूप धारण करून त्यानें त्या नगरींत सीताशुद्धयर्थ प्रवेश केला. त्यानें भलत्या वाटेनेंच लंकेच्या तटावर उडी घेतली आणि राजमार्गाला लागून त्या रमणीय नगरींतून तो जाऊं लागला.

हनुमानाला सर्वत्र हांसण्याचा व वाद्यांचा आवाज ऐकूं येऊं लागला. त्याला रत्नविभूषित जाळ्यांनीं शोभणाऱ्या हवेल्या दिसल्या. कोठें मधुर गायन, तर कोठें मंत्रजप त्याच्या कानांवर येऊं लागला. राजमार्गांवर राक्षसांची वर्दळ दिसून येत होती. मधल्या चौकांत रावणाचे अनेक हेर त्याच्या दृष्टोत्पत्तीस आले. एका पर्वतावर असलेल्या रावणाच्या भव्य गृहापाशीं हनुमान् येऊन ठेपला. रावण-गृहासभोंवतीं कमलयुक्त असा पाण्यानें भरलेला खंदक असून त्याच्या आंतून सुवर्णमय उंच तट होता. घोडे, हत्ती, रथ व विमानें यांनीं रावण--गृहाचीं दारें शोभत होतीं. गृहाच्या मधल्या चौकांत एक लक्ष राक्षस जय्यत तयार होते. रावणाचें गृह हिऱ्यामोत्यांनीं शृंगारलेलें असून चंदन व कालागरु यांच्या सड्यानें त्याची भूमि सुगंधित झाली होती.

त्यावेळीं आकाशाच्या मध्यभागीं चंद्रमा तळपत होता. चांदीच्या पिंजऱ्यांतील हंसच कीं काय, किंवा मंदर पर्वताच्या गुहेंत वसणारा सिंहच कीं काय, असा तो दिसत होता ! बांकदार कोरीनें युक्त अशा त्या चंद्राची शोभा तीक्ष्ण शिंगें असलेला वृषभ, अथवा शिखराचें टोंक वर आलेला पर्वत, अथवा सुवर्णानें शृंगारलेला दांत असलेला हत्ती यांच्याप्रमाणें दिसत होती ! चंद्रकिरणांनीं प्रदोषकालचा अंधःकार दूर झाला होता. आतांपर्यंत फिर फिर फिरूनहि हनुमानाला सीता कोठेंच आढळून आली नव्हती ! ब्रह्मदेवानें मनानें निर्माण केलेलो, रामाकडे दृष्टि लावून

त्याचेंच चिंतन करणारी, मोरामागून जाणाऱ्या मयूरीप्रमाणें रामाबरोबर वनास आलेली आणि रामाच्या वियोगानें अंधुक चंद्रलेखेप्रमाणें किंवा धूळ बसलेल्या सुवर्ण-रेषेप्रमाणें दिसणारी सीता दृष्टिपथांत न आल्यामुळें हनुमान् दुःखाकुल व निष्प्रभ झाला होता ! म्हणून रावणगृहांत तरी ती नजरेस पडेल काय, अशा कल्पनेनें त्यानें त्यांत बेधडक प्रवेश केला !

## ३. रावणाचें अंतःपुर

रावणाचें गृह एक योजन लांब व एक योजन रुंद होतें. त्याच्या मध्यभागीं रावणाचें अंतःपुर होतें. अंतःपुराजवळ रत्नखचित असें पुष्पक विमान होतें. हें पुष्पक विमान ब्रह्मदेवापासून कुबेराला प्राप्त झालें असून कुबेरापासून तें रावणानें जिंकून घेतलें होतें. रावणाच्या अंतःपुराचे जिने रत्नमय असून त्यांच्या जाळ्या सुवर्णाच्या होत्या. अंतःपुराच्या जमिनी स्फटिकाच्या होत्या. रावणाच्या राह-ण्याच्या जागीं हंसाप्रमाणें पांढऱ्या शुभ्र व अगरूनें धुपविलेल्या बैठकी टाकल्या होत्या. तेथील दिवे सोन्याचे होते. नाना प्रकारच्या अलंकारांनीं विभूषित अशा हजारों सौंदर्यसंपन्न स्त्रिया तेथें गालिच्यावर गाढ झोंपीं गेल्या होत्या. त्या अस्ताव्यस्त पडल्या असून त्यांचे हात वगैरे अवयव एकमेकींच्या अंगांवर पडले होते. त्या स्त्रियांना पाहून त्यांच्या बाहुरूपी सूत्रांत गुंफलेली ही स्त्रीरूप पुष्प-मालाच आहे कीं काय, असा भास होत होता ! तेथें तेवत असलेले सुवर्णदीप डोळ्यांचें पातें न लववितां त्या स्त्रियांकडे एकटक पाहत असलेल्या पुरुषांसारखे, वाटत होते ! हनुमानाला तेथें स्फटिकाचा रत्नविभूषित चौरंग दिसून आला. त्यावर अतिशय मौल्यवान् असा एक पलंग होता. त्याला चंद्रासारखा शुभ्र चांदवा असून त्यावर पुष्पमाला लोंबत होत्या. अशा त्या पलंगावर रा सराज रावण निद्रामग्न झालेला होता. त्याच्या मेघवर्णामुळें व विशाल देहांमुळें ही उडदाची रासच पडली आहे कीं काय, असा तो भासमान् होत होता ! रावणानें सुवर्णतंतूंनीं विणलेलें शुभ्रवस्त्र परिधान केलें असून पीतवर्ण उत्तरीय त्याच्या देहा-वर शोभत होतें. सुवासिक रक्तचंदनाची उटी त्याच्या अंगाला माखली होती. त्याच्या घोरण्याचा आवाज महाभुजंगाच्या फूत्कारासारखा वाटत होता ! राव-णाच्या पायथ्याशीं त्याच्या कांहीं स्त्रिया झोंपलेल्या होत्या. जवळच दुसऱ्या एका

पलंगावर एक अतिशय लावण्यवती स्त्री निद्राधीन झाली होती. ती हिऱ्यामोत्यांच्या दागिन्यांनीं नुसती फुलून गेली होती! तिचें सौंदर्य व वैभव पाहून हीच सीता असावी, असें हनुमानाला वाटलें आणि आपलें समुद्रोड्डाण सार्थकीं लागल्यासारखें वाटून त्यानें अत्यंत हर्षानें आपली शेपटी आपटली व तो तिचें वारंवार चुंबन घेऊन नाचूं-उडूं लागला!

परंतु हनुमानाचा हा आनंद फार काळ टिकला नाहीं! विचारान्तीं त्याचा तोच स्वतांशीं बोलूं लागला, " छे, ही सीता असणें शक्य नाहीं! कुलीन सीतेला अशी निवांत झोंप कशी येणार व ती अलंकार तरी कशी घालणार? प्रत्यक्ष इंद्र असला, तरी सीता परपुरुषाला वश होणार नाहीं!" असें म्हणून तो सीतेला शोधण्यासाठीं दुसरीकडे गेला. त्याला रावणाची पानभूमि लागली. तेथें नाना प्रकारचीं मद्यें व मांस सुवर्णपात्रांत ठेवलेलें आढळलें. रावणाच्या कितीतरी स्त्रिया तेथें मद्यपान करून निद्रामग्न होऊन पहुडलेल्या होत्या. पण तेथेंहि, अर्थात् सीतेचा शोध त्याला लागला नाहींच! नंतर हनुमानानें रावणाची चित्र-शाला, यज्ञशाला, क्रीडागृहें, भुयारें वगैरे सर्व ठिकाणें धुंडाळलीं. पण व्यर्थ! जनकनंदिनी सीतेचा त्याला कोठेंच पत्ता लागेना! तेव्हां तो दुःखातिरेकानें आपल्याशीं म्हणाला, " मीं सर्व लंका पालथी घातली, पण मला सीता कोठेंच दृग्गोचर झाली नाहीं! रावण तिला आणीत असतांना ती त्याच्या हातून सुटून समुद्रांत तर पडली नसेल? सीतेचा शोध न लावतांच मी जर किष्किंधेला गेलों, तर राम-लक्ष्मणांना काय सांगूं आणि सुग्रीवादि वानरश्रेष्ठांना तरी तोंड कसें दाखवूं? बिचारा राम तर निराशेनें प्राणत्यागच करील! तेव्हां हात हलवीत तसाच परत न जातां येथेंच समुद्रांत उडी घेऊन अगर चितेंत जाळून घेऊन मरून जावें, हें चांगलें!" याप्रमाणें स्वगत बोलत हनुमान् दुःख करूं लागला!

## ४. अशोकवनांत सीतेचें दर्शन

नंतर मनांत पुनः उत्साह आणून हनुमानानें रावणाच्या गृहावरून उड्डाण घेतलें व तो अशोकवनाच्या तटावर येऊन उभा राहिला. त्या अशोकवनांत अशोक, साल, आंबे वगैरे विविध प्रकारचे मोठमोठे वृक्ष होते. हरीण, मोर, कोकिल, भ्रमर इत्यादि पशुपक्षी व जीव त्या वनांत वास करीत होते. तेथील

वापी अमृतमय जलानें भरलेल्या असून त्यांच्या पायऱ्या रत्नांच्या व तळ स्फटिकांचे होते. त्यांच्या सभोंवतीं मोत्यांची व पोवळ्यांची वाळू पसरलेली होती. अशोकवनांत पाण्याचे लांब लांब पाट असून त्यांच्या दुतर्फा झाडें होतीं. तसेंच, त्यांत एक रमणीय पर्वत असून त्यावर दाट झाडी व गुहा होत्या. प्रियकराच्या मांडीवरून खालीं पडून लोळणाऱ्या रमणीप्रमाणें एक नदी त्या पर्वतावरून खालीं उडी घेऊन वाहत होती ! अशोकवनामध्यें जवळच कैलासासारखा एक शुभ्र वाडा होता. त्या ठिकाणीं मूळचें पीतवर्ण, पण जीर्ण व मलिन वस्त्र नेसलेली परंतु शुक्ल प्रतिपदेच्या चंद्रकोरीप्रमाणें झळकणारी एक स्त्री हनुमानाच्या अवलोकनांत आली. ती अत्यंत सुंदर असूनहि दुःखानें धुरांत झांकलेल्या अग्निज्वालेप्रमाणें किंवा मंगळ ग्रहानें पीडलेल्या रोहिणीप्रमाणें दिसत होती ! तिच्या पाठीवर सापासारखी काळीभोर वेणी सुटलेली होती. तिला पाहून हनुमान् स्वताशीं म्हणाला, " हीच सीता दिसते ! बिचारी संकटामुळें, जिचा अर्थ संशयास्पद आहे अशा स्मृतीप्रमाणें, किंवा नष्ट केलेल्या श्रद्धेप्रमाणें, किंवा विघ्नें आलेल्या सिद्धीप्रमाणें दिसत आहे ! हीच रामाची आवडती सीता असली पाहिजे. " याप्रमाणें आपल्याशीं बोलून हनुमान् सीतेची ती स्थिति पाहून अतिशय दुःखी झाला व त्याचे डोळे अश्रूंनीं भरून आले. तो पुनः स्वगत बोलूं लागला, " महान् पराक्रमी दशरथाची ही सून व धर्मज्ञ रामाची ही प्रियपत्नी आज राक्षसांच्या तावडींत सांपडली आहे ! आपल्या सहचराला मुकलेल्या चक्रवाकीप्रमाणें ही दीन झाली आहे ! पुष्पभारानें वांकलेले हे भोंवतालचे अशोकवृक्ष रामवियोगामुळें हिच्या शोकालाच कारणीभूत झाले असले पाहिजेत !" तो एवढें बोलत आहे, तोंच चंद्र आभाळांत वर आला व त्याला सीतेकडे नीट निरखून पाहूं शकतां आलें. अवजड ओझ्यामुळें एखादी नौका पाण्यांत जशी खचत जावी, तशी शोकभारानें खचलेली सीता हनुमाला दिसली ! सीतेच्या भोंवतीं तिच्यावर पहारा करणाऱ्या अक्राळविक्राळ राक्षसी वावरत होत्या. त्यांचें भेसूर स्वरूप आणि त्यांच्या हातांतील लोखंडी शूलासारखीं भयानक हत्यारें पाहून हनुमानाच्या अंगावर रोमांच उभे राहिले ! त्या राक्षसींच्या घोळक्यांत, क्रूर ग्रहांनीं घेरलेल्या रोहिणीप्रमाणें, सीता दिसत होती ! मलिन वस्त्र, मलिन केस व निस्तेज मुख यांमुळें ती पुण्यक्षय



अशोकवनांत सीतेचें दर्शन

होऊन आकाशांतून निखळलेल्या ताऱ्यासारखी हनुमानास वाटली! अखेर तिचा शोध लागला, यामुळें हर्षभरित होऊन तो झाडाच्या डहाळ्यांमध्यें लपून बसला.

## ५. रावणाची सीतेशीं भेट

आतां रात्र थोडी अवशिष्ट राहिली होती. यज्ञ करणाऱ्या वेदवेत्त्या ब्रह्मराक्षसांचा वेदध्वनि कानांवर पडूं लागला होता. अशावेळीं मंगल वाद्यांच्या निनादानें रावण निद्रेंतून जागृत झाला आणि सीतेविषयींच्या सतत विचारामुळें एकाएकीं तिच्याकडे जाण्यास निघाला. त्याच्याबरोबर त्याच्या शंभर स्त्रिया होत्या. त्यांतील कोणी अत्तरांचे सुवर्णदीप हातांत घेतले होते, तर कोणी रत्नमय मद्यपात्र घेऊन चालल्या होत्या. त्या स्त्रियांच्या घोळक्यांत राक्षसराज रावण धनुष्य नसलेल्या मदनासारखा शोभूं लागला! अमृतमंथनाच्या वेळीं क्षीरसागरावर आलेल्या पांढऱ्या फेसासारखें स्वच्छ वस्त्र तो सांवरीत चालला होता. रावणाला पाहतांच साध्वी सीता वाऱ्यानें हलणाऱ्या केळीसारखी कांपूं लागली! मांड्यांनीं उदर व बाहूंनीं वक्षःस्थल झांकून ती रुदन करूं लागली. मंत्रांच्या तावडींत सांपडलेल्या नागराजाच्या भार्येप्रमाणें, किंवा धूमकेतूनें आच्छादिलेल्या रोहिणीप्रमाणें ती भासत होती! प्रलयकालीं पेटलेली दिशाच कीं काय, किंवा पतितांनीं व्याप्त झालेली यज्ञवेदीच कीं काय, अशी सीता त्यावेळीं दिसत होती! उपवास, शोक, चिंता व भय यांच्या योगानें ती कृश व दीन झाली होती! अशा त्या सीतेला पाहून रावण मधुर शब्दांत तिला म्हणाला, " हे मैथिली, एक वेणी, भूमीवर शय्या, मलिन वस्त्र व उपवास यांचा तुला कांहीं उपयोग होणार नाहीं! तूं माझा स्वीकार कर आणि बहुमोल वस्त्रें, दिव्य भूषणें व उत्तमोत्तम खाद्यपेयें यांची प्राप्ति करून घे. मी आपलें हें राज्य तुला अर्पण करतों! किंबहुना, मोठमोठ्या नगरांनीं युक्त अशी ही संपूर्ण पृथ्वीच जिंकून तुझा पिता जनक राजा यांस अर्पण करतों! हे कल्याणि, वल्कलधारी, वनचर व व्रतस्थ रामाशीं तुला आतां काय कर्तव्य आहे? इतःपर राम तुझें दर्शन घेण्यासहि समर्थ नाहीं!" रावणाचें हें निष्ठुर भाषण ऐकून सीता दुःखाकुल झाली. गवताची काडी मध्यें टाकून ती त्याच्याकडे पाठ करून म्हणाली, " हे निशाचरा, परस्त्रीची इच्छा धरणाऱ्या पुरुषाच्या नाशास ती परस्त्रीच कारणीभूत होत असते! सूर्यापासून

जशी त्याची प्रभा भिन्न नसते, तशी मी रामापासून भिन्न नाहीं ! हे रावणा, उत्कृष्ट पेरांचे, भुजंगाप्रमाणें प्रदीप्त असलेले आणि राम-लक्ष्मणांचीं नांवें कोरलेले बाण लवकरच लंका नगरीवर पडतील व सर्व राक्षसांचा नाश करतील ! तो अनर्थ टाळावयाचा असल्यास तूं रामाशीं मैत्री कर ! "

सीतेचें हें अप्रिय भाषण ऐकून रावण अत्यंत क्रुद्ध झाला व तिला म्हणाला, " मला वश होण्यासाठीं मी तुला जी कालमर्यादा दिली आहे, ती संपूर्ण होण्यास अद्यापि दोन महिने आहेत ! तोंपर्यंत तूं मला वश न झाल्यास माझे आचारी माझ्या न्याहारीसाठीं तुझे तुकडे तुकडे करून टाकतील ! " रावणाच्या या भाषणावर सीता तेवढ्याच निग्रहानें म्हणाली, " तुला या निंद्य कर्मापासून परावृत्त करणारा या नगरींत तुझा हितेच्छु कोणीच दिसत नाहीं ! हे राक्षसाधमा, ज्याच्या तेजाला अंत नाहीं, अशा रामाच्या भार्येला उद्देशून पापशब्द उच्चारणारा तूं याचें प्रायश्चित्त भोगल्याशिवाय कसा सुटशील ? माझ्याकडे पापी दृष्टीनें पाहतांना तुझे घोर पिंगट डोळे कसे गळून पडले नाहींत ? आणि, अशी अभद्रवाणी उच्चारतांना तुझी जिव्हा कशी झडली नाहीं ? " सीतेच्या या निर्भर्त्सनेनें रावण कमालीचा क्षुब्ध झाला ! डोळे लाल करून सापाप्रमाणें तो सुस्कारे टाकूं लागला ! सीतेवर पहारा करणाऱ्या राक्षसींना उद्देशून तो म्हणाला, " साम, दान इत्यादि उपाय योजून ही मला वश होईल, असें तुम्ही सत्वर करा ! प्रसंग पडल्यास दंडहि उगारा ! " याप्रमाणें रावण बोलत असतांच धान्यमालिनी राक्षसी त्याला आलिंगन देऊन म्हणाली, " हे महाराजा, या कळकट व भिकारड्या मानव-स्त्रीशीं तुला काय कर्तव्य आहे ? तूं माझ्याशीं क्रीडा कर ! " हें ऐकून बलाढ्य रावण हंसला व तेथून निघून गेला.

## ६. सीता-विलाप

रावण जातांच सीतेजवळच्या सर्व राक्षसी तिच्या अंगावर धांवून गेल्या व कठोर वाणीनें तिच्याशीं बोलूं लागल्या ! " पुलस्त्याचा पुत्र श्रेष्ठ असा रावण भर्ता म्हणून तुला नको आहे, हें बरें नव्हे ! " असें त्या म्हणूं लागल्या ! एकजटा, हरिजटा, दुर्मुखी, विनता वगैरे राक्षसी तिला याच अर्थाचा उपदेश करूं लागल्या ! विकटा नामक राक्षसी तर " रावणाला वश हो, नाहीं तर, मी

तुझें हृदय फाडून टाकीन!" अशी धमकी सीतेला देऊं लागली! चंडोदरी नांवाची विक्राळ राक्षसी म्हणाली, " हिचें यकृत, गुल्म, हृदय व मस्तक करकर चावून खाण्याचा डोहळा मला झाला आहे!" प्रघसा व शूर्पणखा याहि असेंच भयंकर भाषण करूं लागल्या! तेव्हां सीता गद्गद वाणीनें म्हणाली, "तुम्ही मला खा कीं, माझें कांहींहि करा! मी कदापि तुमचें ऐकणार नाहीं!" असें म्हणून आपलें अंग आंखडून घेत सीता अशोकाच्या एका फांदीला धरून अश्रु गाळूं लागली. निराशेनें ती विलाप करूं लागली, "हे रामा, हे लक्ष्मणा, अहो सासूबाई, हे कौसल्ये, हे सुमित्रे! स्त्रीला अथवा पुरुषाला वेळ भरल्यावांचून मृत्यु येत नाहीं, ही म्हण खरीच आहे! रामाच्या वियोगानें मी इतकी दुःखी झालें असतां व या राक्षस-स्त्रिया माझा इतका छळ करीत असतां मी अजून जीवंत आहे! कांठोकांठ भरलेली नौका वादळानें समुद्रांत जशी नष्ट होते, तशी मी अनाथाप्रमाणें नाहींशी होईन! उदकाचा मार बसलेलें तीर जसें खचून जातें, तशी मी शोकानें खचून जात आहें! माझ्या हातून पूर्वजन्मीं कोणतें बरें पातक घडलें असेल? रामाची भेट होण्याची शक्यता नसल्यानें जीविताचा त्याग करण्याची इच्छा मी करीत आहें!" असें म्हणून उन्माद किंवा भ्रम झाल्याप्रमाणें सीता जमिनीवर लोळूं लागली असतां दमून लोळणाऱ्या शिंगीसारखी ती दिसूं लागली! ती पुनः विलाप करूं लागली, "माझें हृदय पाषाणाचें किंवा अमर आहे, म्हणूनच तें दुःखानें भग्न होत नाहीं! रामाचा वियोग झाला असतां क्षणभरहि जीवंत राहणें योग्य नसतां सुद्धां मीं अद्यापि जीव धरून आहें, तेव्हां मला चांडाळणीला धिःकार असो! निशाचराला डाव्या पायानेंहि मी कधीं स्पर्श करणार नाहीं, तेव्हां निशाचर रावणाची इच्छा मला कशी होणार? हे राक्षसींनो, तुमची ही बडबड वायफळ आहे! माझे तुकडे तुकडे झाले, किंवा मला जिवंत जाळलें, तरी मी रावणाचा स्वीकार करणार नाहीं! रघुनंदन राम शहाणा, कृतज्ञ, दयाळु व सद्वर्तनी असतां मला नेण्यासाठीं येत नाहीं, तेव्हां तो निर्दय झाला कीं काय, अशी शंका मला येत आहे! छे, पण असेंहि असूं शकेल कीं, मी येथें आहें, हें लक्ष्मणाच्या त्या श्रेष्ठ भ्रात्याला कदाचित् ठाऊकहि नसेल! एरवीं, त्या तेजस्वी रामानें हा अपमान

कसा सहन केला असता? रामाला माझा शोध लागतांच तो रावणाचा नाश केल्याशिवाय खचित राहणार नाहीं!" याप्रमाणें सीता परोपरीनें शोक करूं लागली.

इतक्यांत त्रिजटा नांवाची वयस्क राक्षसी इतर राक्षसींना म्हणाली, "हे दुष्ट राक्षसींनो, सीतेला भक्षण करणें तुमच्या हातून कदापि होणार नाहीं! कारण, राक्षसांच्या नाशाचें व रामाच्या अभ्युदयाचें सूचक असें स्वप्न मीं आज अवलोकन केलें आहे!" असें म्हणून त्रिजटेनें रावणाचा सपरिवार नाश होऊन सीता रामाला प्राप्त झाल्याचें स्वप्न त्यांना कथन केलें! तें ऐकून सीतेला धीर आला व तिनें आपला शोक आवरला!

## ७. हनुमानाची सीतेशीं भेट

हा सर्व प्रकार हनुमान् जवळच असलेल्या शिसवीच्या झाडावर बसून पाहत व ऐकत होता. तो आपल्याशीं म्हणाला, "साध्वी सीतेचें जर मीं आत्तांच सांत्वन केलें नाहीं, तर ती जीविताचा त्याग करील, याविषयीं मला मुळींच शंका नाहीं! या राक्षसी बाजूला गेल्या आहेत, तेव्हां सीतेशीं बोलण्यास ही उत्तम संधि आहे. मी जरी वानर असलों, तरी मानवाच्या संस्कृत वाणीनेंच तिच्याशीं बोलतों." याप्रमाणें विचार करून फक्त सीतेलाच ऐकूं जाईल, अशा रीतीनें हनुमानानें रामकथा प्रथमपासून सांगण्यास सुरुवात केली.

रामकथा ऐकून जरी सीतेला आनंद झाला, तथापि हें कोण व कशासाठीं सांगत आहे, याचें आकलन न होऊन ती पुनः दुःखी कष्टी झाली! तेव्हां हनुमान् आपल्या स्थानावरून आणखी जवळच्या फांदीवर आला व हात जोडून "हे कल्याणि, जनककन्या व रामपत्नी सीता ती तूंच ना?" असें तिला विचारूं लागला. तेव्हां सीतेचा संशय नष्ट होऊन तिनें आपला सर्व वृत्तांत हनुमानास कथन केला. नंतर हा वानरवेषधारी रावण तर नसेल ना, किंवा हा आपणास उन्माद तर झाला नसेल ना, अशी शंका सीतेला आली आणि ती क्षणभर स्तब्ध बसली! तेव्हां हनुमानानें आपण रामाचा दूत असून तिच्याच शोधासाठीं लंकेस आलों, असें परोपरीनें तिला सांगितलें व तिचा संशय दूर केला. सीतेची आणखी खात्री पटावी म्हणून त्यानें रामाच्या व लक्ष्मणाच्यादि शरीराचें इत्थंभूत वर्णन केलें. तें ऐकून हा खराच रामदूत होय, याविषयीं सीतेला

शंका उरली नाहीं. त्यानें तिची खात्री पटविण्याचा शेवटचा रामबाण उपाय म्हणून रामाची त्याचें नांव कोरलेली अंगठी सीतेच्या हातीं दिली. ती पाहतांच सीतेला जणूं काय रामाची भेट झाल्यासारखा आनंद झाला! ती हनुमानाला म्हणाली, " हे वानरश्रेष्ठा तूं एकट्यानें लंकेंत प्रवेश केला, तेव्हां तूं मोठा पराक्रमी, समर्थ व बुद्धिमान् आहेस, यांत शंका नाहीं! रामानें खात्री करून तुला पाठविलें आहे, तेव्हां तूं माझ्याशीं संभाषण करण्यास योग्य आहेस! रामाचें कुशल आहे ना? माझी मुक्तता करण्यासाठीं तो पुढील उद्योग करीत आहे ना? मी दूर झाल्यामुळें त्याचें प्रेम नाहींसें झालें नाहीं ना? रामाच्या भयंकर अस्त्रांच्या योगानें रावण परिवारासह मृत झालेला मी लवकरच अवलोकन करीन ना?" यावर हनुमान् म्हणाला, " रामाला तूं येथें असल्याचें ठाऊक नाहीं, म्हणूनच तो यापूर्वी येथें आला नाहीं! माझ्याकडून त्याला तुझी हकीकत कळतांच तो ऋक्ष व वानर यांची प्रचंड सेना बरोबर घेऊन येथें येईल आणि राक्षसांचा नाश करून तुझी मुक्तता करील! हे वैदेही, फळें व मुळें यांची आणि मंदर, मलय, विंध्य, मेरु व दर्दूर या पर्वतांची शपथ घेऊन मी तुला सांगतों कीं, तूं रामाला लौकरच येथें अवलोकन करशील!" नंतर सीता म्हणाली, " हे वानरा, दुष्ट रावणानें मला वश होण्याची एक वर्षाची मुदत दिली होती. तिच्यांतील दहावा महिना सुरूं असून फक्त दोन महिने आतां शिल्लक उरले आहेत! रामानें येथें येण्याची त्वरा न केल्यास त्याच्याशीं माझी भेट होणें अशक्य आहे!"

सीतेच्या या भाषणावर हनुमानानें तिला आपल्या पाठीवर बसून किष्किंधेस रामाकडे येण्याची आग्रहानें सूचना केली. परंतु सीता म्हणाली, " वानरश्रेष्ठा, रामावांचून कोणासहि आपण होऊन स्पर्श करण्याची माझी इच्छा नाहीं! रावणानें मला बलात्कारानें आणलें, तेव्हां त्याचा स्पर्श मला झाला; पण तो माझ्या इच्छेविरुद्ध झाला आहे! याखेरीज, रामानें रावणाचा वध करून मला नेणें हें त्याच्या पराक्रमास शोभण्यासारखें आहे! तेव्हां मी तुझ्या पाठुंगळीस बसून येऊं शकत नाहीं!" हें भाषण ऐकून हनुमानानें तेथून जाण्यापूर्वी सीतेला रामास ओळखतां येईल, अशी कांहीं खूण देण्याची विनंती केली. तेव्हां सीतेनें पदरांत

बांधून ठेवलेलें एक दिव्य व शुभ्र शिरोरत्न हनुमानाच्या स्वाधीन केलें. तें त्यानें आपल्या बोटास घट्ट बांधून ठेवलें आणि सीतेला प्रदक्षिणा घालून तो जाण्यास निघाला. तेव्हां डोळयांत अश्रु आणून त्याला ती म्हणाली, " हे वीरा, तूं आणखी एक दिवस थांबून विश्रांति घे! तुझ्या थांबण्यानें मला तेवढेंच समाधान होईल!" सीतेची ही सूचना हनुमानानें आनंदानें मान्य केली आणि तो तेथून चालता झाला.

## ८. अशोकवनाचा विध्वंस

जातां जातां हनुमानानें असा विचार केला कीं, आपण सीतेचा शोध तर लावलाच, परंतु शत्रूचा व आपला युद्धप्रसंग प्राप्त झाला असतां त्याच्यांत व आपल्यांत विशेष तें काय आहे हें नीट समजल्यास त्याचा पुढें अतिशय उपयोग होणार आहे. तेव्हां तें समजण्यासाठीं शत्रूचें बलाबल अजमावण्याचा त्यानें निश्चय केला आणि नंदनवनाच्या तोडीचें तें अशोकवन विध्वंसून टाकण्याचें ठरविलें! मनांत विचार येण्याचाच अवकाश, तो लगेच अमलांत आणण्यास हनुमानानें आरंभ केला! त्यानें आपल्या मांड्यांच्या वेगानें वृक्ष उलथे-पालथे केले! तेथील जलाशय फोडून टाकलें व दिसण्यांत मनोहर अशा पर्वत शिखरांचे तुकडे तुकडे केले! अशा रीतीनें हनुमानानें पाहतां पाहतां त्या अशोकवनाचा पुरता विध्वंस केला! फक्त जेथें सीता बसली होती तेथील भाग मात्र त्यानें वगळला!

## ९. राक्षसांचा नाश

अशोकवनांतील मोडून पडणाऱ्या झाडांच्या कडकडाटानें व तेथील पक्ष्यांच्या कलकलाटानें हनुमानाचा तो पराक्रम लवकरच सर्वांस विदित झाला! सीतेचें रक्षण करणाऱ्या राक्षसींनीं हनुमानाचा पर्वताकार देह पाहून त्यांना हा सीतेच्या परिचयाचा तर कोणी नसेल ना, अशी शंका आली! म्हणून त्याच्याबद्दल त्या सीतेला प्रश्न विचारूं लागल्या. परंतु सीता कानांवर हात ठेवून मोकळी झाली! नंतर त्या राक्षसी पळत पळत रावणाकडे गेल्या व त्यांनीं त्याला झालेला प्रकार निवेदन केला. तें कळून रावणाच्या अंगाचा भडका उडाला! दिव्यापासून जसे

जळते थेंब पडावे, तसे रावणाच्या नेत्रांतून क्रोधाचे अश्रुबिंदु पडूं लागले! त्यानें किंकर नामक ऐंशी हजार राक्षसांना मुद्गर, शूल, गदा, बाण--वगैरे आयुधें घेऊन हनुमानाचा बंदोबस्त करण्यासाठीं पाठविलें. त्यांना पाहतांच हनुमानानें आपलें शरीर आणखी वाढवून भूमीवर पुच्छ आपटलें व प्रचंड गर्जना केली. तोंच ते किंकर राक्षस त्याच्यावर धांवून जाऊन त्यांनीं त्याला वेढून टाकलें. यावेळीं हनुमान् वेशीवर बसलेला होता. त्यानें लगेच वेशीवरची एक लोखंडी कांब हातांत घेतली व त्या राक्षसांचा निःपात केला! थोडेसे बचावलेले राक्षस तेथून पळून गेले व त्यांनीं ही वार्ता रावणास कथन केली.

किंकरांचा वध केल्यानंतर हनुमान् आपल्या मनाशीं म्हणाला, "मीं या वनाचा तर विध्वंस केला. परंतु या राक्षसांच्या कुलदेवतेचें देवालय अजून कायम आहे! तेव्हां त्याचा आतां मी विध्वंस करतों!" असें म्हणून त्या हनुमानानें भयानक शब्द करून निर्भयपणें दंड थोपटले. त्या आवाजानेंच देवालयाचे कांहीं रक्षक मूर्च्छित पडले! इतर रक्षक त्याच्यावर तुटून पडले असतां त्यानें देवालयाचा एक मोठा स्तंभ उपटला व तो स्तंभ हनुमान् गरगरा फिरवूं लागला. तो स्तंभ इतर स्तंभांवर घासतांच अग्नि उत्पन्न होऊन ते देवालय जळूं लागलें! त्या आगींत शेंकडों राक्षसांचा फडशा उडाला!

नंतर रावणाच्या आज्ञेनें बलाढ्य जंबुमाली राक्षस हनुमानावर पाठविण्यांत आला. त्यालाहि त्यानें यमसदनास पाठविलें! नंतर अस्त्रविद्यापारंगत असे अग्नि-तुल्य सात अमात्यपुत्र रावणाच्या आज्ञेनें हनुमानावर चालून गेले. परंतु त्यांचाहि तसाच शेवट झाला! यानंतर रावणानें विरूपाक्ष–वगैरे पांच सेनानायक हनुमानास पकडून आणण्यासाठीं पाठविले. हे सेनानायक प्रचंड सैन्य घेऊन गेले होते. परंतु हनुमानानें त्यांची ससैन्य तशीच वाट लावली व तो पुढें कोण येतो, याची वाट पहात वेशीवर जाऊन बसला! पांचहि सेनानायक नष्ट झाल्याचें कळल्यावर रावणानें आपला अक्ष नामक पुत्र सैन्यासह पाठविला. त्याचाहि हनुमानानें चक्काचूर केला व तो पुनः वेशीवर चढून वाट पाहत बसला!

# १७. लंकादहन

अखेर, रावणानें आपला सर्वांत पराक्रमी पुत्र इंद्रजित् याला शत्रूचा बंदोबस्त करण्यास जाण्याची आज्ञा केली. रावणाला प्रदक्षिणा घालून इंद्रजित रथांत बसून सैन्यासहवर्तमान हनुमानावर चालून गेला. इंद्रजित् व हनुमान् यांचें अपूर्व असें द्वंद्व-युद्ध दीर्घकाल झालें. पण कोणीच कोणास हार जाईना ! शेवटीं इंद्रजितानें हनुमानावर अमोघ असें ब्रह्मास्त्र सोडलें. त्यानें हनुमान बांधला गेला ! लगेच राक्षसांनीं पुढें सरसावून हनुमानास तागाच्या व झाडाच्या सालीच्या दोऱ्यांनीं घट्ट बांधलें. त्याला दोऱ्यांनीं बांधतांच ब्रह्मास्त्र सुटलें. परंतु रावणास समोरासमोर भेटण्याची उत्सुकता असल्यामुळें हनुमानानें आपणांस रावणाकडे बांधून नेऊं दिलें ! त्याला पाहतांच रावणानें मंत्र्याकडून त्याची माहिती विचारली. तेव्हां आपण सुग्रीवाचा दूत असून त्याच्याकडून आलों असल्याचें हनुमानानें सांगितलें. रावणाचें अपूर्व वैभव पाहून हनुमान् देखील विस्मित झाला! तो रावणाला म्हणाला, " माझा स्वामी सुग्रीव याच्या आज्ञेवरून त्याचा मित्र प्रभु रामचंद्र याची पत्नी सीता हिचा शोध घेण्यासाठीं शंभर योजनें समुद्र ओलांडून मी येथें आलों आहें ! सीता लंकेंत असल्याचें मीं प्रत्यक्ष अवलोकन केलेलें आहे ! तेव्हां सर्वकालीं हितकर व शास्त्रसंमत असें तुला मी सांगतों कीं, तूं सीता रामाला देऊन टाक ! सीतेच्यारूपानें तुझ्या घरांत पांच फडांची नागीणच वास करीत आहे, असें तूं समज ! रामाचा अपकार करून प्रत्यक्ष इंद्रहि सुखी होणार नाहीं, मग तुझ्यासारख्या यःकश्चित् सामान्य जनाची गोष्ट काय ? " हनुमानाचें हें उर्मट उत्तर ऐकून रावण क्रोधसंतप्त झाला व त्यानें त्याचा वध करण्याची आज्ञा केली ! परंतु त्याचा भ्राता बिभीषण त्याला म्हणाला, " हे राजा, दूताचा वध करणें राजधर्मास विहित नाहीं. शिवाय, वानर हा तर मूलतःच अवध्य आहे ! " बिभीषणाचें हें भाषण रावणास मान्य झालें आणि त्यानें हनुमानास वधाऐवजीं शेपूट जाळलें जाण्याची शिक्षा फर्मावली ! लगेच राक्षसांनीं हनुमानाच्या शेपटीस चिंध्या गुंडाळल्या व त्या पेटवून दिल्या ! नंतर राक्षसांनीं शंख व नगारा वाजवीत हनुमानाची नगरांतून धिंड काढली ! इतक्यांत

हनुमानानें एकाएकीं आपले पाश तोडून टाकले आणि वेशीवर उडून त्यानें भयंकर गर्जना केली! वेशीवरील लोखंडी कांब घेऊन त्यानें राक्षसांचा फडशा पाडला आणि बिभीषणाचा वाडा सोडून इतर सर्व लंका पेटलेल्या शेपटीनें जाळून टाकण्यास प्रारंभ केला! तो या वाड्यावरून त्या वाड्यावर सारखा उडत जाऊं लागला! सर्व लंकानगरी धडधडा पेटूं लागली! तिच्यांतील पुरुष, स्त्रिया व मुलें एकच आकांत करूं लागलीं! प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें ती आग दिसूं लागली! आकाशाला जाऊन भिडलेल्या आगीच्या ज्वाला पळसाच्या फुलांसारख्या तांबड्या लाल दिसूं लागल्या आणि धुराचे लोट नील कमलांसारखे किंवा कृष्णमेघांसारखे दिसूं लागले! याप्रमाणें सर्व लंका दग्ध केल्यावर त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें आपल्या पुच्छाचा अग्नि समुद्रामध्यें विझविला.

एवढ्यांत सीतेचें स्मरण होऊन हनुमान् मनांत म्हणाला, "लंकादहन करून मीं हें काय केलें? ज्या अर्थी सर्व लंका दग्ध झाली आहे, त्याअर्थी साध्वी सीताहि दग्ध झालीच असेल. तिचा विचार न करतां आग लावणाऱ्या मला धिःकार असो!" असा दुःखदायक विचार हनुमानाच्या मनांत येत आहे, तोंच पळत सुटलेल्या राक्षस स्त्रिया, बाल व वृद्ध यांच्या तोंडून "अहो, सर्व लंकानगरी दग्ध झाली, पण सीता मात्र दग्ध झाली नाहीं, हें केवढें आश्चर्य!" हे अमृततुल्य उद्गार त्याच्या कानीं आले! तेव्हां त्याला अत्यंत आनंद होऊन तो सीतेला भेटण्यासाठीं पुनः अशोकवनांत आला.

## ११. हनुमानाचें प्रयाण

शिसवीच्या झाडाखालीं बसलेल्या सीतेस प्रणिपात करून हनुमानानें तिला लंकादहनाचा--वगैरे सर्व वृत्तांत कथन केला. नंतर सीतेचा निरोप घेऊन व तिला धीर देऊन परत समुद्र ओलांडून जाण्यासाठीं तो अरिष्ट पर्वतावर चढला! त्या पर्वतावर नीलवर्ण वनराजी असल्यामुळें त्यानें नीलवस्त्र परिधान केलें आहे कीं काय, असें वाटत होतें! त्याच्या शिखरावर लोंबणाऱ्या मेघांच्यारूपानें तो उत्तरीय वस्त्र घेतल्यासारखा दिसत होता! इतस्ततः उडालेल्या धातूंच्या योगानें तो पर्वत जसा कांहीं डोळेच उघडीत आहे कीं काय, असा भास होत होता!



त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें आपल्या पुच्छाचा अग्नि समुद्रामध्यें विझविला.

उंच देवदार वृक्षांच्या योगानें तो पर्वत हात वर करून उभा असल्यासारखा वाटत होता! वेळूंच्या बेटांत वारा शिरून जो आवाज होत होता, त्याच्या योगानें तो पर्वत जणूं काय अलगुजें वाजवीत असल्यासारखा भास होत होता! महा-भुजंगांच्या योगानें तो पर्वत रागानें फुस्कारे टाकीत आहे कीं काय, असें वाटत होतें! अशा प्रकारच्या त्या अरिष्ट पर्वतावर वायुसुत हनुमान् आरूढ झाला. पर्वत-शिखरावरील त्याच्या पायाखालीं सांपडलेल्या शिळा फुटून चूर झाल्या! तेथून हनुमानाला विस्तीर्ण समुद्र दृग्गोचर झाला. हनुमानानें उच्च स्वरानें गर्जना करून आपलें शेपूट हलविलें व गरुडानें अवलंबन केलेल्या आकाशमार्गानें त्यानें उड्डाण केलें. त्या समुद्राच्या उत्तर किनाऱ्यावर जे बलशाली वानर हनुमानाची वाट पहात बसले होते, त्यांच्या कानीं त्याची गर्जना गेली. ती ऐकतांच जांबुवान् वानर म्हणाला, "गड्यांनो, हनुमान् काम फत्ते करून आल्यासारखा दिसत आहे!" जांबुवानाचे हे शब्द ऐकतांच आणि हनुमानाची गर्जना स्पष्ट कानीं पडतांच ते सर्व वानर हात जोडून उभे राहिले. तोंच अरिष्ट पर्वतापासून निघा-लेला हनुमान् त्या महेंद्र पर्वताच्या शिखरावर येऊन थडकला! ते सर्व वानर त्याच्या भोंवतीं गोळा झाले. जांबवान्--प्रभृति वृद्धांना व राजपुत्र अंगदाला नमस्कार करून त्यानें "सीतेची भेट झाली!" असें त्यांना थोडक्यांत सांगि-तलें. त्यासरशीं आनंदातिरेकानें ते वानर ओरडूं लागले, शेपट्या उभारून हलवूं लागले व उड्या मारून हनुमानाच्या अंगास हात लावूं लागले! नंतर विशाल खडकांवर बसून त्यांनीं सीताशुद्धीची सविस्तर हकीकत त्याला विचारली. ती हनुमानानें विस्तृत रीतीनें त्या सर्वांस कथन केली. नंतर तो म्हणाला, "रामाचा उद्योग व सुग्रीवाची त्वरा यांचें चीज झालें आहे! सीतेचें शील अवलोकनांत आल्यानें माझ्या मनाला आनंद झाला आहे! हे वानरश्रेष्ठ हो, अशा प्रकारचें शील साध्वी सीतेलाच शक्य आहे! तिची मुक्तता करण्यासाठीं जो उपाय योजा-वयाचा असेल, तो लौकर योजण्याची तांतडी करा!"

## ११. मधुवनाचा विध्वंस

नंतर ते सर्व वानर हनुमानाला पुढें करून महेंद्र पर्वताच्या शिखरावरून

उड्या टाकीत निघाले. जातां जातां ते सुग्रीवाच्या नंदनवनतुल्य मधुवनापाशीं आले. ते सर्व वानर मधुपान करण्यासाठीं अतिशय उत्सुक झाले होते. तेव्हां अंगदाची अनुज्ञा घेऊन ते त्या मधुवनांत शिरले. त्यांनीं सुगंधी फळें व मुळें भक्षण केलीं. मधुपान करून ते सर्व धुंद झाले ! त्यामुळें त्यांनीं मधुवनांतील वृक्षलतांचा पुष्कळच विध्वंस केला ! तेव्हां दधिमुख नामक तेथील वनरक्षक वानर त्यांना कठोर भाषण करूं लागला. त्यावेळीं अंगदानें दधिमुखास एकाएकीं भूतलावर आपटलें, तेव्हां त्याचें सर्वांग रक्तानें भरून तो मूर्च्छित झाला ! शुद्धीवर आल्यानंतर दधिमुख सुग्रीवाकडे गेला आणि त्यानें अंगद-प्रभृति वानरांच्या खोड्या त्यास कथन केल्या. तेव्हां सुग्रीव लक्ष्मणास म्हणाला, " आर्या लक्ष्मणा, अंगद वगैरे वानरांनीं मधुवनावर धाड घालून ज्याअर्थीं अतिक्रम केला आहे, त्याअर्थीं सीताशुद्धीचें कार्य त्यांनीं पार पाडलें असलें पाहिजे, या विषयीं मला शंका वाटत नाहीं ! " सुग्रीवाचा हा अजमास ऐकून लक्ष्मण व राम या उभयतांसहि पराकाष्ठेचा आनंद झाला आणि त्यांचा आनंद पाहून सुग्रीवहि हर्षित झाला. सुग्रीवानें हनुमानादि वानरांस लौकर पाठवून देण्याचा दधिमुखास आदेश दिला. त्याप्रमाणें दधिमुखानें त्वरेनें जाऊन त्या सर्वांची सुग्रीवाकडे रवानगी केली.

## १३. राम व सुग्रीव यांच्याशीं भेट

अंगद, हनुमान् वगैरे वानरांनीं राम-लक्ष्मणांना प्रणाम केला. तेव्हां राम त्यांना म्हणाला, " हे वानरहो, सीतादेवी कोठें आहे ? आणि, माझ्यासंबंधीं तिचें आचरण कसें आहे ? " यावर हनुमानानें लंकेंतील सर्व वृत्तांत रामास कथन केला आणि सीतेनें दिलेला दिव्य चूडामणि त्याच्या स्वाधीन केला. तो मणि हृदयावर ठेवून राम रडूं लागला ! तो म्हणाला, " हे सुग्रीवा, जनकराजानें हा श्रेष्ठ मणि विवाहसमयीं वैदेहीला अर्पण केला होता व तो तिच्या मस्तकावर फारच शोभिवंत दिसत होता ! हे लक्ष्मणा, जेथें सीता आहे, तेथें मला सत्वर घेऊन चला ! तिची वार्ता समजल्यावर मी क्षणभरहि येथें राहूं शकणार नाहीं ! हे हनुमाना, सीता काय काय म्हणाली, हें सर्व तूं मला सांग. " रामाचें हें भाषण ऐकून हनुमानानें सीतेचें सर्व बोलणें त्यास सविस्तर सांगितलें. नंतर तो म्हणाला, " हे

रामा, मीं सीतेला शेवटचें उत्तर सांगितलें, तें असें. ' हे देवि, तूं काळजी करूं नकोस. ऋक्ष व वानर यांच्या सैन्यासह शत्रुनाशक सिंहतुल्य राम व धनुर्धारी लक्ष्मण लंकेच्या दाराशीं येऊन थडकलेले तूं लौकरच पाहशील ! नखें व दांत हींच ज्यांचीं आयुधें आहेत, असे वाघ-सिंहासारखे धिप्पाड वानरवीर एकत्र झालेले लौकरच अवलोकनांत येतील आणि लंकेंतील मलय पर्वताच्या शिखरा-वरील त्यांच्या गर्जना तुझ्या कानीं पडतील ! तुझ्यासह रामाचा वनवास संपून अयोध्येमध्यें तुम्हां उभयतांस राज्याभिषेक झाल्याचें तुझ्या सत्वरच दृष्टोत्पत्तीस येईल ! ' हे रामा, अशा शब्दांनीं मीं सीतेचें सांत्वन केलें. तेव्हां तीहि दैन्य सोडून भाषण करूं लागली व तिनें दुःख करण्याचें सोडून दिलें ! "

– सुंदरकांड संपूर्ण –

# युद्ध कांड



## १. लंकेकडे कूच

हनुमानाचें हें भाषण ऐकून आनंदित झालेला राम म्हणाला, " हनुमानानें केलेलें हें कार्य पृथ्वीवर दुसरा कोणीच करण्यास समर्थ नव्हता! सीतेचा शोध लावून त्यानें रघुवंशाला, मला व लक्ष्मणाला धर्मानें राखलें आहे! त्याचें प्रिय करण्याचें मला सामर्थ्य नाहीं, याचेंच मला दुःख होत आहे! तेव्हां कडकडून भेट देणें एव- ढेंच माझ्या हातीं उरलें आहे, तें मी करतों!" असें म्हणून रामानें हनुमानास घट्ट आलिंगन दिलें. मग तो सुग्रीवास म्हणाला, " सीतेचा शोध लागला, हें उत्तमच झालें. परंतु दुस्तर सागराला पार करून वानरसैन्य लंकेला कसें जाईल ?" इतकें बोलून राम दुःख करूं लागला. तेव्हां सुग्रीव त्याला म्हणाला, " हे वीरा, प्राकृत जनाप्रमाणें तूं चिंताक्रांत कां होतोस ? समुद्रावर सेतु बांधून लंकेस जाण्याची कांहींतरी तोड काढ. म्हणजे, तुझें व लक्ष्मणाचें शरसंधान आणि वानरसैन्याचा वृक्ष–पाषाणांचा वर्षाव यांनीं रावणाचा सर्व लंकेसह नाश झालाच म्हणून समज!" या भाषणानें धीर येऊन रामानें हनुमानास लंकेंत किल्ले, वेशी, सैन्य वगैरे किती आहे, याची साद्यंत माहिती विचारली. ती सांगून हनुमान् म्हणाला, " एरवीं लंका कितीहि साधनसंपन्न व बलशाली असूं दे, पण ती आम्हां वानरांपुढें काय पदार्थ आहे, याविषयीं संशय बाळगण्याचें कारण नाहीं! मीं एकट्यानें सारी लंका नगरी भस्मीभूत केली, तेव्हां सर्व वानरसैन्यापुढें तिचा काय पाड आहे ?" यावर राम उत्साह वृद्धिंगत होऊन म्हणाला, " तूं म्हणतोस तें बरोबर आहे! लंकेचा आपण 'हां हां' म्हणतां खचित फडशा पाडूं! हे सुग्रीवा, आज उत्तराफाल्गुनी नक्षत्र

*

असून उद्यां चंद्र हस्तांत जाणार आहे. तेव्हां आजच्या विजय-मुहूर्तावर आपण प्रयाण करण्याचें ठरवूं ! " नंतर त्याप्रमाणें ठरून सुग्रीवानें नील वानरास एक लक्ष वानर बरोबर देऊन टेहेळणीसाठीं आघाडीवर पाठविलें आणि हनुमानाच्या पाठीवर राम व अंगदाच्या पाठीवर लक्ष्मण आरूढ होऊन प्रचंड वानरसेनेसह ते सर्व दक्षिण दिशेकडे कूच करूं लागले.

## २. सागरतीरावर तळ

हनुमान् व अंगद यांच्या पाठीवर बसून चाललेले राम-लक्ष्मण हे राहूकेतूंनीं स्पर्श केलेल्या सूर्य-चंद्राप्रमाणें दिसूं लागले ! त्यावेळीं विजयसूचक शुभचिन्हें दिसत होतीं. लक्ष्मण रामास म्हणाला, "हे रामा, कार्यसिद्धि सुचविणारे हे शुभ शकून अवलोकन कर. मंद व सुगंधी वारा वाहत आहे; दिशा प्रसन्न झाल्या आहेत; तेजस्वी शुक्र तारा तुला अनुकूल आहे; ध्रुव व त्याला प्रदक्षिणा घालणारे सप्तर्षि निर्मल किरणांनीं प्रकाशत आहेत; इक्ष्वाकूचा पूर्वज राजर्षि त्रिशंकु आपल्या पुरोहितासह झळकत आहे; इक्ष्वाकूचें कुलनक्षत्र जें विशाखा, त्याच्या दोन्ही तारा मंगळादि पापग्रहांपासून मुक्त असल्यामुळें लख्ख दिसत आहेत; तसेंच, राक्षसाचें कुलनक्षत्र जें मूळ नांवाचें नक्षत्र, तें पुच्छयुक्त धूमकेतूचा स्पर्श झाल्यानें संतप्त होत आहे ! आर्या रामा, हें सर्व पाहून तूं उल्हास धारण कर." ती अफाट वानरसेना युद्धासाठीं व सीतेला सोडविण्यासाठीं उत्सुक होऊन कोठेंहि मुक्काम न करतां सुग्रीवाच्या रक्षणाखालीं अहोरात्र मार्गक्रमण करीत चालली होती. त्या सेनेला वाटेंत अनेक पर्वत, नद्या व अरण्यें लागलीं. नानातऱ्हेचे पशु व पक्षी तिच्या अवलोकनांत आले. जातां जातां झाडें पाडणें, फळें-मुळें भक्षण करणें, मधाच्या पोळ्यांतील मध सेवन करणें वगैरे विविध प्रकारच्या क्रीडा ते वानर आपल्या स्वभावानुसार करीत होते ! अखेरीस तें सर्व सैन्य दक्षिण समुद्राच्या ऐलतीरावरील महेंद्र पर्वताजवळ येऊन ठेपलें.

महेंद्र पर्वतावरून रामानें मासे व कासव यांनीं गजबजलेला व उदकानें भरलेला समुद्र अवलोकन केला. राम सुग्रीवास म्हणाला, " समुद्राचें पैलतीर येथून मुळींच दिसत नाहीं. तेव्हां कांहींतरी उपाय योजल्यावांचून हा समुद्र तरून जाणें शक्य नाहीं ! म्हणून आज येथेंच वानर-सैन्याचा तळ पडूं द्या." भयंकर सुसरी व इतर

जलचर प्राणी असलेला तो समुद्र फेसाच्या रूपानें हंसत असलेला आणि लाटांच्या रूपानें नाचत असलेला दिसत होता ! समुद्रांतून अनेक टेकड्या वर आलेल्या होत्या. जलचर प्राण्यांप्रमाणेंच असुरांनींहि त्या समुद्रांत वास्तव्य केलें होतें. अशा त्या समुद्रावर सैन्याचा तळ पडला असतां राम लक्ष्मणास म्हणाला, " कालगतीनें दुःख वस्तुतः कमी व्हावयास पाहिजे, पण माझें दुःख मात्र प्रतिदिन वृद्धिंगतच होत आहे ! सीता व मी एकाच पृथ्वीवर आहोंत, इतकें सुद्धां मला जगण्यास पुरें आहे ! तरी पण मलिन वस्त्राप्रमाणें सीतावियोगजन्य दुःखाचा त्याग मी कधीं बरें करीन ? " असें म्हणून राम विलाप करीत असतां सूर्य अस्तास गेला. लक्ष्मण धीर देत असतांहि शोकाकुल मनःस्थितींतच त्यानें संध्योपासना केली.

## ३. रावणाची श्रेष्ठ राक्षसांशीं मसलत

हनुमानानें लंकेंत केलेलें घोर कर्म पाहून रावण राक्षसांना म्हणाला, " एकट्या वानरानें लंकेंत हाहाःकार उडवून सीतेचीहि भेट घेतली ! आतां राम हजारों धैर्यवान् वानरांसह आम्हांला पीडा देण्यासाठीं लंकेवर येत आहे ! तेव्हां पुढें काय करावें, या विषयीं तुम्हीं मला सल्ला सांगा ! राम आपल्या सामर्थ्यानें समुद्राचें उल्लंघन निःसंशय करील ! किंबहुना, तो आपल्या वीर्याच्या योगानें समुद्रहि शुष्क करून टाकील ! अशा स्थितींत नगराचें व सैन्याचें कल्याण ज्यानें होईल, असा विचार तुम्हीं ठरवा. " यावर बुद्धिहीन राक्षस शत्रूचें सामर्थ्य न जाणतां रावणाला युद्धाचाच सल्ला देऊं लागले ! प्रहस्त नामक सेनापति हात जोडून म्हणाला, " महाराज, आम्ही बेसावध, म्हणून हनुमानानें लंकेंत गोंधळ उडविला ! एरवीं माझ्यापुढें हा वानर कोठला जीवंत राहणार होता ? युद्धांत मी देवदानवांनाहि जिंकूं शकेन, मग यःकश्चित् मानव रामाची कथा काय ? " दुर्मुख नामक राक्षस म्हणाला, " हनुमानानें राक्षसराज रावणाचें नगर व अंतःपुर यांचा विध्वंस करून आम्हां सर्वांचा मोठा अपमान केला ! मी एकटा सर्व वानरांचा वध करून परत येतों ! " महाबलाढ्य वज्रदंष्ट्र, कुंभकर्णाचा निकुंभ नामक पुत्र, वज्रहनु नामक पर्वततुल्य राक्षस हेहि अशाच तऱ्हेची उद्दाम भाषा बोलले ! नंतर इतरहि अनेक राक्षस वीर व खुद्द रावणपुत्र बलाढ्य इंद्रजित आपापलीं शस्त्रास्त्रें परजीत रावणास म्हणाले, " राम व लक्ष्मण यांच्यासह सुग्रीव आणि लंकेवर हल्ला केलेला क्षुद्र हनुमान् यांचा आम्ही

आजच वध करून टाकतों !" त्या सर्वांना थोपवून धरीत रावणाचा सर्वांत लहान भ्राता बिभीषण हात जोडून रावणास म्हणाला, "बाबा रावणा, जी गोष्ट साम, दाम, भेद यांनीं असाध्य असतें, ती साध्य करून घेण्यास पराक्रम उपयोगी पडतो. परंतु शत्रु बेसावध असेल तर किंवा दैवहत असेल तरच, पराक्रम सफल होऊं शकतो ! पण अत्यंत सावध व दैव अनुकूल असलेला जो अजिंक्य राम, त्याच्यावर हल्ला करण्याची इच्छा तुम्ही कशी करतां ? रामाची पत्नी सीता ही आपल्या नाशाला कारणीभूत झाल्यावांचून खचित राहणार नाहीं ! तेव्हां, हे राजा, बंधुत्वामुळें मी तुला हितकर व सत्य तेंच सांगत आहें. तूं दशरथपुत्र रामाला सीता देऊन टाक, म्हणजे पुत्र व बांधव यांसह आपण जीवंत राहूं !" बिभीषणाचें हें भाषण ऐकल्यावर सर्वांना जाण्यास अनुज्ञा देऊन रावण स्वगृहीं गेला.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं बिभीषण रावणाच्या गृहाकडे गेला. सिंहासनावर बसलेल्या रावणास प्रणाम करून व आसनावर बसून बिभीषण बोलूं लागला, "हे शत्रुतापना, सीता येथें आल्यापासून अशुभसूचक चिन्हें दिसत आहेत. मंत्रांनीं हवन करूनहि अग्नि नीट प्रज्वलित न होतां त्यांतून धूमयुक्त ज्वाला बाहेर पडतात ! खिल्लारें आटलीं ! श्रेष्ठ गज मदरहित झाले ! अश्व दीन स्वरानें खिंकाळतात ! कावळे टोळ्या टोळ्यांनीं आक्रोश करतात व उंच इमारतींवर बसतात ! कोल्हीं सकाळ संध्याकाळ अशुभ शब्द करतात ! तेव्हां, हे राजा, सीता रामाला देऊन टाकावी, हेंच योग्य होय !" यावर रावण अत्यंत संतप्त झाला व म्हणाला, "मला कसलेंच भय नाहीं व मी सीता रामाला कदापि देणार नाहीं !"

## ४. रावणाचा दरबार

सीतेच्या नादामुळें ती वेळ युद्धास अयोग्य असतांहि रावणानें रामाशीं युद्ध करण्याचाच निर्णय घेतला. रत्नजडित सुवर्णरथावर आरूढ होऊन तो दरबाराकडे निघाला. सर्व लवाजम्यासह तो राजमार्गावरून जात असतां दुतर्फा उभे असलेले राक्षस त्याला प्रणाम करूं लागले. विश्वकर्म्यानें तयार केलेल्या दरबारांत रावण जाऊन पोंचला. सिंहासनावर अधिष्ठित झाल्यानंतर त्यानें सर्व श्रेष्ठ राक्षसांना पाचारण करण्याची आज्ञा केली. त्या आज्ञेप्रमाणें प्रमुख प्रमुख राक्षस दरबारीं प्रविष्ट झाले. रावणाचा दुसरा भ्राता कुंभकर्ण सहा महिन्यांपासून निद्राधीन झाला होता,

तोहि नुकतांच उठून तेथें आला होता. राक्षसांच्या त्या सभेंत रावण म्हणाला, " राम व लक्ष्मण सुग्रीवादि वानरांना घेऊन समुद्राच्या पैलतीरावर येऊन पोंचले आहेत. तेव्हां सीता देण्याचा प्रसंग निर्माण न होतां राम--लक्ष्मणांना कसें मारतां येईल, हें तुम्ही विचार करून मला सांगा ! " हें ऐकून कुंभकर्ण रागानें म्हणाला, " हे महाराजा, सीताहरणाचें अनुचित कृत्य करण्यापूर्वी तूं आमचा विचार घेतला असतास, तर आम्ही तुझें हेंहि कार्य केलें असतें ! अविचारानें केलेलीं विपरीत कर्में अपवित्र अग्नींत टाकलेल्या आहुतीप्रमाणें, कर्त्याला दूषित करतात ! रामानें अजून तुझा वध केला नाहीं, हेंच भाग्य समज ! तरी पण ज्याअर्थी तूं हें अनुचित कर्म आरंभिलेंच आहे, त्याअर्थी तुझ्या शत्रूंचा मी वध केल्यावांचून रहाणार नाहीं ! " नंतर बिभीषण म्हणाला, " हे राजा, कुंभकर्ण व इंद्रजित्, किंवा निकुंभ व कुंभ, यांपैकीं कोणीच रामापुढें टिकण्यास समर्थ नाहीं ! खुद्द तुझें सूर्यानें व मरुद्गणांनीं जरी रक्षण केलें, अथवा तूं इंद्राच्या व मृत्यूच्या जरी अंकावर बसलास, तरी तूं रामाच्या हातून जीवंत सुटणार नाहींस ! " नंतर बिभीषण राक्षसांना उद्देशून म्हणाला, " हे राक्षसांनो, भूतांनीं झपाटलेल्या पुरुषाचें रक्षण त्याचें आप्त ज्याप्रमाणें करतात, त्याप्रमाणें तुम्ही सर्व सुहृदांनीं मिळून, शेंडी धरण्यापर्यंतचे उपाय योजून, तुमच्या या राजाला आवरा व याचें रक्षण करा ! " हें भाषण ऐकून इंद्रजित् बिभीषणाला उद्देशून कठोर भाषण करूं लागला. इंद्रजिताच्या भाषणानंतर स्वतः रावणहि निष्ठुरतेनें म्हणाला, " हे राक्षसा, भाऊबंदांच्या सकटांनीं भाऊबंदांस आनंदच होत असतो ! पूर्वी पद्मवनांत हातांत पाश धारण केलेले पुरुष पाहून हत्तींनीं म्हटलेले श्लोक प्रसिद्धच आहेतः हत्ती म्हणाले, ' अग्नि, शस्त्रें व पाश यांच्यापेक्षां आमचे भाऊबंदच आम्हांस अधिक घातक आहेत ! भाऊबंदांमुळेंच आम्ही पारध्यांच्या फांसांत सांपडतों ! ' हे बिभीषणा, माझें ऐश्वर्य तुला खपत नाहीं, म्हणून तूं अशी भाषा करतोस ! " यावर गदा घेतलेला बिभीषण चार राक्षसांसह अंतरिक्षांत उडाला व रावणास म्हणाला, " हे राजा, प्रिय भाषण करणारे पुरुष मिळणें सुलभ आहे. पण अप्रिय व हितकर भाषण करणारा वक्ता व एकणारा श्रोता मात्र दुर्लभ आहे ! तुझ्या हिताचें तेंच मी बोललों ! परंतु तें तुला रुचलें नाहीं ! तुझें कल्याण असो. मी जातों ! "

## ५. बिभीषणाचें रामाकडे गमन

याप्रमाणें कठोर भाषण करून बिभीषण रामाकडे निघून गेला. त्याला पाहून वानराधिपती सुग्रीव हनुमान् वगैरे वानरांस म्हणाला, "चार राक्षसांसह आयुधांनिशीं आलेला हा राक्षस आपणांला मारण्यासाठींच येत असावा!" तेव्हां ते वानर म्हणाले, "त्यांना मारण्याची आज्ञा कर! आम्ही तात्काल त्यांचा निकाल लावतों!" वानरांचा हा संवाद ऐकून बिभीषण मोठ्यानें म्हणाला, "मी रावणाचा कुंभकर्णाहून धाकटा भाऊ बिभीषण आहें. सीता रामाला देण्याचा माझा सल्ला न रुचून त्यानें माझी निर्भर्त्सना केली! म्हणून स्त्री--पुत्र यांचा त्याग करून मी रामास शरण आलों आहें! सर्व लोकांचा आश्रय अशा रामाला मी आल्याचें निवेदन करा!" तेव्हां सुग्रीव रामाला म्हणाला, "हा रावणाचा कोणीतरी हेर असला पाहिजे! स्वतःला हा शत्रूचा भ्राता म्हणवितो, तेव्हां हा प्रत्यक्ष शत्रूच समजला पाहिजे! याचा तात्काळ वध करावयास पाहिजे!" अंगद व जांबवान् असेंच सांगूं लागले! हनुमान् मात्र म्हणाला कीं, "या बिभीषणाचें मुख प्रसन्न दिसत असून त्याच्या ठिकाणीं बोलत असतांना दुष्टपणा मुळींच आढळत नाहीं! हे रामा, तूं वालीचा वध करून सुग्रीवाला राज्याभिषेक केल्याचें कळून हा कदाचित् लंकेचें राज्य आपल्याला मिळावें, म्हणूनहि मुद्दाम येथें आला असेल! तेव्हां याचा संग्रह करणेंच मला उचित दिसतें!" हनुमानाचें हें योग्य भाषण ऐकून राम म्हणाला, "राजाला आपल्या कुलांतील व जवळच्या देशांतील असे दोन प्रकारचे शत्रू असतात! रावणाच्या कुलांतील बिभीषणाला राज्यप्राप्तीची इच्छा असेल व म्हणून तो येथें आला असेल! तेव्हां त्याचा स्वीकार करण्यास आपणांस कांहींच हरकत नाहीं! हे सुग्रीवा, सर्वच भ्राते भरतासारखे नाहींत, सर्वच पुत्र माझ्या-सारखे नाहींत आणि सर्वच मित्रहि तुझ्यासारखे नाहींत!" रामाचें हें भाषण ऐकूनहि सुग्रीवानें बिभीषणाविषयीं आपला प्रतिकूल ग्रह पुनः रामास कथन केला! तेव्हां राम म्हणाला, "हा राक्षस दुष्ट असो वा सुष्ट असो, मला सूक्ष्महि अपाय करण्यास तो असमर्थ आहे! कण्व-पुत्र कंडुऋषीची पठण केलेली गाथा तूं ऐक: 'शत्रू जरी शरण आला, तरी त्याचा वध करूं नये! विचारी पुरुषानें आपले प्राण देऊनहि त्याचें रक्षण केलें पाहिजे!' म्हणून मी बिभीषणाला अभय देत आहें.

त्याला इकडे घेऊन या."

यानंतर बिभीषण खालीं पाहत पुढें येऊन रामाच्या चरणांवर पडला व म्हणाला, "लंका, मित्र व संपत्ति या सर्वांचा मीं त्याग केला आहे! माझें सर्वस्व तुझ्यावर अवलंबून आहे!" नंतर राक्षसांचें बलाबल रामानें विचारलें असतां बिभीषणानें रावण, कुंभकर्ण व इंद्रजित् यांचा पराक्रम रामास निवेदन केला. मग राम म्हणाला, "हे बिभीषणा, रावण कितीहि पराक्रमी असो, त्याचा वध करून मी तुला लंकेचा राजा करीन. हें माझें सत्यवचन तूं ऐकून ठेव! रावणाचा सपरिवार नाश केल्या-शिवाय मी अयोध्येंत प्रवेश करणार नाहीं, हें माझ्या तीन्ही भ्रात्यांची शपथ घेऊन मी तुला सांगतों!" यावर बिभीषण म्हणाला, "लंकेवर हल्ला करण्याबाबत व राक्षसांचा वध करण्याबाबत मी तुला यथाशक्ति साहाय्य करीन!" तेव्हां रामानें आनंदानें त्याला आलिंगन दिलें व तो लक्ष्मणास म्हणाला, "मी प्रसन्न झालों आहें, तेव्हां समुद्राचें उदक घेऊन ये. म्हणजे, मी या बिभीषणास राज्या-भिषेक करतों!" रामाच्या सांगण्याप्रमाणें लक्ष्मणानें समुद्राचें उदक आणून बिभीषणास राक्षसांचा राजा म्हणून अभिषेक केला. तेव्हां सर्व वानर "साधु! साधु!" अशी रामाची वाखाणणी करूं लागले. एवढें झाल्यावर हनुमान् व सुग्रीव यांनीं बिभीषणाला मर्माची गोष्ट विचारली, "वरुणाचें निवासस्थान असलेला हा महासागर सैन्यासह कसा पार तरून जातां येईल, हें तूं आम्हांला सांग!" बिभीषण म्हणाला, "राजा रामानें समुद्राला शरण जावें. रामाचे पूर्वज सगरपुत्र यांनीं हा महासागर खणविला आहे, तेव्हां तो रामाचें कार्य सहज करील!" बिभीषणाचा हा सल्ला सुग्रीवानें रामास सांगितला व तो त्यालाहि पटला.

## ६. सेतुबंधन

यानंतर रामानें समुद्रतीरावर दर्भ पसरले व पूर्वाभिमुख होऊन समुद्रास हात जोडून त्यानें तेथें शयन केलें. अशा तीन रात्री रामानें तेथें पडून काढल्या. तथापि बुद्धिमंद समुद्रानें रामास दर्शन दिलें नाहीं! तेव्हां तो रागानें जवळ असलेल्या लक्ष्मणास म्हणाला, "किती हा समुद्र गर्विष्ठ! हे लक्ष्मणा, क्षमाशील पुरुषाला लोक मान देत नसून प्राणिमात्रास त्रास देणाऱ्या पुरुषालाच ते मान देतात! गोडी गुलाबीनें युद्धांत विजय मिळणें अशक्य असतें! तेव्हां क्षमेचें अवलंबन केल्यामुळें

मला दुर्बल समजणाऱ्या या समुद्रास मी बाणानें शुष्क करून टाकतों!" असें म्हणून रामानें धनुष्य हातांत घेतलें व आपले भयंकर बाण समुद्रावर सोडले. त्याक्षणीं समुद्रांतून मोठमोठ्या लाटा उसळूं लागल्या आणि त्यांतील जलचर अतिशय घाबरून गेले! तोंच लक्ष्मण "असें करूं नकोस!" असें रामास म्हणाला व त्यानें त्याचें धनुष्य धरलें. परंतु रामाचा क्रोध शांत झाला नाहीं! त्यानें ब्रह्मदंडासारखा एक बाण धनुष्यास लावला व त्यावर ब्रह्मास्त्राचें अभिमंत्रण केलें. त्याक्षणीं पर्वत कंपित झाले, अंधार पसरला व दिशा धुंद झाल्या! इतक्यांत मेरू पर्वतापासून उदय पावणाऱ्या सूर्याप्रमाणें जलांतून प्रत्यक्ष सागर वर आला. वैडूर्यरत्नासारखी त्याची कांति असून त्यानें बहुमोल वस्त्रें व अलंकार धारण केले होते. तो गंगा, सिंधू वगैरे नद्यांनीं परिवेष्टित असा होता. हात जोडून तो रामास म्हणाला, "हे रामा, जगांत जो तो आपापल्या स्वभावानुरूप वागत असतो. त्याप्रमाणें मी अगाध असून दुस्तर आहें, हा माझा स्वभाव आहे! मी पाण्याचें स्तंभन कधींहि करणार नाहीं! तथापि तुला सेनेसह माझ्यावरून तरून जाण्याची मी व्यवस्था करीन." यावर "हा अमोघ बाण कोठें सोडूं?" असें रामानें विचारलें असतां समुद्राच्या सांगण्यावरून त्यानें तो बाण द्रुमकुल्य नामक प्रदेशावर सोडला. तेव्हां तेथील उदक शोषलें जाऊन तें स्थल 'मरुकांतार' म्हणून जगांत प्रख्यात झालें. नंतर समुद्र रामास म्हणाला, "विश्वकर्म्याचा पुत्र नल नामक वानर तुझ्या सैन्यांत असून त्याला आपल्या पित्याच्या वरानें इच्छित वस्तु निर्माण करतां येते. तेव्हां या नलाकडून तूं माझ्या ठिकाणीं सेतु बांध. तो मी धारण करीन." असें म्हणून समुद्र गुप्त झाला. मग रामानें नलास सेतु बांधण्याची आज्ञा केली. तेव्हां सर्व दिशांस श्रेष्ठ वानर पाठविण्यांत आले आणि मोठमोठीं झाडें व पाषाण आणून त्यांच्या योगानें ते समुद्र भरून टाकूं लागले! अशा रीतीनें शंभर योजनें लांब असा प्रचंड सेतु बांधण्यास नलानें आरंभ केला. लौकरच तो सेतु तयार झाला. तो सेतु आकाशांतील स्वातीपथाप्रमाणें किंवा सागर-मस्तकावरील भांगाप्रमाणें शोभूं लागला! सेतु तयार होतांच बिभीषण गदा घेऊन उठला व सेतूवरून जाण्यास सज्ज झाला. सुग्रीव व लक्ष्मण यांसह राम त्या अफाट वानरसेनेच्या अग्रभागीं चालूं लागला. हा चमत्कार पाहण्यास देव, ऋषि, सिद्ध व



रामानें ब्रह्मदंडासारखा बाण धनुष्यास लावला. इतक्यांत प्रत्यक्ष सागर वर आला.

चारण तेथें प्रगट झाले आणि त्यांनीं रामास मंगल आशीर्वाद दिले. वानर- सेना चालली असतांना वानरांना व राक्षसांना उभयतांस अशुभ अशीं चिन्हें दिसूं लागलीं ! कारण, युद्धप्रसंगीं राक्षसांप्रमाणेंच हजारों वानरहि प्राणास मुकणार होते !

## ७. वानरसैन्याची पुरुष व्यूहरचना

क्रमाक्रमानें सेतु पार करीत वानरसेना रामासह लंकेजवळ येऊन पोंचली. लंकानगरी दृष्टिपथांत येतांच रामाचें मन सीतेच्या स्मरणानें व्याकुल झालें ! मंगळ ग्रहानें ग्रस्त झालेल्या रोहिणी नक्षत्राप्रमाणें सीता लंकेंत रावणाच्या प्रतिबंधांत आहे, या जाणिवेनें तो दुःखी झाला ! परंतु प्रसंग जाणून त्यानें आपला शोकावेग आवरला. लंकेचें अपूर्व वैभव पाहून रामास विस्मय वाटला. वानरसेना परतीरास आल्यावर रामानें तिची शास्त्रोक्त रीतीनें ' पुरुष ' नामक व्यूहरचना केली. त्या पुरुष–व्यूहाच्या शिरोभागीं लक्ष्मणासह स्वतः राम, वक्षःस्थळाच्या जागीं अंगद, उजव्या व डाव्या बाजूस अनुक्रमें ऋषभ व गंधमादन, उदरस्थानीं जांबवान्, सुषेण व वेगदर्शी आणि मागल्या बाजूस सुग्रीव अशी रचना रामानें केली. पुरुषाच्या शरीराचें अवयव वेगवेगळे दाखवून रामानें वानर सेनेची याप्रमाणें व्यूहरचना केली. नंतर पर्वतशिखरें व प्रचंड पाषाण हातांत घेऊन संग्रामांत रावणाचा सर्वनाश करण्याच्या हेतूनें वानर-सैन्य लंका नगरीला येऊन भिडलें !

## ८. रामसेनेची रावणानें काढलेली माहिती

इकडे रावणानें शुक व सारण नांवाच्या आपल्या प्रधानांस बोलावलें. रामाच्या वानर–सैन्यांत वानर वेषानें शिरून तें सैन्य किती आहे, त्याचें सामर्थ्य केवढें आहे, त्या सैन्यानें सेतु कसा बांधला, वगैरे माहिती गुप्त रीतीनें काढून आणण्याची रावणानें त्यांना आज्ञा केली. त्याप्रमाणें शुक-सारण वानरांचें रूप घेऊन वानरसैन्यांत शिरले. त्यांना पाहतांच बिभीषणानें त्यांना पकडलें व हेर म्हणून रामाकडे नेलें. दयाळु राम त्यांना हंसत हंसत म्हणाला, " आमच्या सैन्याची पाहणी करण्याचें तुमचें काम झालें ना ? झालें नसल्यास आणखी पाहणी करून घ्यावी ! पण तुम्ही दूत असल्यामुळें आपल्या जीवांबद्दल भीति बाळगूं नका ! " असें बोलून त्यांना सोडून देण्याची रामानें बिभीषणास आज्ञा केली. तेव्हां " तुझा विजय असो ! " असें रामास म्हणून शुक व सारण तेथून निघाले आणि रावणाकडे परत

आले. ते रावणास म्हणाले, " बिभीषणानें आम्हांस धरलें असतांहि धर्मात्म्या रामानें आम्हांस मुक्त केलें ! एकटा राम लंकेचा विध्वंस करण्यास समर्थ आहे ! हे राजा, रामाशीं सख्य करून तूं त्याला सीता देऊन टाक ! " यावर रावणानें त्यांची तीव्र निर्भर्त्सना केली ! नंतर तो अनेक ताड उंच असलेल्या आपल्या गृहाच्या बर्फासारख्या शुभ्र गच्चीवर शुक--सारणांसह आरूढ झाला आणि त्यानें वानर सैन्यांतील प्रमुख प्रमुख वीर दाखविण्याची त्यांना आज्ञा केली. तिला अनुसरून त्यांनीं एकेका वीराची रावणास माहिती करून दिली. राम व लक्ष्मण यांच्यासह ते सर्व मुख्य वीरश्रेष्ठ रावणानें अवलोकन केले आणि तो मनांत उद्विग्न झाला. परंतु आपली नाराजी त्यानें त्या बिचाऱ्या शुक--सारणांवर काढली ! त्यांना तो म्हणाला, " अरे, प्रत्यक्ष माझ्यासारख्या राजाशीं अप्रिय भाषण करतांना तुम्हांस मृत्यचें भय कसें वाटत नाहीं ? तुमच्यासारखे मूर्ख मंत्रि असूनहि मी राज्य करीत आहें, हें भाग्यच म्हणावयाचें ! " असें म्हणून रावणानें त्यांना तेथून घालवून दिलें. नंतर त्यानें हेरांना पाचारण केलें. त्यांना तो म्हणाला, " रामाची सर्व हालचाल नीट पाहून तुम्ही त्याची खडानूखडा बातमी घेऊन या व ती मला सांगा ! " ती आज्ञा ऐकून शार्दूल व इतर हेर वानर सैन्याकडे जाण्यास निघाले. यावेळेपर्यंत वानर सैन्य सुवेल पर्वताजवळ येऊन दाखल झालें होतें. सुवेल पर्वताशीं जाऊन शार्दूलादि हेरांनीं सैन्याची टेहेळणी केली. त्यांना पाहतांच बिभीषणानें शार्दूलास पकडलें. तेव्हां त्याला व इतर हेरांना वानरांनीं यथेच्छ ताडण केलें ! परंतु दयाळु रामानें त्या सर्वांस सोडून दिलें ! ही वार्ता घेऊन ते दूत घाबरत घाबरत रावणाकडे गेले आणि त्यांनीं झालेला सर्व प्रकार त्यास निवेदन केला.

## ९. रामाचें मायिक शीर व धनुष्य

अजिंक्य सैन्यासह राम सुवेल पर्वतासन्निध येऊन पोंचल्याचें वृत्त कळून रावण खिन्न झाला. त्यानें आपले सर्व मंत्री बोलावून त्यांच्याशीं पुढील कार्य–पद्धतीचा विचार विनिमय केला आणि मंत्र्यांना निरोप देऊन तो अंतःपुरांत गेला. नंतर मायिक प्रयोग करणाऱ्या मायावी विद्युज्जिव्ह नामक राक्षसास बरोबर घेऊन तो सीतेकडे गेला. विद्युज्जिव्हाला रामाचें मायामय मस्तक व धनुष्य तयार करण्यास त्यानें सांगितलें होतें. तें मस्तक व धनुष्य घेऊन रावण अशोक--वनांत जाऊन सीतेपुढें

उभा राहिला. तो तिला म्हणाला, " हे कल्याणि, ज्याच्या बळावर तूं माझा अपमान करीत होतीस, तो राम मृत्यू पावला आहे ! तुझ्या आशेचें मूळच तुटून गेलें आहे ! मध्यरात्रीं राम सैन्यासह निद्रिस्त असतां रामाचें मस्तक प्रहस्त राक्षसानें खड्गानें तोडून टाकलें ! सुग्रीवाची मान मोडून व हनुमानाची हनु तोडून राक्षसांनीं त्यांचा वध केला ! लक्ष्मण व इतर वानर वाट सांपडेल तिकडे पळून गेले ! तेव्हां आतां तरी तूं माझ्या भार्यांची स्वामिनी हो ! " असें म्हणून त्यानें रामाचें तें खोटें मस्तक व धनुष्य सीतेपुढें टाकलें ! त्यांचें अवलोकन करतांच कुररीप्रमाणें आक्रोश करीत सीता म्हणाली, " हे कैकेयी, आतां तुझी इच्छा पूर्ण होऊं दे ! राम—लक्ष्मण मारले गेले आहेत ! " असें म्हणून ती तुटलेल्या केळीप्रमाणें जमिनीवर पडली ! क्षणभरानें शुद्धीवर येऊन तिनें तें मस्तक जवळ घेतलें व ती शोक करूं लागली " हे राघवा, तुला दीर्घायुष्य असल्याचें ज्योतिःशास्त्रज्ञांनीं सांगितलें होतें ! पण त्यांचें वचन असत्य झालें आहे ! तूं इतका सूज्ञ असतांना तुला असा आकस्मिक मृत्यु कसा आला ? तुझा अंत झाल्याचें ऐकून कौसल्येचें हृदय विदीर्ण होईल ! अरेरे ! आर्यपुत्र रामाला माझ्यामुळें असें मरण यावें ना ! हे रावणा, याच्या मस्तकाबरोबर मला आतां चितेंत सहगमन करूं दे ! " इतक्यांत एक राक्षस येऊन त्यानें राजकार्यासाठीं सेनापति प्रहस्त आल्याचें रावणास येऊन सांगितलें. म्हणून तो तसाच तेथून निघून गेला. नंतर बिभीषणाची पत्नी सरमा सीतेच्याजवळ येऊन तिला म्हणाली, " हे सीते, मी सर्व बातमी काढून आणली आहे ! राम कुशल असून लक्ष्मण, सुग्रीव व इतर वानर रामाप्रमाणेंच सुखरूप आहेत ! रावणानें हें केवळ कपटाचरण केलें आहे ! तेव्हां तूं शोक आंवर आणि रामाशीं तुझी भेट होईल, याविषयीं निःशंक अस. " सरमेचें हें भाषण ऐकून सीतेनें आपला शोक आंवरला. इतक्यांत शंख व दुंदुभि यांच्या निनादानें युक्त अशी वानर--सेनेची गर्जना कानांवर आली. ती ऐकून सर्व लंका तेजोहीन झाली !

## १०. उभयपक्षांची युद्धसिद्धता

राम-सैन्याला तोंड देण्यासाठीं रावणानेंहि मंत्र्यांच्या विचारानें लंकेचा बंदोबस्त केला. पूर्वेकडील वेशीवर प्रहस्त, दक्षिणेकडील वेशीवर महापार्श्व व महोदर, पश्चिमेकडील वेशीवर इंद्रजित् आणि उत्तरेकडील वेशीवर शुक व सारण यांची रावणानें

नेमणूक केली. उत्तरेकडेच खुद्द आपणहि राहण्याचें त्यानें ठरविलें. याप्रमाणें लंकेचा बंदोबस्त करून रावण आपणास कृतकृत्य मानूं लागला !

रावणानें केलेल्या या बंदोबस्ताची बित्तंबातमी बिभीषणानें आपल्या चौघां सोबत्यांकडून आणविली. तेव्हां तोडीस तोड म्हणून रामानेंहि रावणावर मात करण्याचें ठरविलें ! पूर्वेकडील वेशीवर प्रहस्ताशीं लढण्यासाठीं रामानें नल वानराची योजना केली. दक्षिणद्वारावर महापार्श्व व महोदर यांच्यावर अंगदास त्यानें सोडलें ! पश्चिमेकडील बाजूनें इंद्रजिताशीं झोंबी घेऊन आंत घुसण्याचा प्रयत्न करण्यासाठीं रामानें हनुमानाची नियुक्ति केली. आणि, उत्तरेकडील वेशीच्या द्वारावर रावणास तोंड देण्यासाठीं लक्ष्मणांसह स्वतः राम सज्ज झाला. अशा रीतीनें रावणानें केलेला लंकेचा बंदोबस्त उखडून टाकून आंत घुसण्याचा प्रयत्न करण्याची व्यवस्था रामानें केली !

नंतर लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण वगैरेंस बरोबर घेऊन रामानें सुवेल पर्वतावर आरोहण केलें. तेथून तो लंका नगरीचें बारकाईनें निरीक्षण करूं लागला. पर्वत-शिखरावर वसलेली आणि उंच उंच हवेल्यांनीं मंडित झालेली लंकानगरी जणूं काय आकाशांत अधांतरींच बसली आहे, अशी दिसत होती ! रामानें सुवेल पर्वता-वरून लंका नगरींतील इमारती व राक्षस हेच केवळ नव्हेत, तर प्रत्यक्ष रावणहि अवलोकन केला ! लंकेच्या वेशीच्या बुरुजावर रावण याचवेळीं विराजमान झाला होता. त्याच्यावर विजयशाली छत्र धरलेलें होतें. रामाप्रमाणेंच लक्ष्मण--प्रभृतींनींहि रावण तेथून पाहिला. त्याबरोबर सुग्रीवास भान न राहून तो उड्डाण करून रावणावर एकटाच चालून गेला ! " हे राक्षसा, जगदीश रामाचा मी मित्र व दास असा सुग्रीव आहें ! " असें म्हणत सुग्रीवानें त्याचा मुगुट खालीं पाडला ! तेव्हां रावणानें उठून " तुझी 'सुग्रीवा' ची ग्रीवा ( कंठ ) मी नष्ट करतों ! " असें म्हणून त्याला खालीं आपटलें ! चेंडूप्रमाणें वर उसळून सुग्रीवानें रावणास पुनः खालीं पाडलें ! अशी दोघांची झोंबाझोंबी चालली असतां रावण मायेचें अवलंबन करणार, असें पाहून सुग्रीवानें तेथून उड्डाण केलें ! निमिषांत तो वानरसैन्यांत परत आला. सुग्रीवाचा हा पराक्रम पाहून वानरांनीं त्याचा जयजकार केला. रामा-नेंहि त्यास प्रेमानें आलिंगन दिलें. परंतु " राजेलोकांनीं असें साहस करूं नये ! "

असा रामानें सुग्रीवास बोध केला.

## ११. लंकेचा वेढा व अंगद-शिष्टाई

यानंतर रामानें आपल्या समुद्रासारख्या अथांग सैन्यास लंकेवर चालून जाण्याचा हुकूम केला. स्वतः राम त्या सैन्याच्या आघाडीस होता. पर्वतशिखरें व मोठमोठीं झाडें हातांत घेऊन वानर वीर निघाले. रामाच्या त्या अफाट सैन्यानें लंकेस सर्व बाजूंनीं वेढा दिला. चारी दिशांच्या चार द्वारांवर नियुक्त केलेले वानरवीर जाऊन ठाकले. प्रत्येक दिशेस कोटि कोटि वानर नेमून दिले होते. उत्तरद्वारावर रावण असल्यानें तेथें रामाशिवाय दुसरा कोणी टिकण्यासारखा नव्हता! वानरसेनेचा टोळ-धाडीसारखा तो जमाव पाहून लंकेतील राक्षस चकित झाले!

याप्रमाणें लंकेस वेढा देऊन राजधर्म जाणणाऱ्या रामानें अंगदास बोलावून त्याला म्हटलें, " हे अंगदा, मरणोन्मुख दशा प्राप्त झालेल्या रावणाकडे जाऊन त्याला तूं माझा निरोप म्हणून असें सांगः ' हे रावणा, समुद्राचें उल्लंघन करून तुला दंड करण्यासाठीं मी लंकेस येऊन ठेपलों आहें. तूं शरण येऊन सीता मला देऊन टाक. नाहीं तर, ही पृथ्वी मी राक्षसरहित केल्यावांचून राहणार नाहीं!' हा निरोप रावणास सांगून त्याचें म्हणणें मला येऊन सांग." याप्रमाणें रामाची आज्ञा होतांच अंगद आकाशमार्गानें उडून अगदीं रावणाजवळ जाऊन उभा राहिला. त्यानें रावणास आपली ओळख सांगून रामाचा निरोप निवेदन केला. तो ऐकून क्रुद्ध झालेला रावण म्हणाला, " अरे, या दुष्टबुद्धि वानरास ठार करा!" तेव्हां चार धिप्पाड राक्षसांनीं अंगदास धरलें. त्या राक्षसांसह अंगद एकदम रावणाच्या गृहा-वर उडाला. त्याबरोबर ते चार राक्षस रावणासमोर खालीं कोसळले आणि अंग-दाच्या भारामुळें रावणाच्या गृहाचें शिखर विदीर्ण होऊन पडलें! नंतर अंगद आकाशमार्गानें वानर-सैन्यांत येऊन परतला. आपल्या प्रत्यक्ष गृहावरच हल्ला झालेला पाहून रावण क्रोधसंतप्त झाला व दीर्घ सुस्कारे टाकूं लागला!

## १२. इंद्रजिताचा पराक्रम

वानरसेनेचा लंकेभोंवतीं वेढा पडला असतां रामाला सीतेची आठवण झाली. 'याच नगरींत ती मृगनयना, माझ्यासाठीं झुरणी घेत भूमीवर पडली आहे!' असा विचार मनांत येऊन रामानें वानर सैन्यास तात्काळ रासक्षांची कत्तल करण्याचा

हुकूम केला! तेव्हां झाडें व पाषाण हातांत घेऊन तें वानर--सैन्य लंकेवर तुटून पडलें. वानरांनीं अनेक ठिकाणीं लंकेचा तट व वेशी फोडल्या. त्यांनीं निर्मल जळानें युक्त असे खंदक दगड व झाडें यांनीं भरून टाकले. लंकेच्या उत्तर--द्वारावर लक्ष्मण व सुग्रीव यांसह स्वतः राम उभा राहिला. बिभीषणहि तेथेंच येऊन ठेपला. लंकेवर झालेला हा हल्ला पाहून रावणानेंहि सर्व राक्षसांना रामसेनेवर चाल करण्याची आज्ञा केली. राक्षसांचा सिंहनाद, अश्व व गज यांचा शब्द, रथांचा खडखडाट आणि शंख व दुंदुभि या वाद्यांचे घोष यांनीं पृथ्वी, आकाश व समुद्र कोंदाटून गेले! देव--दैत्यांप्रमाणें राक्षस व वानर यांचा घोर संग्राम सुरूं झाला. राक्षसांकडील कांहीं प्रमुख वीर व वानरांकडील कांहीं प्रमुख वीर यांचें तर द्वंद्वयुद्धच सुरूं झालें! रावण-पुत्र इंद्रजित् व वालीपुत्र अंगद, जंबुमाली राक्षस व हनुमान् वानर, निकुंभ राक्षस व नील वानर वगैरे उभय पक्षांतील वीरांचें भयंकर द्वंद्वयुद्ध सुरूं झालें! उभय पक्षांतील योध्यांच्या शरीरांतून निघणाऱ्या रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या! योद्ध्यांचीं छिन्नविच्छिन्न झालेलीं मृत शरीरें, मेलेले हत्ती व घोडे आणि मोडलेले रथ व हत्यारें यांच्यामुळें त्या युद्धभूमीस भयानक स्वरूप प्राप्त झालें! कोल्ह्यांचे कळप तेथें येऊं लागले! हें होत असतांच सूर्य अस्तास गेला.

नंतर रात्र झाली असतांहि वानर व राक्षस यांचें तें घनघोर युद्ध तसेंच चालू राहिलें. सुवर्णकवच धारण केलेले कृष्णवर्ण राक्षस अंधारांत देदीप्यमान ओषधींनीं युक्त अशा पर्वतांप्रमाणें दिसूं लागले! ते क्रुद्ध राक्षस वानरांना भक्षण करीत सुटले! वाद्यांच्या व योद्ध्यांच्या आवाजांनीं त्या युद्धभूमीची भयानकता द्विगुणित झाली. वानरसैन्यानेंहि राक्षस सैन्याच्या तोडीचा पराक्रम दाखविला! रामाचे सुवर्णपिच्छांनीं युक्त असे बाण चोहोंकडून पडूं लागले. तेव्हां ती रात्र काजव्यांच्या योगानें शोभणाऱ्या शरदृतूंतील रात्रीप्रमाणें शोभूं लागली! राक्षस जसे वानरांना खात सुटले होते, तसेच काळेकुट्ट गोलांगुलहि राक्षसांना कवटाळून धरून खाऊं लागले! वानर सैन्यांतील अंगदानें इंद्रजिताच्या अश्वाचा व सारथ्याचा वध केल्या-मुळें इंद्रजित् गुप्त झाला. तेव्हां सर्व वानरांनीं अंगदाची वाहवा केली. पापी इंद्रजित् ब्रह्मदेवापासून मिळालेल्या वरामुळें गुप्त झाला, एवढेंच नव्हे, तर अदृश्य राहून बाण--वृष्टि करूं लागला! त्यानें नागपाशानें अभिमंत्रित केलेल्या शरबंधानें राम व

लक्ष्मण यांना बांधून टाकलें ! त्याक्षणीं ते मृताप्रमाणें भूमीवर पडले ! राम–लक्ष्मणांच्या शरीरावरील जखमांतून अतिशय रक्त वाहूं लागले ! तेव्हां तें लाल फुलांनीं युक्त अशा पळसाच्या झाडांसारखे दिसूं लागले ! राम व लक्ष्मण भूमीवर पडलेले पाहून ते मरण पावले, अशी खुद्द इंद्रजिताची कल्पना झाली ! तो आनंदानें गर्जना करूं लागला व राक्षसांना म्हणाला " हे राक्षस हो, राम--लक्ष्मणांची ही स्थिति पहा ! " नंतर इंद्रजित् लंकेंत जाऊन त्यानें राम–लक्ष्मणांचा वध झाल्याचें वृत्त रावणास निवेदन केलें ! तेव्हां रावणानें अतिशय आनंदानें त्यास आलिंगन देऊन त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें ! आनंदित झालेल्या रावणानें त्रिजटेसह सीतेला पुष्पक विमानांत बसवून मेलेले राम--लक्ष्मण तिला दाखवून आणण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें सीतेला व त्रिजटेला पुष्पक विमानांत बसवून युद्धभूमीकडे नेण्यांत आलें. प्रत्यक्ष स्कंदच कीं काय, असे ते वीर भ्राते धुळींत लोळत पडलेले पाहून सीतेचा शोक अनावर झाला ! ती विलाप करूं लागली, " मला वैधव्य येणार नाहीं, मी पुत्रवती होणार व रामाबरोबर मलाहि राज्याभिषेक होणार, हें सामुद्रिकांनीं वर्तविलेलें भविष्य आज खोटें ठरलें आहे ! रामाच्या भेटीसाठीं कंठांत प्राण आणून बसलेल्या कौसल्येबद्दल तर मला स्वतःपेक्षांहि अधिक दुःख होत आहे ! " यावर त्रिजटा राक्षसी सीतेला म्हणाली, " हे देवी, शोक करूं नकोस. राम व लक्ष्मण खरोखरच येथें मेले असते, तर वानर सैन्य पळत सुटलें नसतें काय ? आणि त्यांच्या तोंडावर कांति दिसली असती काय ? " हें ऐकून " तसेंच होवो ! " असें सीता म्हणाली आणि त्या दोघींना घेऊन तें पुष्पक विमान अशोक वनाकडे परत गेलें.

इकडे नागपाशानें राम व लक्ष्मण बद्ध झाले असतां त्या बंधनांतून त्यांची मुक्ति करण्यासाठीं पेटलेल्या अग्नीसारखा देदीप्यमान गरुड युद्धभूमीवर आला. राम--लक्ष्मणांना जखडून टाकलेल्या नागपाशांतील नाग गरुडाला पाहतांच पळून गेले ! गरुडानें त्या उभयतांच्या देहांवरून हात फिरविला आणि त्यांच्या चंद्रासारख्या मुखांनाहि त्यानें स्पर्श केला. त्याबरोबर त्यांच्या अंगांवरील जखमा भरून निघाल्या आणि त्यांचे देह पूर्वीप्रमाणें होऊन त्यांना द्विगुणित सामर्थ्य प्राप्त झालें. नंतर गरुड रामास म्हणाला, " हे रामा, राक्षसांची जात स्वभावतःच कपटी असून इंद्रजित् हा

कपटयुद्धांत अतिशय निपुण आहे ! हें लक्ष्यांत घेऊन राक्षसांशीं सावधगिरीनें युद्ध केल्यास तुला यश आल्याशिवाय राहणार नाही!" याप्रमाणें बोलून गरुडानें रामास जाण्याची अनुज्ञा मागितली आणि त्याला प्रदक्षिणा घालून व आलिंगन देऊन तो आकाशमार्गानें उड्डाण करून निघून गेला. याप्रमाणें रामलक्ष्मण शुद्धीवर येऊन पूर्ववत् झालेले पाहतांच वानर सैन्यांत आनंदाची एकच आरोळी उठली ! तो शब्द ऐकून रावण व लंकेंतील इतर राक्षस आश्चर्यचकित झाले ! जे रामलक्ष्मण मृत्यु पावले, म्हणून रावण हर्षभरित झाला होता, ते जीवंत असल्याचें कळून येतांच तो चिंतेनें पांढरा फटफटीत पडला !

## १३. धूम्राक्षादिकांचा वध

रावणानें रामाचा वानरांसकट फडशा पाडण्यासाठीं धूम्राक्ष नांवाच्या एका बलाढ्य राक्षस–वीरास मोठ्या सैन्यासह रवाना केलें. धूम्राक्ष मोठ्या उत्साहानें जेथें हनुमान होता, त्या पश्चिमद्वाराला आला. सहजच त्याची व त्याच्या राक्षस-सेनेची हनुमान् व त्याची वानरसेना यांच्याशीं झुंज सुरू झाली. राक्षसांनीं वानर-सेनेवर बाण, गदा, कूट, मुद्गर, परिघ वगैरे शस्त्रास्त्रांनीं हल्ला केला, तर उलट-पक्षीं आपलीं नेहमींचीं मोठमोठीं झाडें व पाषाण हीं हत्यारें घेऊन वानरांनीं राक्षसां-वर प्रतिहल्ला केला ! खुद्द धूम्राक्ष व हनुमान् यांचें घोर द्वंद्वयुद्ध झालें. हनुमा-नानें एक प्रचंड पाषाण धूम्राक्षाच्या रथावर झोंकला. धूम्राक्षानें गदा घेऊन क्षणांत रथाखालीं उडी घेतली. हनुमानाच्या पाषाणांनीं रथाचा सपशेल चुरा झाला ! धूम्राक्षानें आपली कणीदार गदा हनुमानाच्या मस्तकावर फेंकली. परंतु गदेचा महान् प्रहार सोसूनहि हनुमानानें एक प्रचंड पर्वतशिखर धूम्राक्षावर फेंकलें. त्या-सरशीं तो तुकडे तुकडे होऊन जमिनीवर पडला ! भयभीत झालेले राक्षस वानरांचे आघात घेत घेत लंकेकडे पळाले ! नंतर रावणानें वज्रदंष्ट्र नामक महाबलाढ्य राक्षसास रामावर पाठविलें. गज, अश्व, गर्दभ व उंट यांनीं युक्त असलेला तो वज्र-दंष्ट्र रथास प्रदक्षिणा करून त्यावर आरूढ झाला आणि प्रचंड राक्षससेनेसह वानरांवर चालून गेला. हे राक्षसवीर जिकडे अंगद होता, त्या दक्षिणद्वारांतून बाहेर पडले. तेव्हां त्यांचें अंगद व त्याचें सैन्य यांच्याशीं तुमुल युद्ध सुरू झालें. उभयपक्षीं भयंकर प्राणहानि झाली ! वज्रदंष्ट्र व अंगद समोरासमोर आले असतां

❀

त्यांचें अद्‌भुत द्वंद्वयुद्ध झालें. अखेरीस अंगदाच्या तीक्ष्ण खड्गानें वज्रदंष्ट्राचें मस्तक तुटून तो युद्धांत कामास आला! यानंतर रावणानें अकंपन नांवाच्या राक्षसास वानरसैन्यावर पाठविलें. देवांनाहि त्यास संग्रामांत कंपित करणें अशक्य असल्यानें त्याला 'अकंपन' नांव पडलें होतें! अकंपनाच्या नेतृत्वाखालीं निघालेल्या राक्षसांच्या वीर गर्जनांनीं वानरसैन्याची धांदल उडाली! राक्षसांनीं वानरांचा व वानरांनीं राक्षसांचा भयंकर संहार केला! शेवटीं अकंपनाची हनुमानाशीं गांठ पडून दोघांनीं एकमेकांस ठार मारण्याची पराकाष्ठा केली! अकंपनानें हनुमानावर विदारण शरीर करणारे चौदा बाण सोडले. त्यांनीं रक्तबंबाळ झालेला हनुमान् फुललेल्या अशोक वृक्षाप्रमाणें किंवा निर्धूम अग्नीप्रमाणें भासूं लागला! नंतर हनुमानानें एक वृक्ष उपटून अकंपनाच्या मस्तकावर फेंकला, तोंच तो गतप्राण होऊन पडला! यापुढें रावणानें सेनापति प्रहस्त यास रामावर पाठविलें. भयंकर दुंदुभि निनादत असतां भव्य रथांत बसून प्रहस्त सैन्यानिशीं रामसेनेवर चालून गेला. त्याला अवलोकन करून "हा कोण बरें वीर असावा?" अशी रामानें बिभीषणास पृच्छा केली. तेव्हां बिभीषण म्हणाला, "वीर्यवान् व अस्त्रवेत्ता असा रावणाचा अतिविख्यात् प्रहस्त नामक सेनापति होय." प्रहस्त व राम यांचें सैनिक एकमेकांशीं भिडले. प्रहस्तानें हातांत धनुष्य धारण करून वानरांची भयंकर कत्तल केली! प्रहस्त पूर्वेकडील वेशींतून बाहेर पडल्यानें त्याची नील वानराशीं गांठ पडली. प्रहस्तानें नीलावर तीव्र बाणांचा भयंकर वर्षाव केला. नीलानें प्रचंड सालवृक्षानें प्रहस्ताच्या रथाचे घोडे मारून टाकले. तेव्हां हातांत मुसळ घेऊन प्रहस्त रथाखालीं उतरला आणि त्यानें मुसळानें नीलाच्या ललाटावर जोरानें प्रहार केला. सर्वांग रक्तानें भरलें असतांहि नीलानें प्रचंड शिला फेंकून प्रहस्ताच्या मस्तकाचे तुकडे तुकडे केले! प्रहस्तासारखा सत्यपराक्रमी राक्षसवीर देखील मृत्यु पावल्याचें कळून रावणास अतिशय त्वेष चढला आणि तो स्वतःच रामावर चाल करून गेला!

## १४. युद्धभूमीवर रावण

राक्षसराज रावण देदीप्यमान रथावर आरूढ होऊन शंख, दुंदुभि व पणव यांच्या निनादांत आणि राक्षसांच्या जयजयकारांत लंकेबाहेर पडला. मेघतुल्य देहांनीं युक्त अशा राक्षसांनीं रावण परिवेष्टित झाला असतां भूतांनीं परिवेष्टित अशा

रुद्राप्रमाणें तो दिसूं लागला ! त्याला अवलोकन करून राम बिभीषणास म्हणाला, " पताका, ध्वज व छत्रां झळकणारें आणि महेंद्र पर्वतासारखे हत्ती असलेलें हें अजिंक्य सैन्य कोणाचें ? " यावर बिभीषण म्हणाला, " राक्षसराज रावणाचें हें सैन्य होय ! " नंतर बिभीषणानें रामास श्रेष्ठ राक्षसवीरांची ओळख करून दिली. बारीक शलाकांनीं युक्त, चंद्रतुल्य व शुभ्र छत्र असलेला आणि किरीट धारण केलेला सूर्यासारखा रावण पाहून राम बिभीषणास म्हणाला, " काय हें याचें तेज ! असें दिव्य शरीर देवादिकांचेंहि नसेल ! " असें म्हणून रामानें एक उत्तम बाण हातांत घेऊन तो युद्धास सज्ज होऊन उभा ठाकला. रावणानें क्षणार्धांत वानरसैन्याची क्षणादाण उडवून दिली ! तेव्हां सुग्रीवानें एक प्रचंड पर्वतशिखर रावणावर फेंकलें. पण त्यानें एका बाणानें त्या पर्वतशिखराचे तुकडे तुकडे केले ! नंतर त्यानें एक तीव्र बाण सोडून सुग्रीवास मूर्च्छित पाडलें. इतरहि वानर रावणाच्या शरसंधानापुढें टिकूं शकले नाहींत ! तेव्हां रामाची अनुज्ञा घेऊन व त्यास कडकडून भेटून लक्ष्मण रावणावर चालून जाण्यास पुढें सरसावला. इतक्यांत हनुमान् रावणाच्या शरसंधानाचा प्रतिकार करण्यासाठीं त्याच्यावर धांवून गेला. त्यावेळीं रावण व हनुमान् यांचें घोर द्वंद्वयुद्ध झालें ! प्रथम रावणानें हनुमानाच्या वक्षःस्थलावर जोरानें हस्तप्रहार केला. त्यानें हनुमानास तिरमिरी आली, पण लगेच सावरून त्यानेंहि रावणावर उलट हस्तप्रहार केला. तेव्हां भूकंपानें कोसळणाऱ्या पर्वतासारखा रावण जमिनीवर कोसळला ! हा देखावा पाहून देव, ऋषि वगैरे " साधु ! साधु ! " अशी गर्जना करूं लागले. परंतु लवकरच सावध होऊन रावणानें हनुमानास हस्तप्रहारानें विव्हल केलें व रथावर आरूढ होऊन तो नील वानरावर चालून गेला. चापल्यानें सूक्ष्म रूप घेऊन नील रावणाच्या ध्वजावर व मुगुटावर फिरूं लागला आणि गर्जना करूं लागला. नीलाची ही माया पाहून रावणानें तीक्ष्णबाणानें त्यास घायाळ केलें व तो लक्ष्मणाकडे वळला. ते दोघे वीर एकमेकांनीं सोडलेले बाण मध्येंच उडवून देऊं लागले. नंतर रावणानें ब्रह्मदेवाकडून मिळालेली अग्नीसारखी उग्र शक्ति वेगानें लक्ष्मणावर सोडली ! तिनें लक्ष्मण घायाळ झाला, पण मृत्यु पावला नाहीं ! हा प्रकार पाहून हनुमान् लक्ष्मणाच्या साहाय्यास धांवून गेला व त्यानें मुष्टिप्रहारानें रावणास पालथें पाडलें ! तेव्हां

त्याच्या नाकातोंडातून रक्त वाहूं लागलें ! तथापि लवकरच रावण भानावर आला, व युद्धास सज्ज झाला. नंतर हनुमानाच्या विनंतीवरून त्याच्या पाठीवर राम आरूढ झाला व रावणास म्हणाला, "हे राक्षसश्रेष्ठा, तूं आज माझ्या हातून जीवंत सुटत नाहींस ! लक्ष्मणाला तूं शक्ति मारलीस, पण मी तुझा पुत्रपौत्रांसह वध करतों !" असें म्हणून रामानें बाण वर्षावानें रावणाच्या रथाचा चक्काचूर केला व त्याच्या वक्षःस्थळावर तीव्र बाण मारून त्याला अतिशय घायाळ केलें. रामानें एका तेजस्वी बाणानें रावणाचा मुगुट फोडून तो खालीं पाडला ! अशा रीतीनें सर्वतोपरी फजित पावलेला रावण युद्धभूमि सोडून लंकेकडे निघून गेला !

## १५. कुंभकर्णाचा वध

लंकेंत गेल्यावर रावणानें दीर्घकाल झोंपेंत घोरत पडलेल्या कुंभकर्णाला जागें करून बोलावून आणण्याची राक्षसांना आज्ञा केली. त्या आज्ञेप्रमाणें ते राक्षस खाद्यपदार्थ, गंध, पुष्पें वगैरे घेऊन कुंभकर्णाच्या निवासस्थानीं गेले. ते राक्षस त्याला जाग आणण्य साठीं त्याची स्तुति करूं लागले; शंख, दुंदुभि वगैरेंचा त्यांनीं प्रचंड निनाद केला; किंबहुना, गदा, मुद्गर इत्यादि शस्त्रांचा ते त्यावर प्रहारादि करूं लागले ! परंतु काजळाच्या राशीसारखा दिसणारा व पातालाप्रमाणें मुख असलेला कुंभकर्ण जागा झाला नाहीं ! शेवटीं एक हजार हत्ती जेव्हां त्याच्या विशाल शरीरावरून धांवत नेण्यांत आले, तेव्हां कोठें कुंभकर्णास जागृति आली ! उठतांच त्यानें मेद व मद्य यांचें घट पिऊन टाकले व मांसान्नावर यथेच्छ हात मारला ! नंतर तो राक्षसांच्या समुदायासह रावणाकडे गेला. रावणानें उठून त्याचा सत्कार केला व त्यानेंहि वडील भ्रात्यास प्रणिपात केला. मग कुंभकर्ण रावणास म्हणाला, "हे राजा, मला झोंपेंतून कोणत्या कार्यासाठीं उठवून आणलें ? माझ्या हातून कोणाला मृत्यु पावून परलोकीं जावयाचें आहे ?" तेव्हां रावण म्हणाला, "निद्राधीन झाल्यामुळें तुला वानरसेनेसह राम लंकेवर चालून आल्याचें व त्याच्याशीं आपला घोर संग्राम चालू असल्याचें विदित नाहीं ! त्या रामापासून मला भय प्राप्त झालें आहे ! तें भय त्याला ससैन्य मारून तूं निवारण कर ! भ्रात्यासाठीं तूं हें दुष्कर कर्म कर ! यापूर्वी कोणत्याहि भ्रात्याशीं मी असें दीनपणाचें भाषण केलें नव्हतें !" हें ऐकून कुंभकर्ण हास्यपूर्वक म्हणाला, " हे महाराजा,

सीताहरणाच्या पापकृत्याचें फळ तुला लौकरच मिळालेलें दिसतें ! बुद्धिमान् व नीतिशास्त्रज्ञ मंत्र्यादिकांचा सल्ला न घेतां वागणारा राजा असाच गोत्यांत येतो ! क्रौंच पर्वताच्या गुहेंत पक्षी जसे सहज शिरूं शकतात, तद्वत्, अविचारी राजाचें छिद्र शत्रु सहज हुडकून काढतात ! बिभीषण व मंदोदरी तुझ्याशीं पूर्वी जें बोलले, तेंच तुझ्या हिताचें होतें ! " यावर रावण भिवया चढवून क्रोधानें म्हणाला, " पिता व आचार्य यांच्याप्रमाणें असणाऱ्या मला तूं उपदेश करूं पाहतोस काय ? स्वतःच्या पराक्रमावर जर तुझा विश्वास असेल, तर तूं रामाशीं युद्ध कर ! वाममार्गाला लागलेल्यास जो साहाय्य करतो, तोच भ्राता होय ! " नंतर कुंभकर्ण म्हणाला, " हे राजा, क्रोध सोडून तूं स्वस्थ रहा. युद्धांत ज्यांचे आप्तेष्ट मृत्यु पावले आहेत, ते सर्व लंकानिवासी राक्षस आज रामाचें मरण उघड्या डोळ्यांनीं पाहोत ! यापुढें सीता चिरकाल तुझीच होईल ! "

याप्रमाणें बोलून आपला प्रचंड शूल सरसावीत कुंभकर्ण रामावर चालून जाण्यास निघाला. रावणानें रत्नजडित सुवर्णहार व इतर अलंकार कुंभकर्णास घातले. त्यामुळें तो आहुति दिलेल्या अग्नीप्रमाणें शोभूं लागला ! कुंभकर्णाच्या कमरेला नीलमण्यांचा कृष्णवर्ण करगोटा होता. त्यानें तो, अमृतमंथनाच्या वेळीं वासुकि सर्पानें वेढलेला मंदर पर्वत जसा दिसला, तसा दिसूं लागला ! रणवाद्यांच्या व जयजयकाराच्या घोषांत मोठमोठ्या राक्षस योद्ध्यांसह कुंभकर्ण युद्धास निघाला. महाबलाढ्य कुंभकर्णाला पाहतांच वानरसैन्य चारी दिशांस पळूं लागलें ! अंगद वगैरे वीरांनीं महाप्रयासानें सैन्य थोपवून धरलें. नंतर घनघोर संग्रामास प्रारंभ झाला. कुंभकर्णानें वानरांचा अतोनात संहार केला ! सर्पांना भक्षण करणाऱ्या गरुडाप्रमाणें तो त्यांना भक्षण करूं लागला ! हनुमान्, नील, सुग्रीव हे श्रेष्ठ वानरवीर कुंभकर्णापुढें टिकूं शकले नाहींत ! हें पाहून लक्ष्मण रागानें त्याच्यावर चालून गेला. लक्ष्मणानें कुंभकर्णाचें कवच बाणांनीं व्याप्त करून टाकलें. पण कुंभकर्ण लक्ष्मणाला तुच्छतेनें म्हणाला, " हे सुमित्रापुत्रा, तूं बाल असूनहि आपल्या पराक्रमानें मला संतुष्ट केलें आहेस ! पण मला प्रथम रामाचा वध करण्याची इच्छा आहे ! नंतर मी तुम्हां उरलेल्यांचा समाचार घेईन ! " असें म्हणून कुंभकर्ण रामावर तुटून पडला. तो रामास म्हणाला, " मी विराध, कबंध, खर, वाली किंवा मारीच नसून कुंभ-

कर्ण आहे, हें लक्ष्यांत ठेव ! ” यावर रामानें वज्रासारखे बाण कुंभकर्णावर सोडले. ज्याप्रमाणें पर्वत जलधारा सहज सहन करतो, त्याप्रमाणें कुंभकर्णानें रामाची बाण-वृष्टि लीलेनें सहन केली ! तेव्हां रामानें वायव्यास्त्र सोडून मुद्गरासह कुंभकर्णाचा हात छाटून टाकला ! कुंभकर्ण दुसऱ्या हातानें झाड उपटून रामावर धांवला असतां रामानें ऐंद्रास्त्रानें त्याचा तोहि हात तोडला ! मग तो नुसताच धांवून येऊं लागला ! तेव्हां दोन तीक्ष्ण अर्धचंद्र बाण सोडून रामानें त्याचे दोन्ही पाय तोडले ! सरतेशेवटीं रामानें एक अमोघ बाण सोडून कुंभकर्णाचें मस्तक उडविलें, त्यावेळीं वानरसैन्यांत जी आनंदाची गर्जना उठली, ती दशदिशांत घुमली !

## १६. त्रिशिरादिकांचा वध

कुंभकर्णाच्या वधाची बातमी ऐकून रावण मूर्च्छितच पडला ! तो सावध झाल्यावर त्रिशिर, देवांतक, नरांतक व अतिकाय हे रावणाचे मुलगे आणि त्यांच्या रक्षणार्थ महोदर व महापार्श्व हे त्याचे भाऊ प्रबळ राक्षससैन्य घेऊन रामाशीं युद्ध करण्यासाठीं लंकेबाहेर पडले. राक्षससैन्य व वानरसैन्य यांनीं परस्परांचा पुष्कळच नाश केला. परंतु रामसेनेंतील श्रेष्ठ वीरांनीं पराक्रमाची शर्थ करून शत्रूला जेर केलें. त्रिशिरास व देवांतकास हनुमानानें, नरांतकास अंगदानें व अतिकायास लक्ष्मणानें रणांगणावर यमसदनास पाठविलें ! तसेंच महोदराचा नीलानें व महापार्श्वाचा ऋषभानें बळी घेतला ! ही दुर्वार्ता लंकेंत समजल्यानंतर इंद्रजित् क्रोधसंतप्त होऊन राम-लक्ष्मणांशीं युद्ध करण्यासाठीं रणांगणावर आला. इंद्रजितानें आपल्या रथाच्या चारीबाजूंस रक्षणार्थ राक्षस उभे केले आणि मंत्रांच्या योगानें तो अग्नीमध्यें यथा-विधि हवन करूं लागला. दर्भांच्याऐवजीं दर्भ म्हणून तो शस्त्रेंच वापरीत होता ! त्याच्या समिधा बेहड्याच्या झाडाच्या असून यज्ञासाठीं इंद्रजित लोखंडी पळी वापरीत होता ! अग्नीचें पूजन करून कृष्णवर्ण जीवंत बोकड त्यानें अग्नींत अर्पण केला. याप्रमाणें हवन करून इंद्रजित् आकाशांत गुप्त झाला. अदृश्य स्थितींत राहूनच इंद्रजित् युद्ध करूं लागला. त्याच्या बाणवृष्टीमुळें वानरसेनेचा भयंकर संहार झाला ! नंतर त्यानें ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून राम व लक्ष्मण हे बंधु आणि सुग्रीव, अंगद--वगैरे कपिश्रेष्ठ यांना मूर्च्छित केलें. तेव्हां बिभीषण वानरसैन्याला धीर देऊं लागला. राम--लक्ष्मणांना निश्चेष्ट केल्यानंतर रावणाला ती सुवार्ता कळविण्यासाठीं

इंद्रजित् लंकेस निघून गेला. इकडे रणांगणावर त्या दिवशींच्या युद्धांत सायंकाळपावेतों सदुसष्ट कोटि वानर मरून पडले होते! रात्र होऊन अंधार पडला असतां बिभीषण व हनुमान् यांनीं हातांत दिवट्या घेतल्या व ते रणभूमीवर रात्रीं संचार करूं लागले. सर्वत्र मृत वानरांचा नुसता खच पडला होता! राम, लक्ष्मण, सुग्रीव—वगैरेस शुद्धीवर आणण्यासाठीं काय उपाय योजवा, अशी बिभीषणानें वृद्ध जांबवानाला पृच्छा केली. तेव्हां जांबवान् हनुमानाला म्हणाला, " तूं उड्डाण करून हिमाचलावर जा. त्या पर्वताच्या ऋषभ व कैलास पर्वतांच्या दरम्यान ओषधींनीं भरलेला ओषधि पर्वत आहे. त्यावरील चार दिव्य ओषधि तूं घेऊन ये." हें ऐकून हनुमान् आकाशमार्गानें हिमाचलावर गेला आणि तेथील तो ओषधि पर्वतच उपटून घेऊन आला! त्या अप्रतिम ओषधींच्या वासानेंच राम-लक्ष्मण वगैरे वीर शुद्धीवर आले आणि जखमा बुजून पूर्वींसारखे सामर्थ्यवान् झाले. मृत झालेले वानरहि त्या ओषधींनीं जीवंत झाले. रावणाच्या आज्ञेनें मेलेले राक्षस समुद्रांत टाकण्यांत येत असल्यामुळें ते मात्र जीवंत होऊं शकले नाहींत! नंतर हनुमानानें तो पर्वत जेथल्या तेथें नेऊन ठेवला व तो परत आला.

कुंभकर्ण व रावणाचे पुत्र युद्धांत पडल्यामुळें रावणाकडून लंकेचें संरक्षण नीट होणार नाहीं, अशा कल्पनेनें सुग्रीवानें काळोख्या रात्रींच्या अंधारांत वानरांना लंकेवर हल्ला करण्याची आज्ञा केली. तिला अनुसरून वानर-वीर हातांत दिवट्या घेऊन लंकेवर तुटून पडले. त्या वानरांनीं लंकानगरी अग्नीला अर्पण करण्याचा धूमधडाका चालविला! लंकेंतील वाडे एकामागून एक पेटलेले पाहून तेथें एकच हाहाःकार उडाला! सुग्रीवाच्या आज्ञेनें वानर-वीर एकेका वेशीचें दार अडवून बसले. त्या दारांतून बाहेर पडण्याचा प्रयत्न करणाऱ्या राक्षसांना ते ठार मारूं लागले! हा सर्व प्रकार पाहून रावण संतप्त झाला. त्यानें कुंभ व निकुंभ हे कुंभकर्णाचे मुलगे वानरसैन्यावर पाठविले. यूपाक्ष, शोणिताक्ष, प्रजंघ, कंपन हे राक्षसवीरहि त्यांच्याबरोबर होते. तेव्हां पुनः रणचंडीचें भीषण तांडवनृत्य सुरूं झालें! सुग्रीवानें कुंभाला व हनुमानानें निकुंभाला ठार करून भूमीवर लोळविलें. नंतर खर राक्षसाचा पुत्र मकराक्ष हा वानर-सैन्यावर चालून आला. त्याला रामानें अग्न्यस्त्रानें यमसदनास पाठविलें!

## १७. इंद्रजिताचा वध

राक्षसवीरांचा हा संहार पाहून रावणानें इंद्रजितास निकराचा प्रयत्न करण्याची आज्ञा केली. नित्याप्रमाणें इंद्रजितानें अग्नींत काळ्या बकऱ्याचें हवन केलें आणि गुप्त होऊन त्यानें राम-लक्ष्मण व वानरसैन्य यांच्यावर बाणांची केवळ श्रावणझड सुरू केली ! इंद्रजिताच्या बाणापुढें वानर पटापट मरून पडूं लागले. याचवेळीं राम-लक्ष्मण व वानर गलितधैर्य व्हावें, म्हणून इंद्रजितानें माया सीता निर्माण केली. तिला रथांत बसवून व तिचे केंस धरून ती " राम ! राम ! " असा आक्रोश करीत असतां इंद्रजितानें तिचा तरवारीनें वध केला ! हा अघोर प्रकार पाहून सर्व वानरसैन्य गलितधैर्य झालें व सैरावैरा पळूं लागले ! इंद्रजितानें सीतेचा वध केल्याचें रामास हनुमानाकडून कळतांच तो मूर्च्छित होऊन पडला ! तेव्हां लक्ष्मणानें त्याला मांडीवर घेतलें व तो परोपरीनें त्याला शुद्धीवर आणण्याची खटपट करूं लागला. हें होत असतां बिभीषण त्या ठिकाणीं आला. आतांपर्यंत सावध झालेल्या रामास तो म्हणाला, " हे रामा, सीतेसंबंधींचा रावणाचा अभिलाष लक्ष्यांत घेतां सीतावधास तो संमति देणें अशक्य आहे ! तुम्हां सर्वांस हतप्रभ करण्यासाठीं इंद्रजितानें ही माया उत्पन्न केली आहे ! इंद्रजित आज निकुंभिलेच्या देवालयांत होम करणार आहे. होम पुरा झाल्यानंतर त्याला तूंच काय, पण कोणीच जिंकू शकणार नाहीं ! तेव्हां त्याच्यावर लक्ष्मणास सत्वर पाठव. " बिभीषणाचें हें भाषण रामास मान्य होऊन त्यानें लक्ष्मणास इंद्रजितावर हल्ला करण्याची आज्ञा केली.

लक्ष्मणानें कवच धारण करून उत्कृष्ट धनुष्य व बाण घेतले, रामाचे चरण वंदन करून बिभीषण, हनुमान वगैरे श्रेष्ठवीरांबरोबर प्रचंड सैन्यासह लक्ष्मण निकुंभिलेकडे निघाला. शत्रूंना अहितकारक असें भाषण करणारा बिभीषण लक्ष्मणाला म्हणाला, " हें मेघासारखें कृष्णवर्ण राक्षससैन्य दिसत आहे, तें वानरांकडून पाषाणांनीं तूं फोड; म्हणजे त्याच्यापलीकडे तुला इंद्रजित् दिसूं लागेल. त्याचें होमकर्म संपण्याच्या आंतच त्याच्यावर तूं चाल करून जा व त्याला ठार कर. " हें ऐकून लक्ष्मणानें वानर व ऋक्ष यांना राक्षससैन्यावर जोराचा हल्ला करण्याची आज्ञा केली. लगेच झाडें व पाषाण घेऊन वानर राक्षसांवर तुटून पडले. आपलें सैन्य

जर्जर झाल्याचें दिसतांच इंद्रजित् होमकर्म समाप्त न होतांच उठला आणि रथावर आरूढ होऊन वानर सैन्यावर चाल करून गेला. इंद्रजितानें प्रथम आपला रथ हनुमानावर घातला. तेव्हां इंद्रजिताच्या हातून हनुमान् मृत्यु पावण्याचा संभव आहे, असें पाहून बिभीषणानें लक्ष्मणास त्याला सत्वर ठार करण्याची सूचना केली. ज्या नीलवर्ण वटवृक्षाखालीं इंद्रजित् होमकर्म करीत असे, तो वटवृक्षहि बिभीषणानें लक्ष्मणास दाखविला. इंद्रजित् त्या वटवृक्षाजवळ जाण्यापूर्वीच त्याला ठार करण्याची आवश्यकता असल्याचें बिभीषणानें लक्ष्मणास सांगितलें. इतक्यांत इंद्रजिताचें लक्ष्य बिभीषणाकडे गेलें. तेव्हां तो अत्यंत कठोर शब्दांत बिभीषणास म्हणाला, " तूं माझ्या पित्याचा प्रत्यक्ष भ्राता असतां माझें अहित कसें करीत आहेस ? हे दुर्बुद्धे, स्वजनाचा त्याग करून परजनाचा दास बनल्यानें तूं सर्वांच्या निंदेस पात्र झाला आहेस ! " यावर बिभीषण म्हणाला, " मी राक्षसकुळांत जन्मलों असलों, तरी त्या कुळांत दुर्मिळ अशी सात्त्विकता माझ्या ठायीं आहे. परस्त्री व परद्रव्य यांचा लोभ धरणाऱ्या तुझ्या पित्याचा सपरिवार नाश होणार आहे, हें निश्चित समज ! " हें ऐकून इंद्रजित् तेथून रागारागानें दुसरीकडे गेला. नंतर वानर व राक्षस यांचा भयंकर संग्राम सुरू झाला. लौकरच इंद्रजित् व लक्ष्मण यांची गांठ पडली. ते दोघे वीर परस्परांस मर्मभेदक वचनें बोलून परस्परांवर तुटून पडले. लक्ष्मणानें बाणानें इंद्रजिताचें सोन्याचें चिलखत फोडलें. उलट, लक्ष्मणावरहि इंद्रजितानें तीव्र बाण सोडले. इतक्यांत लक्ष्मणानें इंद्रजिताच्या सारथ्याचें मस्तक शरीरापासुन तोडलें. तेव्हां इंद्रजित् रथाचें सारथ्य करून शिवाय बाणवर्षावहि करीत होता ! गंधमादन वगैरे चौघे वानर-वीर उडी मारून इंद्रजिताच्या चार घोड्यांवर आरूढ झाले. त्यासरशीं त्यांच्या भारानें ते घोडे मरून पडले ! तेव्हां इंद्रजित् कांहीं काळ पायींच युद्ध करूं लागला. मध्येंच वानरांची दृष्टि चुकवून इंद्रजित् लंकानगरीस गेला व नवीन रथांत बसून पुनः युद्धभूमीवर आला. त्याचें कौशल्य पाहून लक्ष्मण, बिभीषण वगैरे थक्क झाले ! लौकरच लक्ष्मणानें इंद्रजिताचा सारथी पुनः ठार केला. तरी-सुद्धां इंद्रजित् न डगमगतां रथाखालीं उतरला व त्यानें बिभीषणावर एक शक्ति सोडली. तिचे लक्ष्मणानें बाणानें तुकडे केले ! लक्ष्मणानें वरुणास्त्र सोडलें, तेव्हां इंद्रजितानें आग्नेयास्त्र सोडलें. लक्ष्मणानें त्या अस्त्राचें सौर्यास्त्रानें निवारण केलें. असा

त्या दोन वीरांचा तुमुल संग्राम चालला होता. नंतर लक्ष्मणानें ऐंद्रास्त्रानें अभिमंत्रण करून एक श्रेष्ठ बाण धनुष्यास लावला. आणि " राम जर धर्मात्मा, सत्यवचनी व अतुल पराक्रमी असेल, तर इंद्रजित् मृत्यु पावो ! " असें म्हणून तो बाण सोडला. त्या बरोबर इंद्रजिताचें मस्तक तुटून जमिनीवर पडलें ! यावेळीं वानरांनीं व अंतरिक्षांतून देवगंधर्वांनीं प्रचंड जयघोष केला आणि राक्षस लंकेकडे पळत सुटले ! लक्ष्मण वानरसेनेसह मोठ्या हर्षानें रामाकडे जाण्यास निघाला. रामानें लक्ष्मणाच्या मस्तकाचें अवघ्राण केलें आणि त्याला प्रेमानें मांडीवर बसवून तो त्याच्या विदीर्ण झालेल्या शरीरावरून हात फिरवूं लागला. राम म्हणाला, " हे लक्ष्मणा, रावणपुत्राच्या वधानें आज रावणवधच झाला, असें मी समजतों ! आतां सीता व पृथ्वी यांपैकीं कोणीच मला दुर्लभ नाहीं ! " नंतर सुषेणानें सांगितलेल्या औषधि हुंगल्यामुळें लक्ष्मणाचें शरीर पुनः टवटवीत झालें.

इंद्रजिताच्या वधाची वार्ता ऐकून रावण पराकाष्ठेचा शोकविव्हल झाला व दीर्घकाल मूर्च्छित होऊन पडला. शुद्धीवर आल्यावर तो विलाप करूं लागला, " हे महाबलाढ्य पुत्रा, तूं पूर्वीं इंद्राचाहि पराभव केला असतां तुला आज लक्ष्मणानें कसें मारलें ? तुझ्यावांचून मला सर्व शून्य वाटत आहे ! अरे, माझी उत्तरक्रिया तूं पुत्रानें करावयाची, मग असें विपरीत कां बरें केलेंस ? " इतकें बोलून ज्या सीतेमुळें हा सर्व अनर्थ झाला, तिला ठार करण्यासाठीं खड्ग घेऊन रावण सचिवांसह अशोक वनाकडे गेला. त्याला पाहून बिचारी सीता थरथर कांपूं लागली ! तेव्हां सुपार्श्व नांवाचा अमात्य रावणास म्हणाला, " हे राजा, स्त्रीवध करण्यास तूं कसा उद्युक्त झाला आहेस ? तूं आपला क्रोध रामावरच सोड आणि त्याला ठार मारून सीतेची प्राप्ति करून घे ! " हें भाषण ऐकल्यावर रावण तेथून परत गेला.

नंतर रावण दरबारांत जाऊन बसला असतां राक्षसांना म्हणाला, " तुम्ही सर्वजण आज रामाबरोबर निकराचें युद्ध करा. तुमच्या हातून तो आज न मेल्यास मी उद्यां त्याचा वध करतों ! " ही आज्ञा ऐकून असंख्य राक्षस वानरसैन्यावर धांवून गेले. त्यांनीं आपल्या शक्तीची पराकाष्ठा करून पाहिली. परंतु एकट्या रामानें त्या सैन्याचा फार मोठा भाग आपल्या बाणांनीं निःशेष केला ! उरलेले राक्षस लंकेकडे पळून गेले.



लक्ष्मणावर शक्तीचा प्रहार

आतांपर्यंतचा राक्षसांचा झालेला अगणित संहार पाहून लंकेंत अतिशय हाहाःकार उडाला ! मेलेल्या राक्षसांच्या नाऱ्यांतील स्त्रिया करुणस्वरानें विलाप करूं लागल्या. कोणाचे पति, कोणाचे पुत्र, तर कोणाचे बंधु संग्रामांत मृत्यु पावले होते ! अशा सर्व राक्षसस्त्रिया एकमेकींस कवटाळून आक्रोश करीत होत्या आणि आपला सर्वनाश करण्यास कारणीभूत झाल्याबद्दल रावणाच्या नांवानें बोटें मोडीत होत्या !

## १८. लक्ष्मणावर शक्तीचा प्रहार !

आपल्या सैन्याचा वारंवार पराभव होत असलेला पाहून रावण संतापला व पुनः युद्धास तयार झाला. रथांत बसून तो रामावर चालून गेला, तेव्हां रथाच्या घडघडाटानें दशदिशा नादित झाल्या. रावणानें अत्यंत घोर असें तामसास्त्र वानरावर सोडलें, तें त्यांना एकसारखें दग्ध करीत सुटलें ! इतक्यांत रावणानें लक्ष्मणासह उभ्या असलेल्या रामास अवलोकन केलें. तेव्हां त्यानें त्या दोघां भ्रात्यांवर बाण सोडले. प्रत्युत्तरादाखल राम व लक्ष्मण या दोघांनींहि त्याच्यावर बाणांचा वर्षाव केला. चंद्रसूर्यांजवळ आलेला राहू जसा दिसतो, तसा त्या राजपुत्रांच्या बाणांच्या टप्प्यांत सांपडलेला रावण दिसूं लागला ! रावणानें घोर आसुरास्त्राचा प्रयोग केला, तेव्हां रामानें अग्न्यस्त्रानें त्याचें निवारण केलें. रावणानें मयनिर्मित दुसरें एक अस्त्र सोडलें, त्याचा रामानें गांधर्वास्त्रानें मोड केला. एवढ्यांत लक्ष्मणानें सात बाणांच्या योगानें मनुष्य मस्तकानें युक्त अशा रावणाच्या ध्वजाचे तुकडे केले, इतकेंच नव्हे, तर त्याच्या सारथ्याचें मस्तक उडवून त्याचें धनुष्यहि तोडलें ! हें पाहून बिभीषणानें रावणाचे घोडे गदेनें ठार केले. तेव्हां संतप्त होऊन रावणानें एक शक्ति बिभीषणावर सोडली, ती लक्ष्मणानें मध्येंच तोडली. तीन तुकडे होऊन खालीं येऊन पडणारी तीहि प्रज्वलित शक्ति आकाशांतून सूटुन तुकडे होऊन पडणाऱ्या पेटलेल्या उल्केप्रमाणें वाटली ! नंतर अमोघ म्हणून नांवाजलेली व कालास दुःसह अशी शक्ति रावणानें लक्ष्मणाला उद्देशून टाकली. ती शक्ति आठ घंटांनीं युक्त असून तिचा मोठा ध्वनि होत होता आणि ती तेजानें जणूं काय जळत असल्यासारखी वाटत होती. लक्ष्मणाच्या वक्षःस्थलावर ती शक्ति येऊन पडतांच तो भूमीवर धाडकन् कोसळला ! रामानें हें पाहिलें, तेव्हां त्याचे डोळे अश्रूंनीं भरून आले. लक्ष्मणाला हृदयाशीं कवटाळून तो हनुमान् व सुग्रीव यांना म्हणाला, " तुम्ही लक्ष्म-

याचें रक्षण करा. मी आजच दुष्ट रावणाचा वध करतों ! " इतकें बोलून रामानें रावणावर घोर बाण सोडले. तेव्हां रावण भीतीनें पळून गेला.

नंतर मूर्च्छित पडलेल्या लक्ष्मणास पाहून राम शोक करूं लागला, " ज्याअर्थी लक्ष्मण वध पावला आहे, त्याअर्थी युद्धाची किंवा स्वतःच्या प्राणांची तरी मला काय आवश्यकता आहे ? भ्राते पुष्कळ झाले, पण लक्ष्मणासारखा भ्राता कोठें आढळणार नाहीं ! लक्ष्मणावांचून मी सुमित्रेस तोंड कसें दाखवूं ? " यावर सुषेण रामास म्हणाला, " हे रामा, दुःख करूं नकोस. लक्ष्मणाचें मुख सतेज दिसत असून हा जीवंत असल्याचें सिद्ध होत आहे. " नंतर सुषेणानें हनुमानास महोदय-पर्वतावर जाऊन तेथून महौषधि आणण्यास सांगितलें. हनुमान् मनोवेगानें जाऊन त्या महौषधींचें पर्वतशिखरच घेऊन परत आला. सुषेणानें ती औषधि लक्ष्मणाच्या नाकांत घातली. त्याबरोबर तो शल्यरहित व व्यथारहित होऊन उठला. अश्रूंनीं डोळे भरून आलेल्या रामानें " ये ! ये ! " असें म्हणून लक्ष्मणास गाढ आलिंगन दिलें. लक्ष्मण पूर्ववत् झालेला पाहून वानरसैन्यांत आनंदी आनंद झाला !

## १९. रावणाचा वध

यानंतर राम व रावण यांचें अखेरचें युद्ध झालें. रावण रथांत बसला होता, तर राम जमिनीवरूनच युद्ध करीत होता. तेव्हां इंद्रानें आपल्या मातलि नांवाच्या सारथ्याबरोबर आपला दिव्य रथ रामाकडे पाठविला. त्यावर आरूढ होऊन राम रावणावर चालून गेला. राम व रावण यांचें अभूतपूर्व युद्ध सुरूं झालें. रामानें रावणाच्या गांधर्वास्त्राचा गांधर्वास्त्रानें व दैवास्त्राचा दैवास्त्रानें मोड केला. रावणानें राक्षसास्त्र सोडलें, तेव्हां महाविषारी सर्पांनीं दिशा भरून गेल्या. त्यावर रामानें गरुडास्त्र सोडून त्या अस्त्राचा मोड केला. रावणानें रामाला मारण्यासाठीं अतिभयंकर शूल हातांत घेतला. आठ घंटा असणारा तो शूल पाहून रामानें इंद्राकडून आलेली भयानक शक्ति फेंकून तो शूल मोडून टाकला. राम रावणाला म्हणाला, " हे राक्षसाधमा, चोराप्रमाणें माझी भार्या हरण करणारा तूं शूर कोठला ? आज सुदैवानें तूं माझ्यासमोर आला आहेस ! मी आज तुला अवश्य यमसदनास पाठवितों ! " असें म्हणून रामानें रावणाला बाणवृष्टीनें जर्जर केलें. रावण घाबरून जाऊन शस्त्र उचलीनासा झाला व धनुष्यहि ओढीनासा झाला ! तेव्हां रामानें

त्याच्यावर आघात करण्याचें थांबविलें ! रावणाची ही दशा पाहून त्याच्या सारथ्यानें युद्धभूमीवरून रथ दूर नेला !

शुद्धीवर आल्यानंतर रावणानें आपल्या सारथ्याची अतिशय निर्भर्त्सना केली ! तो म्हणाला, " हे दुर्बुद्धे, माझा रथ रणांगणांतून दूर कां आणलास ? यश, वीर्य वगैरेसंबंधींची माझ्याबद्दलची लोकांची खात्री तूं नष्ट केलीस ! " यावर सारथी म्हणाला, " हे महाराज, श्रमामुळें आपण शत्रूहून अधिक शौर्य दाखवूं शकणार नाहीं, असें मला वाटलें ! आपणाबद्दलच्या प्रेमामुळेंच मी रथ परत आणला ! " हें ऐकून रावण शांत झाला व सारथ्यास उत्कृष्ट हस्तभूषण देऊन तो पुनः युद्धभूमीवर रामाच्या समोर येऊन ठेपला.

युद्धामुळें रामहि दमला होता. तेव्हां देवाबरोबर युद्ध पाहण्यास आलेले अगस्त्यमुनि रामाजवळ येऊन म्हणाले, " हे रामा, मी सांगतों तें आदित्यहृदय स्तोत्र जपून तूं युद्ध कर. म्हणजे, तुझ्या हातून रावण निश्चित मरेल ! " असें सांगून अगस्त्यऋषि निघून गेले. रामानें आदित्यहृदय स्तोत्राचा जप केल्यावर त्याचा उत्साह द्विगुणित झाला. रावणाच्या सारथ्यानें कृष्णवर्ण अश्व जोडलेला त्याचा रथ वेगानें युद्धभूमीवर आणला. तो पाहून राम इंद्रसारथि मातलीस म्हणाला, " तुला सारथ्य कर्मासंबंधीं मी कांहीं शिकवावयास नको ! परंतु हा शत्रूचा रथ सव्य घालून आपल्याकडे येत आहे, तेव्हां माझा वध करण्याचें रावणानें मनांत आणलेलें दिसतें ! तेव्हां गोंधळून न जातां तूं सारथ्यकर्म कर ! " यानंतर राम रावणाचें अटीतटीचें युद्ध सुरू झालें. दोन्ही दलांतील सैनिक तें युद्ध पाहत असतां चित्रासारखे दिसत होते ! ते दोघे योद्धे परस्परांवर शस्त्रास्त्रांचा भडिमार करीत होते. ते एकमेकांवर तुटून पडत असतां त्यांचे सारथीहि आपापले रथ पुढें नेणें, मागें आणणें, सरळ चालविणें व मंडलाकार फिरविणें वगैरे नानाप्रकारचें सारथ्य कर्मांतील कौशल्य दाखवीत होते ! हें अद्भुत युद्ध पाहणारे गंधर्व व अप्सरा यांचे समुदाय आपापसांत बोलूं लागले, " नीलवर्णामुळें सागराला आकाशाची व आकाशाला सागराची उपमा देतां देईल; परंतु राम रावणाच्या युद्धाला मात्र राम रावणाच्या युद्धाचीच उपमा द्यावी लागेल ! " नंतर रामानें एक भुजंगासारखा तीक्ष्ण बाण सोडून कुंडलयुक्त असें रावणाचें मस्तक तोडलें व तें त्रैलोक्यानेंहि अवलोकन

केलें! परंतु लगेच रावणाच्या मस्तकाच्या ठिकाणीं दुसरें मस्तक निर्माण झालें! अशीं शंभर मस्तकें रामानें तोडलीं! परंतु रावणाचा अंत झाल्याचें दिसेना! तेव्हां मातलि रामाला म्हणाला, " हे वीरा, तूं हें काय चालविलें आहेस? रावणाच्या वधासाठीं तूं पैतामहास्त्राचा प्रयोग कर! याच्या मृत्यूची जी वेळ देवांनीं सांगून ठेवली आहे, ती आज प्राप्त झाली आहे!" तेव्हां रामानें वेदोक्त विधीनें अभिमंत्रण करून धनुष्यास बाण लावला व तो रावणावर सोडला. त्यासरशीं रावण मृत्यु पावून रथांतून भूमीवर पडला! रामाचें हें अपूर्व कृत्य पाहून वानर आनंदानें गर्जना करूं लागले, आकाशांत देवांच्या दुंदुभि वाजूं लागल्या आणि सर्वजण " साधु! साधु!" अशा शब्दांत रामाची वाखाणणी करूं लागले! नंतर सुग्रीव, बिभीषण वगैरेंनीं रामाचें यथाविधि पूजन केलें.

## २०. रावणाची अंत्यक्रिया

आता रावण युद्धांत पडलेला पाहून बिभीषणास अतिशय शोक झाला व तो विलाप करूं लागला, " हे पराक्रमी वीरा, मद व मोह यांनीं व्याप्त झाल्यामुळें तुला मीं केलेलें भविष्य पटलें नव्हतें, पण तेंच आतां खरें झालें आहे. हा लंकाधिपति युद्धभूमीवरील धुळींत लोळत पडला आहे, तेव्हां आतां त्या लंकेंत काय स्वारस्य उरलें आहे बरें? पराक्रम व उत्साह याच ज्याच्या ज्वाला, निःश्वास हाच ज्याचा धूर व सामर्थ्य हीच ज्याची दाहशक्ति--अशा रावणरूपी अग्नीला रामरूपी मेघानें विझवून टाकलें आहे!" बिभीषणाचा हा विलाप ऐकून राम त्याला म्हणाला, " हा महान् वीर दुर्बलासारखा नाश पावला नसून दैवानें मृत्युवश झाला आहे! क्षात्रधर्माचें अवलंबन करतांना जे युद्धांत मरतात, त्यांच्यासाठीं शोक करणें उचित नाहीं!" यावर बिभीषण म्हणाला, " राक्षसराज रावण मोठा दाता असून अग्निहोत्री होता! त्यानें वेदाध्ययन केलेलें होतें! तरी, त्याचें और्ध्वदेहिक कर्म करण्याची मला परवानगी दे!" तेव्हां राम म्हणाला, " वैर मरणापर्यंतच असतें व आतां हा तुझ्याप्रमाणेंच मलाहि आहे, असें मी समजतों! तरी, याचा अंत्यसंस्कार तूं अवश्य कर."

रावण-वधाचें वृत्त ऐकून " हे आर्यपुत्र! हे नाथ!" असा शोक करीता त्याच्या सर्व बायका रणभूमीवर येऊन जमिनीवर पडल्या. कोणी त्याला कवट-

ळून रडूं लागल्या! रावणाची पट्टराणी मंदोदरी हिनें केलेला शोक अत्यंत हृदय-द्रावक होता. ती म्हणाली, " हे महापराक्रमी राजा, तुझ्यासमोर उभें राहण्यास इंद्रहि भीत असे ! तेव्हां एका मानवानें तुझा वध कसा बरें केला ? बिभीषणानें व मीं ' रामाशीं वैर करूं नकोस ! ' असें सांगितलें असतांहि तूं तें ऐकिलें नाहींस ! त्याचेंच हें फल तुला प्राप्त झालें आहे ! साध्वी सीतेला कपटानें आणून तूं कुळास कलंक लावला ! तिच्याच तपोतेजानें तूं खरोखर जळून भस्म झाला आहेस ! आतां सीता शोकमुक्त होऊन रामासह सुखांत राहील, मी मात्र शोकसमुद्रांत पडलें आहे ! हाय ! हाय ! वैधव्याची निकृष्ट स्थिति मला प्राप्त झाली आहे ! " अशा प्रकारें मंदोदरीनें परोपरीनें शोक केला व ती मूर्च्छित होऊन रावणाच्या वक्षःस्थला-वर पडली ! तिच्या इतर सवतींनीं सावध करून तिचें महत्प्रयासानें सांत्वन केलें.

नंतर रावणाचा और्ध्वदेहिक विधि पार पाडण्यांत आला. बिभीषणानें त्याचें अग्निहोत्र बाहेर काढलें. सोन्याच्या पालखींत रेशमी वस्त्रांनीं वेष्टिलेला रावणाचा देह बसविण्यांत आला. स्मशानांत गेल्यावर चंदनादि काष्ठांनीं चिता रचून तिजवर रावणाचा देह ठेवला व बिभीषणानें चितेस अग्नि दिला !

रावण-वधानंतर इंद्रसारथि मातलि स्वर्गलोकास निघून गेला. नंतर राम लक्ष्म-णास म्हणाला, " हे सौम्या, बिभीषणास लंकेंत अभिषेक कर ! यानेंच आपणास उपकृत केलें आहे ! " लक्ष्मणानें " ठीक आहे ! " असें म्हणून सुवर्णघटांत वानरांकडून समुद्राचें उदक आणविलें. मग बिभीषणास सिंहासनावर बसवून राक्ष-सांचा राजा म्हणून त्याला लंकेंत विधिपूर्वक राज्याभिषेक करण्यांत आला. राक्षसांना आणि राम-लक्ष्मणासह वानरांना या गोष्टीचा परम हर्ष झाला.

## २१. सीता शुद्धि

रामाच्या आज्ञेवरून रावण मेल्याची बातमी सीतेला सांगण्यासाठीं हनुमान् लंकेंतील अशोक वनामध्यें गेला. त्यानें तिला सर्व वृत्तांत निवेदन केला. ती अत्यानंदाची बातमी ऐकून सीतेच्या तोंडून कांहीं वेळ शब्दच फुटेना ! क्षणभरानें ती डोळयांत आनंदाश्रु आणून सद्‌गदित वाणीनें हनुमानास म्हणाली, " या शुभवार्ते-साठीं तुला द्यावयास मजजवळ कांहींच नाहीं ! तूं कथन केलेल्या वृत्ताला योग्य असें बक्षीसच पृथ्वींत नाहीं, असेंहि मला वाटतें ! " यावर हनुमान् म्हणाला,

" अशा प्रकारचें प्रेमपूर्ण भाषण करण्यास तूंच योग्य आहेत ! " सीताहि माधुर्यानें हनुमानास म्हणाली, " असें गोड भाषण तरी तूंच करूं शकतोस आणि धैर्य, विनय इत्यादि उत्कृष्ट गुण तरी तुझ्याच ठिकाणीं आहेत ! " नंतर हनुमानानें सीतेस छळणाऱ्या राक्षसींचा वध करण्याची इच्छा सीतेजवळ प्रगट केली ! तेव्हां ती दयाळू सीता म्हणाली, " रावणाच्या आज्ञेमुळें या राक्षसी माझ्याशीं निष्ठुरतेनें वागत होत्या. पण रावण मेल्यामुळें आतां त्यांचें वागणेंहि बदललें आहे ! " जाण्यापूर्वी " रामास कांहीं निरोप सांगावयाचा आहे काय ? " असें हनुमानानें विचारलें असतां " भक्तवत्सल भर्त्याच्या दर्शनाची इच्छा आहे ! " असें सीता म्हणाली.

सीतेचा निरोप हनुमानाकडून कळल्यानंतर रामानें बिभीषणास म्हटलें, " शिरः-स्नान करून दिव्य वस्त्रें व अलंकार धारण केलेल्या सीतेस सत्वर घेऊन ये ! " सीतेकडे जाऊन बिभीषणानें तिला रामाची आज्ञा सांगितली. तेव्हां सीता म्हणाली, " स्नान केल्याशिवायच भर्त्याला पाहण्याची माझी इच्छा आहे ! " यावर बिभीषण म्हणाला, " भर्त्यानें सांगितल्याप्रमाणें कर ! " नंतर शिरःस्नान करून व वस्त्रालंकार धारण करून सीता पालखीमधून रामाकडे येण्यास निघाली. ऋक्ष, वानर व राक्षस तिला पाहण्यासाठीं गर्दी करूं लागले असतां काठ्या घेतलेले सेवक त्यांना हटवूं लागले ! तेव्हां राम रागावून म्हणाला, " सीतेला सर्वांस पाहूं द्या व तिला पायींच इकडे येऊं द्या ! " या भाषणानें लक्ष्मणादिकांस फार दुःख झालें ! बिचारी सीता अंग चोरीत रामापुढें येऊन उभी राहिली. राम म्हणाला, " हे कल्याणि, शत्रूस ठार करून व तुला जिंकून मीं माझें कर्तव्य केलें आहे ! शत्रूच्या घरीं दीर्घकाल राहिलेल्या तुझा कुलीन म्हणविणारा मी कसा स्वीकार करूं ? तेव्हां तूं पाहिजे तेथें जा ! " हें कठोर भाषण ऐकून सीता अश्रु ढाळूं लागली. ती गहिंवरून म्हणाली, " हे वीरा, राक्षसानें मला बलात्कारानें आणलें, तो त्याचा स्पर्श माझ्या इच्छेनें झालेला नाहीं ! तुला वाटतें तशी मी नाहीं ! माझा त्यागच करावयाचा होता, तर युद्धाचा खटाटोप तरी कशाला केला ? " नंतर लक्ष्मणाकडे वळून ती म्हणाली, " हे लक्ष्मणा, चिता तयार कर ! मिथ्या अपवादानें ग्रासल्यानें मी जीवंत राहूं इच्छित नाहीं ! " बिचाऱ्या लक्ष्मणानें निरुपायानें चिता सज्ज केली. रामाला प्रदक्षिणा करून व अग्नीजवळ उभी राहून सीता म्हणाली, " मी जर शुद्ध असेन,

तर लोकसाक्षी अग्नि माझें सर्वतोपरी रक्षण करील !" असें म्हणून सीतेनें अग्नींत निःशंक उडी घेतली ! यज्ञांतील पूर्णाहुतीच की काय, अशी ती त्यावेळीं दिसली ! तेव्हां सर्वजण "हाय ! हाय !" असे उद्‌गार काढूं लागले !

यावेळीं रामाचे डोळे अश्रूंनीं भरून आले. इतक्यांत इंद्र, वरुण, शंकर, ब्रह्मदेव, कुबेर व यम विमानांत बसून लंकेला रामाकडे आले आणि त्याला म्हणाले, "तूं सर्व लोकांचा उत्पत्तिकर्ता असतां सामान्य माणसाप्रमाणें सीतेला कसा टाकतोस ?" याच वेळीं साक्षात् अग्नि सीतेला अंकावर घेऊन चितेंतून प्रगट झाला. तो रामाला म्हणाला, "हे रामा, सीतेच्याठिकाणीं कसलाहि दोष नाहीं ! तूं शुद्ध अंतःकरणानें निष्पाप सीतेचा स्वीकार कर !" हें ऐकून रामाचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले. तो अग्नीला म्हणाला, "लोकांसमक्ष सीतेची शुद्धि होणें अवश्य होतें ! नाहीं तर, त्यांनीं मला विषयलंपट व बालिश म्हटलें असतें !" या नंतर रामानें सीतेचा सप्रेम स्वीकार केला. नंतर इंद्रलोकाहून विमानांत बसून आलेल्या दशरथाला शंकराच्या सांगण्यावरून राम व लक्ष्मण यांनीं अभिवंदन केलें. रामास मांडीवर घेऊन व बाहूंनीं कवटाळून दशरथ म्हणाला, "सीता शुद्ध आहे, तिचा स्वीकार कर !" नंतर सीतेला "हे मुली !" अशी प्रेमानें हांक मारून दशरथ म्हणाला, "रामावर तूं रागावूं नकोस ! तुझ्या हितासाठीं त्यानें तुझी शुद्धि केली आहे !" यानंतर दशरथ व देवगण तेथून निघून गेले.

## २२. अयोध्येस प्रयाण

त्यादिवशीं रात्रीं विश्रांति घेऊन दुसऱ्या दिवशीं राम लक्ष्मणास म्हणाला, "भरताच्या भेटीसाठीं मला अयोध्येस सत्वर जाणें आहे ! तेव्हां आमच्या जाण्याची योग्य व्यवस्था कर !" यावर बिभीषणानें रत्नखचित सुवर्णमय पुष्पक-विमान आणविलें. राम जाण्यापूर्वी बिभीषणास म्हणाला, "सर्व वानरांस संपत्ति देऊन संतुष्ट कर ! त्यांच्यामुळेंच तुला लंका प्राप्त झाली आहे." बिभीषणानें तात्काल रामाच्या आज्ञेप्रमाणें केलें. नंतर सीता व लक्ष्मण यांच्यासह राम विमानांत आरूढ झाला. तो सुग्रीव व इतर वानरांस म्हणाला, "हे वानरश्रेष्ठहो, तुम्ही मित्रकार्य केलें आहे ! आतां तुम्ही आपल्या इच्छेस अनुसरून परत जा !" बिभीषणाकडे वळून तो म्हणाला, "तूं लंकेचें योग्य पालन कर ! इंद्रादि देवहि

तुझ्या वाटेस जाणार नाहींत ! " सुग्रीवासहि असें सांगून रामानें त्या उभयतांचा निरोप घेतला. तेव्हां बिभीषण, सुग्रीव व इतर वानर म्हणाले, " आम्हीहि अयोध्येस येऊं इच्छितों ! तुझा राज्याभिषेक पाहून आम्ही स्वगृहीं लौकरच परत येऊं ! " ही सूचना रामासहि अतिशय आवडली. तेव्हां वानरांसह सुग्रीव व अमात्यांसह बिभीषण विमानांत बसले. हंसांनीं युक्त असें तें देदीप्यमान् विमान आकाशांत उडालें.

विमान उडत असतां रामानें सीतेला विमानांतून दिसणारीं पृथ्वीवरील तीं तीं स्थानें दाखविलीं. प्रथम लंका नगरी लागली, ती रामानें तिला दाखविली. नंतर जेथें रावण व इतर राक्षस वीर यांना ठार करण्यांत आलें, ती युद्धभूमि त्यानें दाखविली. पुढें समुद्र, सेतु व हिरण्यनाभ पर्वत लागला, तोहि त्यानें तिला दाखविला. सुग्रीवाची किष्किंधा नगरी लागतांच सीतेच्या सांगण्याप्रमाणें तेथें विमान थांबवून तारा प्रभृति वानरस्त्रियांना अयोध्येस नेण्यासाठीं विमानांत बसविण्यांत आलें. यानंतर ऋष्यमूक पर्वत, पंपासरोवर, जनस्थान, गोदावरी नदी, चित्रकूट पर्वत, भरद्वाजांचा आश्रम, गंगानदी, शृंगवेरपुर व अयोध्या नगरी क्रमानें लागली. हीं सर्व स्थानें रामानें सीतेला दाखवून त्यांची माहिती निवेदन केली व जुन्या आठवणी सांगितल्या.

पंचमीच्या दिवशीं चौदा वर्षें पूर्ण झालीं असतां भरद्वाज ऋषींच्या आश्रमास थांबून रामानें त्यांना वंदन केलें आणि " भरत प्रजापालनांत तत्पर असून माता जीवंत आहेत ना ? " असा प्रश्न केला. तेव्हां मुनि म्हणाले, " तुझ्या पादुका पुढें ठेवून भरत तुझीच वाट पाहत आहे ! " पंचमीस रामानें भरद्वाजाश्रमांत मुक्काम केला.

## २३. नंदिग्रामांतील भरतभेट

अयोध्या दिसूं लागली असतां रामानें हनुमानाला पुढें जाऊन शृंगवेरपुरास गुहाला व नंदिग्रामास भरताला भेटून आपली वार्ता सांगण्याची आज्ञा केली. राम पुढें म्हणाला, " हे हनुमाना, माझ्या आगमनाचें वृत्त ऐकून भरताच्या मुखावर कोणते भाव दिसतात, ते नीट पाहून मला येऊन सांग ! भरताला राज्य करण्याची इच्छा असेल, तर पृथ्वीचा प्रतिपाळ तोच करील ! " मग

हनुमान् मनुष्यवेष धारण करून गुह व भरत यांस भेटला. जटावेषधारी भरत राम आल्याचें ऐकतांच अतिशय आनंदित झाला. तो म्हणाला, " लोकांत म्हण आहे कीं, ' मनुष्य जीवंत राहिल्यास शंभर वर्षांनीं तरी त्याला आनंदाचे दिवस प्राप्त होतात ! ' ही म्हण आज खरी झाली आहे ! " भरतानें विचारल्यावरून हनुमानानें राम वनवासाचा सर्व वृत्तांत त्यास निवेदन केला.

भरताच्या आज्ञेवरून सर्व अयोध्यावासी स्त्रीपुरुष नंदिग्रामास रामाला सामोरे आले. पुष्पक विमान तेथें उतरतांच राम व भरत यांची भेट होऊन रामानें भरतास अंकावर बसविलें आणि त्याला कडकडून आलिंगन दिलें. सर्वांच्या भेटीगांठी झाल्यानंतर भरत रामास म्हणाला, " ठेव म्हणून माझ्यापाशीं ठेवलेलें हें तुझें राज्य तूं परत घे ! हें ज्योतिश्चक्र भ्रमण करीत आहे, तोंवर तूं पृथ्वीचें राज्य कर ! " यावर " ठीक आहे ! " असें रामानें उत्तर दिलें. मग नापितांकडून जटा साफ करून रामानें मंगल स्नान केलें आणि उत्कृष्ट वस्त्रंभूषणें धारण केलीं. त्यावेळीं तो फारच शोभायमान् दिसूं लागला !

## २४. रामास राज्याभिषेक

यानंतर दिव्य रथावर आरूढ होऊन सर्व परिवारासह राम अयोध्येकडे जाण्यास निघाला. त्याच्या स्वागतार्थ सर्व नगर उत्तम रीतीनें शृंगारलें होतें. अयोध्येस पोंचल्यावर योग्य वेळीं राज्याभिषेकाचा मुहूर्त ठरला. समुद्र व नद्या यांचें पवित्र उदक वानरांनीं सुवर्णघटांत आणलें. राम व सीता यांना सर्वांनीं अभिषेक केला. मनु व त्याच्या वंशांतील राजे परंपरेनें राज्याभिषेकसमयीं जो रत्नखचित मुकुट वापरीत असत, तो वसिष्ठ ऋषींनीं रामाच्या मस्तकावर ठेवला. दिव्य सिंहासनावर आरूढ झालेल्या रामानें सर्वांस ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें अलंकारादि भेटी अर्पण केल्या. सीतेनें आपल्या कंठांतील बहुमोल हार अत्यंत प्रेमानें हनुमानास अर्पण केला. अशा प्रकारें राम--राज्याभिषेक यथाविधि पार पडला.

बिभीषण, सुग्रीव, हनुमान वगैरे लौकरच रामाचा निरोप घेऊन आपापल्या स्थानीं परत गेले. राम आनंदानें राज्य करीत असतां त्यानें लक्ष्मणाला

यौवराज्याचा अभिषेक करण्याची इच्छा प्रगट केली. परंतु लक्ष्मणानें नाकारल्यामुळें तो मान भरतास देण्यांत आला. रामानें पौंडरिक, अश्वमेध व विशेषतः वाजिमेध यज्ञ वारंवार करून दहा हजार वर्षेंपर्यंत राज्य केलें ! रामराज्यांत लोक रोग व शोक यांनीं रहित असून दीर्घायुषी होते ! पर्जन्य वेळेवर व विपुल पडत असून धनधान्याची समृद्धि होती ! प्रजा स्वकर्माचरणांत संतोष मानीत असून सद्गुणी व धर्मनिष्ठ होती ! वाल्मीकि मुनींनीं पूर्वी लिहून ठेवलेलें हें वेदतुल्य व यशोदायक आदिकाव्य पठण केल्यानें पापापासून मुक्तता होते !

– युद्ध कांड संपूर्ण –

# उत्तर कांड

●

## १. रामाशीं मुनिश्रेष्ठांची भेट

रावण–वध करून रामाला राज्य मिळाल्यावर थोर थोर मुनि त्याच्या भेटीस आले. पूर्व दिशेला असणारे कौशिक–प्रभृति ऋषि, दक्षिण दिशेला असणारे अगस्त्य–प्रभृति ऋषि, पश्चिम दिशेला असणारे नृषंगु–प्रभृति ऋषि आणि उत्तर दिशेला असणारे कश्यपप्रभृति ऋषि आपापल्या शिष्यांसह त्यांत होते. रामानें त्या सर्वांचें यथाविधि पूजन करून त्यांचें कुशल विचारलें. तेव्हां ते म्हणाले, " हे रघुनंदना, आमचें सर्व कुशल आहे. तूं रावण व इतर राक्षसवीर यांचा वध केला, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे ! पण त्यांतहि तूं रावण–पुत्र इंद्रजिताचा वध केला, याचा आम्हांस परम विस्मय वाटतो ! इंद्रजितास मारून तूं आम्हां ऋषींना अभय-दक्षिणा दिली आहे !" हें भाषण ऐकून आश्चर्यचकित झालेला राम म्हणाला, " हे भगवन्त, रावण व कुंभकर्ण सोडून आपण इंद्रजिताचीच कां बरें प्रशंसा करीत आहांत ? त्यांच्यापेक्षांहि हा अधिक वाटण्याचें कारण समजून घेण्याची माझी इच्छा आहे ! "

यावर अगस्त्य मुनि म्हणाले, " इंद्रजिताला एवढें तेज व बल प्राप्त होण्याचा वृत्तांत तुला मी सांगतों. त्यापूर्वी रावणाच्या कुलाची व खुद्द त्याची हकीकत ऐक : कृतयुगांत ब्रह्मदेवपुत्र पुलस्त्य नामक ब्रह्मर्षि होऊन गेले. त्यांना तृणबिंदु राजाच्या कन्येपासून विश्रवा नांवाचा मुलगा झाला. तो पित्यासारखाच तपस्वी होता. त्याचें उत्तम आचरण पाहून भरद्वाजऋषींनीं आपली देववर्णिनि नामक कन्या त्याला दिली. तिच्यापासून त्याला वैश्रवण नांवाचा मुलगा झाला. तोच यक्षराज कुबेर

होय. हा आपला नातु ' धनाध्यक्ष होईल ! ' असें भविष्य पुलस्त्यांनीं केलें. आहुति टाकलेल्या तेजस्वी अग्नीप्रमाणें वैश्रवण कुबेर वृद्धिंगत् झाला. त्यानें उग्र तपाचरण करून ब्रह्मदेवास प्रसन्न केलें व लोकरक्षण होण्यासाठीं लोकपाल होण्याचा वर मागितला. तेव्हां ब्रह्मदेव म्हणाले, ' यम, इंद्र व वरुण हे तीन लोकपाल सध्यां असून चौथा मी निर्माण करणार होतोंच. तेव्हां आतां तूंच चौथा लोकपाल हो ! ' मग कुबेर विश्रव्यास म्हणाला, ' प्रजापतीनें मला लोकपाल केलें, पण वसतिस्थान दिलें नाहीं ! तरी तें आपण मला पाहून सांगा. ' यावर विश्रवा म्हणाला, " दक्षिण समुद्राच्या तीरावर त्रिकूट पर्वत असून त्यावर विश्वकर्म्यानें निर्माण केलेली लंका नगरी आहे. तिच्याभोंवतीं सुवर्णाचा तट असून तिच्या वेशी वैडूर्यानें मढविल्या आहेत ! विष्णूच्या भीतीनें राक्षस ती नगरी सोडून रसातलास गेले आहेत ! तेव्हां तूं त्या नगरींत रहा. "

अगस्त्यांनीं इतकें सांगितल्यावर राम म्हणाला, " लंका पूर्वीपासून राक्षसांची आहे, हें ऐकून मला फार आश्चर्य वाटतें ! पुलस्त्य वंशापासून राक्षस उत्पन्न झाल्याचें आम्ही ऐकलें होतें, पण दुसरीकडूनहि त्यांची उत्पत्ति झाल्याचें आपण सांगतां ! हे दुसरे राक्षस रावण-वगैरेपेक्षांहि बलवान् होते काय, हें आपण सविस्तर मला सांगा. "

## २. रावणापूर्वींचे लंकेंतील राक्षस

नंतर अगस्त्य सांगूं लागले. " प्रथम उदक होतें. त्याच्या रक्षणासाठीं ब्रह्मदेवांनीं प्राणी उत्पन्न केले. त्यांना ब्रह्मदेवांनीं उदकाचें रक्षण करण्यास सांगितलें असतां त्यांच्यांतील कांहीं ' रक्षामः ' ( आम्ही रक्षण करूं ) व कांहीं ' यक्षामः ' ( आम्हीं यजन करूं ) म्हणाले. पहिले राक्षस व दुसरे यक्ष झाले. राक्षसांपैकीं हेति व प्रहेति हे दोन भाऊ त्यांचे अधिपति होते. ते मधु व कैटभ असुरांच्या तोडीचे होते ! धर्मनिष्ठ प्रहेति तप करण्यास गेला व हेति स्वतःच्या लग्नाचा प्रयत्न करूं लागला. कालाची बहीण भया हिच्याशीं त्यानें लग्न केलें. तिला विद्युत्केश नांवाचा मुलगा झाला. त्याचा विवाह संध्येची मुलगी सालकटंकटा हिच्याशीं झाला. तिनें आपला गर्भ प्रसूतीपूर्वींच टाकून दिला असतां शंकर-पत्नी पार्वती हिनें त्याचा सांभाळ केला. तोच सुकेश होय. सुकेशास वेदवती भार्येपासून कफ-वात-

पित्तांसारखे माल्यवान्, सुमालि व मालि हे तीन पुत्र झाले! त्यांनीं तपाचरणानें ब्रह्मदेवांकडून अजिंक्य होण्याचा वर मिळविला! त्या वरानें मत्त होऊन ते देवादिकांस पीडा करूं लागले! ते विश्वकर्म्यानें सुचविलेल्या लंका नगरींत येऊन राहूं लागले. या तीन राक्षसांचीं लग्नें होऊन त्यांच्या बायकांच्या पोटीं राक्षस व राक्षसी जन्मास आल्या. माल्यवानादिकांनीं केलेल्या पीडेमुळें देव व ऋषि शंकराकडे जाऊन त्यांचा बंदोबस्त करण्यास सांगूं लागले! परंतु त्यांचा पिता सुकेश याच्या प्रेमामुळें शंकरानें त्यांना विष्णूकडे पाठविलें. विष्णूनें देवऋषींना अभय दिलें. ही बातमी समजल्यावर हे तिघे राक्षस भ्राते देवांशीं युद्ध करण्यासाठीं देवलोकावरच चालून गेले! खुद्द विष्णूला त्यांनीं जर्जर केलें! अखेरीस विष्णूच्या चक्रानें मालीचें मस्तक तुटलें आणि सुमालि व माल्यवान् लंकेकडे पळाले! परंतु गरुडावर बसलेल्या विष्णूनें त्यांचा पाठलाग केला, तेव्हां ते राक्षस वीर पुनः युद्धास सज्ज झाले. विष्णूच्या गरुडानें आपल्या पंखांच्या वेगानें माल्यवानास उडवून लावलेलें पाहून सुमालि ससैन्य लंकेकडे वळला. नंतर सुमालि परिवारासह लंका सोडून रसातलास राहण्यास गेला! हे राघवा, हा सालकटंकटेचा वंश होय. तूं रावणादि ज्या राक्षसांचा वध केलास, तो पौलस्त्य वंश होय. हे पहिले राक्षस रावणादिकांपेक्षां निःसंशय बलवान् होते! ते पातालास गेल्यानंतरच कुबेर लंका नगरीचा स्वामी झाला. आतां रावणाचा वृत्तांत ऐक."

## ३. रावणादिकांचा पूर्वेतिहास

"एकदां सुमालि राक्षस आपल्या कैकसी कन्येसह पातालाहून पृथ्वीवर येऊन भ्रमण करीत असतां कुबेर-पिता विश्रवा सायंकाळचा होम करीत असतांना त्यानें पाहिला. हा आपल्या कन्येस उत्तम पति होईल, असें जाणून सुमालि कैकसीस म्हणाला, 'या श्रेष्ठ ऋषीस तूं पति कर.' यावर कैकसी विश्रव्यापुढें हात जोडून उभी राहिली. तिचा भाव जाणून विश्रवा म्हणाला, 'तूं संध्याकाळच्या दुष्ट समयीं आल्यानें तुला राक्षस-संतति होईल!' नंतर कैकसीस दशग्रीव रावण, कुंभकर्ण, शूर्पणखा व बिभीषण ही संतति झाली. आपला सावत्र मुलगा कुबेर याचें वैभव पाहून मत्सरग्रस्त झालेल्या कैकसीनें त्याच्या तोडीचें होण्यास रावणास सांगितलें. तेव्हां रावण आपल्या कुंभकर्ण व बिभीषण या भ्रात्यांसह कठोर तप करूं लागला.

❀

त्यानें अग्नींत आपलीं नऊ शिरें अर्पण केलीं व दहावें शिर अर्पण करणार, तोंच ब्रह्मदेव प्रगट झाले ! त्यांच्यापासून देव, राक्षस वगैरेपासून मरण न येण्याचा वर रावणानें मागून घेतला ! मानवांस तो कस्पटासमान मानीत असल्यानें त्यांचा त्या वरांत समावेश नव्हता ! रावणास त्याचीं नऊ शिरें पुनः प्राप्त झालीं. कुंभकर्णानें चुकून वर्षानुवर्षें निजून राहण्याचा वर मागितला, तो ब्रह्मदेवांनीं दिला ! बिभीषणास शिकविल्यावांचून ब्रह्मास्त्र येण्याचा व धर्माकडेच मति राहण्याचा त्यांनीं वर दिला. "

" रावणादि बंधूंना वरप्राप्ति झाल्याचें ऐकून त्यांचा मातामह सुमालि अमात्यांसह पातालांतून पृथ्वीवर आला. रावणाला आलिंगन देऊन तो म्हणाला, ' विष्णूच्या भयानें आम्हीं लंकानगरी सोडून रसातलास गेलों व तुझा भ्राता कुबेर यानें ती बळकावली! हे रावणा, तूं लंकेचा स्वामी हो व बुडालेला राक्षसवंश लंकेंत पुनः नांदूं दे ! ' पण मतलबी रावणानें प्रत्यक्ष मातामह सुमालीस म्हटलें, ' कुबेर राक्षस नसून यक्ष असला, तरी माझा वडील भाऊच आहे ! तेव्हां लंका त्याच्याचकडे असलेली बरी ! ' नंतर कांहीं दिवसांनीं रावणानें प्रहस्ताकरवीं कुबेरास निरोप पाठविला कीं, ' राक्षसांची लंका नगरी तूं बळकावलीस, ती आम्हांस परत दे ! ' कुबेरानें त्या सर्वांचा पिता विश्रवा याचा सल्ला विचारला असतां तो म्हणाला, ' तूं व रावण दोघेहि माझे पुत्रच आहांत ! रावणासारख्या राक्षसाशीं तुला वैर करणें चांगलें नाहीं ! तेव्हां तूं लंका सोडून जा व कैलासपर्वतावर आपली नवीन नगरी निर्माण कर. ' कुबेरानें बापाच्या आज्ञेप्रमाणें केलें आणि रावण लंकेचा स्वामी झाला. तेथें त्याला राक्षसांनीं राज्याभिषेक केला. "

## ४. इंद्रजिताचा जन्म

अगस्त्यमुनि पुढें सांगूं लागले, " यानंतर रावणानें आपली बहीण शूर्पणखा हिचा विवाह कालकांचा स्वामी विद्युज्जिव्ह याच्याशीं करून दिला. नंतर तो मृगया करीत असतां दितीचा पुत्र मय याच्याशीं त्याची वनांत भेट झाली. मयाबरोबर त्याची लावण्यवती कन्या मंदोदरी होती. रावणानें ' तूं कोण ? ' म्हणून विचारलें असतां मयानें त्याला आपला वृत्तांत सांगितला व तो म्हणाला, ' हेमा नामक अप्सरेपासून मला झालेली ही मंदोदरी कन्या होय. हिला वर पाहण्यासाठीं

मी फिरत आहें.' नंतर मयानें रावणाला त्याची हकीकत विचारली. ती ऐकून हा मुनिपुत्र आहे, असें जाणून मयानें रावणास मंदोदरीचा पत्नीभावानें स्वीकार करण्याची विनंति केली. ती रावणानें मान्य केल्यावर अग्नीसमक्ष त्यानें मंदोदरीचें पाणिग्रहण केलें. मयानें आपल्या जामातास कन्येबरोबरच एक अद्भुत व अमोघ शक्ति अर्पण केली, तीच रावणानें लक्ष्मणावर फेंकली होती. रावणाच्या लग्नानंतर कुंभकर्ण व बिभीषण यांचेहि विवाह झाले. कुंभकर्णानें विरोचनाच्या मुलाची नात वज्रमाला हिचें व बिभीषणानें गंधर्वराज शैलूषाची कन्या सरमा हिचें पाणिग्रहण केलें. यथाकाल रावणाला मंदोदरीच्या उदरीं मेघनाद नांवाचा पुत्र झाला. हाच इंद्रजित् होय. मेघनादानें जन्मतांच मेघगर्जनेप्रमाणें रडण्याचा आवाज केला होता, म्हणून त्याचें 'मेघनाद' हें नांव ठेवण्यांत आलें.''

## ५. रावणास पुष्पक विमानाची प्राप्ति

अगस्त्यांचें निवेदन सुरू झालें, '' पुढें कांहीं दिवसांनंतर ब्रह्मदेवांनीं पाठविलेली घोर निद्रा कुंभकर्णाजवळ आली. तेव्हां त्याला निद्रेंत त्रास न व्हावा, यासाठीं रावणानें एक सुंदर व वैभवसंपन्न स्थान तयार करून दिलें. तिथें तो कुंभकर्ण हजारों वर्षें घोरत पडला ! इकडे रावण उच्छृंखल होऊन देव, गंधर्व व ऋषि यांस पीडा करूं लागला ! त्यानें देवांच्या प्रत्यक्ष नंदनवनाचाच फडशा पाडला ! हें सर्व वृत्त कुबेराच्या कानांवर गेल्यावर त्यानें बंधु या नात्यानें दूताबरोबर रावणास निरोप पाठविला कीं, 'देव व ऋषि यांच्याशीं वैर करण्याचें तूं सोडून दे ! नाहींतर, देवांकडून तुझा निश्चित नाश होईल !' हें एकून रावण क्रोधानें लाल झाला व 'त्रैलोक्यच जिंकतों' असें म्हणून प्रथम खुद्द कुबेरावर ससैन्य चाल करून गेला ! कैलासपर्वतावरील कुबेरनगरीजवळ येऊन पोंचल्यावर कुबेराचे यक्ष व रावणाचे राक्षस यांचें तुमुल युद्ध झालें. खुद्द कुबेर रावणावर तुटून पडला. पण रावणानें आपली प्रचंड गदा कुबेरावर फेंकतांच कुबेर रक्तबंबाळ होऊन अशोक वृक्षाप्रमाणें खालीं पडला ! तेव्हां पद्म वगैरे निधींनीं त्याला तेथून नंदनवनांत नेऊन सावध केलें ! अशा रीतीनें कुबेराचा पराभव करून रावणानें त्याचें पुष्पक विमान बळकावलें ! या विमानास सोन्याचे खांब असून वैडूर्य जडविलेले दरवाजे होते. त्याची मनासारखी तीव्र गति असून तें वाटेल तें रूप घेऊं शकत होतें व वाटेल तेथें जाण्यास

समर्थ होतें ! सर्व ऋतूंत सारखेंच सुखदायक होतें. या विजयानें रावणास त्रैलोक्य जिंकल्यासारखें वाटूं लागलें ! ''

## ६. रावणाकडून सर्वांस पीडा !

अगस्त्य म्हणाले, '' नंतर रावण पुष्पक विमानांत बसून कार्तिकस्वामीचें जन्मस्थान जें ' शरवण ' वन तेथें गेला. त्या बाजूच्या एका पर्वताजवळ त्याचें विमान अडलें. कारण तेथें जवळच शंकर क्रीडा करीत होता. त्याठिकाणीं शंकराचा नंदी रावणास आड आला असतां रावणानें हात घालून तो पर्वतच उचलला ! पर्वत डळमळावयास लागलेला पाहून शंकर संतप्त झाला व त्यानें पायाच्या बोटानें पर्वत दाबतांच त्याखालीं रावणाचे हात चेंगरले ! अशाहि स्थितींत आपल्या अमात्याच्या सांगण्यावरून रावण शंकराची स्तुति करूं लागला ! अशीं हजारों वर्षे उलटलीं ! अखेर शंकर प्रसन्न होऊन त्यानें रावणास त्याच्या इच्छेप्रमाणें गेलेलें आयुष्य पुनः देऊन चंद्रहास नामक खड्गहि दिलें. ''

'' इतकें झाल्यावर रावण हिमालयावर फिरत असतां वेदवती नांवाची रूपसुंदर तपस्विनी त्यानें पाहिली. तिला मोहित होऊन तिचे केस त्यानें धरलें असतां त्या पापी स्पर्शाच्या निरसनार्थ तिनें चितेंत उडी घेतली ! ही वेदवतीच पुढें जनकाची मुलगी सीता झाली ! ''

'' यानंतर रावण ' युद्ध दे, नाहींतर, हरलों म्हण ! ' असें एकेका राजास म्हणत पृथ्वी जिंकत चालला ! रामाचा पूर्वज अयोध्येचा राजा अनरण्य याला त्यानें असेंच म्हणून रणांत ठार केलें ! तेव्हां त्यानें त्याला असा शाप दिला कीं, ' इक्ष्वाकु कुळाच्या या अपमानाचें उट्टें काढण्यासाठीं राम माझ्या वंशांत जन्म घेईल ! ' नंतर नारदमुनींच्या चिथावणीवरून यमाला जिंकून रावण पाताळलोकांत मणिमयी नगरीस गेला असतां तेथील वरदान प्राप्त झालेल्या निवातकवच नामक दैत्यांना त्यानें ' युद्ध द्या, नाहींतर, हरलों म्हणा ! ' अशी हांक दिली. तेव्हां निवातकवच दैत्य व रावण यांचें दीर्घकाल युद्ध झालें. कोणीच कोणास जिंकी ना ! यामुळें ब्रह्मदेवांच्या सांगण्यावरून रावणानें त्यांच्याशीं अग्नीसमक्ष सख्य केलें. पाताळांत वरुणाची नगरी शोधत असतां कालकेय दैत्यांच्या अश्म नगरीस रावण आला. तेथें त्यानें कालकेयांचा संहार केला आणि त्या संग्रामांत आपल्या राक्षसांस

खात सुटलेला शूर्पणखेचा नवरा विद्युज्जिव्ह याला त्यानें तरवारीनें खंडित केलें !

"याप्रमाणें दिग्विजय करून रावण लंकेकडे परतला. जातांना देव, दानव, ऋषि, नाग, राक्षस वगैरेंच्या ज्या ज्या सुंदर बायका व मुली रावणास आढळल्या, त्या त्या सर्व त्यानें बलात्कारानें विमानांत कोंबल्या आणि त्यांना तो लंकेकडे घेऊन निघाला ! दुःखाश्रु गाळणाऱ्या त्या स्त्रियांनीं 'परस्त्रियांचा अपहार करणाऱ्या रावणाच्या मरणास परस्त्रीच कारणीभूत होईल !' असा त्याला शाप दिला ! लंकेंत गेल्यावर आपल्या नवऱ्याला मारल्याबद्दल शूर्पणखा रावणाजवळ शोक करूं लागली व त्याला कठोर शब्द बोलली. रावणानें तिचें कसेंबसें समाधान करून म्हटलें, 'वत्से, तुझा व माझा मावसभाऊ खर राक्षस याला मी दंडकारण्याच्या रक्षणासाठीं पाठवतों. तो चौदा हजार राक्षसांचा स्वामी होईल. तूं खरापाशीं रहा व तो तुझ्या आज्ञेंत राहील.' नंतर खर शूर्पणखेसह दंडकारण्यास निघून गेला."

"याप्रमाणें शूर्पणखेचें समाधान करून रावण लंकेजवळच्या निकुंभिला नामक उपवनांत शिरला. तेथें शेंकडों यूप व देवालयें उभारलीं असून यज्ञ सुरूं होता. रावणपुत्र इंद्रजित् कृष्णाजिन धारण करून दंडकमंडलु घेऊन बसला होता. त्याला आलिंगन देऊन रावण म्हणाला, 'हे वत्सा, तूं हें काय आरंभिलें आहेस ?' तेव्हां द्विजश्रेष्ठ उशना ( शुक्राचार्य ) म्हणाला, 'हे राजा, तुझ्या पुत्रानें सात यज्ञ केले असून मनुष्याच्या हातून घडण्यास अत्यंत कठीण असा माहेश्वर यज्ञ सुरूं केला असतां प्रत्यक्ष शंकर प्रगट झाला. त्यानें तुझ्या पुत्राला इच्छेप्रमाणें जाणारा दिव्यरथ व अंधकार उत्पन्न करणारी 'तामसी' माया अर्पण केली आहे ! या मायेचा प्रयोग युद्धांत केल्यास देवांनाहि आपली गति कळत नाहीं ! तसेंच, अक्षय्य भाते व अमोघ अस्त्र यांचीहि प्राप्ति तुझ्या पुत्रास झाली आहे ! तो आज यज्ञ संपवून तुझीच वाट पाहत आहे !' हें ऐकून रावण म्हणाला, 'आपले शत्रु जे इंद्रादि देव, त्यांचें या यज्ञांच्या रूपानें तुम्हीं पूजन केलें, हें ठीक केलें नाहीं ! बरें असो, झालें तें झालें. आतां स्वगृहीं जाऊं.'"

"मग लंकेस गेल्यावर रावणानें विमानांत आणलेल्या देवादिकांच्या स्त्रिया बाहेर उतरविल्या, त्यांना पाहून धर्मात्म्या बिभीषणानें रावणाची परदाराभिलाषेबद्दल यथेच्छ कान उघाडणी केली, आणि आपली कुंभीनसी नामक चुलत संबंधाची मानस

बहीण मधुदैत्यानें पळवून नेली, ही बातमी त्यास निवेदन करून 'तुझ्या परदाराहरण-रूप पापकर्माचेंच हें फल आहे!' असा त्यास टोमणा मारला! रावण लंकेंत नसतांना मधुपुराचा मधुदैत्य यानें तेथें असलेली माल्यवान् राक्षसाच्या अनला नांवाच्या मुलीची मुलगी कुंभीनसी ही हरण करून नेली! अनला ही रावणाची माता कैकसी हिची चुलत बहीण म्हणून कुंभीनसी ही रावणाची चुलतसंबंधाची मानस बहीण होती. हा प्रकार ऐकून रावण क्रुद्ध होऊन मधुपुराकडे मधुदैत्यावर चालून गेला. परंतु कुंभीनसीनें मध्यस्थी केल्यावरून त्यानें मधुदैत्यास क्षमा केली! मधुपुरीहून रावण कैलासास जाऊन तेथें त्यानें मुक्काम केला. रात्रीं चंद्र उदय पावला असतां कुबेराचा पुत्र नलकूबर याच्याकडे रंभा नांवाची श्रेष्ठ अप्सरा वस्त्रालंकारांनीं मंडित होऊन चाललेली त्यानें पाहिली. तिला पाहून मोहित झालेल्या रावणानें तिला वश होण्याची विनंति केली असतां ती म्हणाली, 'मी तुमची नात्यानें सून होत असतां तुम्ही असें विपरीत भाषण कसें करतां?' रंभेनें असें निवारण केलें असतांहि रावणानें तिजवर बलात्कार केला! हें वर्तमान पुढें रंभेकडून नलकूबरास कळल्यावर त्यानें रावणास शाप दिला कीं, 'इतःपर तूं कोणा परस्त्रीवर असा बलात्कार केल्यास तुझ्या मस्तकाचे सात तुकडे होतील!"

## ७. इंद्रजिताचा पराक्रम

अगस्त्य पुढें सांगूं लागले, "कैलासावरून रावण सैन्यासह इंद्रलोकास गेला इंद्रानें घाबरून विष्णूकडे धांव घेतली. तेव्हां विष्णु म्हणाला, 'रावण देवांना अवध्य असून मी त्याच्याशीं युद्ध करूं शकत नाहीं! पुढें योग्य वेळ आली, म्हणजे मात्र मी त्याला अवश्य ठार करून देवांना हर्षवीन!' इंद्रादि देवांनीं विष्णूच्या साहाय्या-शिवायच रावणाशीं सामना देण्याचें ठरविलें. रावणाच्या मदतीस त्याचा मातामह सुमालि पाताळलोकाहून आला. देवदानवांचें तुंबळ युद्ध सुरू झालें. राक्षसांपुढें देव-सैन्य टिकाव न धरून पळूं लागलेलें पाहून सावित्र नामक विख्यात आठवा वसु राक्षससैन्यावर तुटून पडला. त्यानें त्याची दाणादाण उडवून गदाप्रहारानें सुमालीच्या देहाचा चेंदामेंदा केला! तेव्हां राक्षससैन्य गलितधैर्य होऊन पळूं लागलें!"

"हा प्रकार पाहून इंद्रजित् त्वेषानें पुढें सरसावला आणि त्यानें राक्षस सैन्य परत फिरविलें. आपल्या मनोवेगानें जाणाऱ्या रथांत बसून इंद्रजित् देव सैन्यावर

तुटून पडला. तेव्हां देवसैन्यांत एकच गोंधळ उडाला! इंद्राचा मुलगा जयंत इंद्रजितावर चालून आला असतां इंद्रजितानें जयंतास बाणांनीं जखमी केलें. तेव्हां त्याचा आजा व शचीचा बाप पुलोमा त्याला घेऊन सागरांत शिरला! मुलगा नाहींसा झालेला पाहून इंद्र रथावर आरूढ झाला व राक्षसावर तुटून पडला. तेव्हां रावण इंद्राच्यासमोर आला. रावण देवांना अवध्य, म्हणून त्याला जीवंत पकडण्याचें ठरवून इंद्र व इतर देव यांनीं त्याला घेरून टाकलें. तेव्हां इंद्रजितानें खवळून जाऊन आपली 'तामसी' माया निर्माण केली व अदृश्य होऊन त्यानें देवसैन्याची दाणादाण केली! इंद्रजितानें मायेनेंच खुद्द इंद्राला बांधलें व तो त्याला आपल्या सैन्याकडे घेऊन गेला! इंद्रच बंदिवान् झाल्याचें पाहून देवसैन्य युद्ध बंद करून निघून गेलें!! तेव्हां इंद्रजित् इंद्राला घेऊन लंकेस निघून गेला."

"पुढें ब्रह्मदेव लंकेस येऊन रावणास म्हणाले, 'हे रावणा, इंद्रास बंदिवान केल्यामुळें तुझा मुलगा मेघनाद 'इंद्रजित्' म्हणून प्रसिद्ध होईल! त्याचा पराक्रम पाहून मीं संतुष्ट झालों आहें! आतां तूं इंद्राला सोडून दे आणि त्याच्या मोबदल्यांत तुला काय द्यावें, हें सांग.' यावर इंद्रजित् म्हणाला, 'मला अमरत्व मिळणार नसल्यास मी मंत्रांनीं अग्नींत हवन केलें असतां त्यांतून अग्नीचा अश्वयुक्त रथ निघावा व मी त्या रथांत बसलों असतां संग्रामांत अमर असावें, हा वर मला द्यावा! अग्नीचा जप व होम पूर्ण न होतां मीं संग्राम केल्यास मग मला मृत्यु आल्यास चालेल!' यावर ब्रह्मदेव 'तथास्तु' म्हणाले व इंद्रजितानें इंद्राची लगेच सुटका केली! यावेळीं इंद्राचें देवतेज नष्ट झालें होतें! तेव्हां ब्रह्मदेव त्याला म्हणाले, 'हे देवराज, गौतमऋषींची पत्नी अहल्या हिच्याशीं तूं जें जारकर्म केलें होतें, त्या पापानें तुला ही दुर्गति प्राप्त झाली! आतां तूं 'वैष्णव यज्ञ' कर, म्हणजे तूं पुनः इंद्रपद भोगूं लागशील!' इंद्रानें त्याप्रमाणें केलें व तो पुनः स्वर्गांत राज्य करूं लागला."

इतकें सांगितल्यावर अगस्त्यमुनि रामास म्हणाले, "हे राघवा, इंद्रजित् बलशाली होऊन देवराजासहि कसा जिंकूं शकला, हें मी तुला कथन केलें आहे. म्हणूनच अशा त्या महाबलाढ्य इंद्रजितास लक्ष्मणानें मारलें, याचें आम्हांस आश्चर्य वाटतें!"

## ८. रावणाची सहस्रार्जुन व वाली यांजकडून विटंबना !

नंतर राम अगस्त्यांना म्हणाला, " हे भगवन्, रावण पृथ्वीवर हिंडत असतांना पृथ्वीवरील सारेच राजे हतवीर्य झाले होते कीं काय ? " तेव्हां अगस्त्य ऋषि हंसत हंसत म्हणाले, " हे रामा, राजांना पीडा करीत रावण पृथ्वीवर संचार करीत असतां माहिष्मति नगरीस आला. तेथें सहस्रार्जुन राज्य करीत होता. रावण आला त्या दिवशीं सहस्रार्जुन आपल्या स्त्रियांसह नर्मदेंत जलक्रीडा करीत होता. हें समजल्यावर रावण विंध्य पर्वताची शोभा पाहत पाहत नर्मदेकडे गेला. रावणानें नदींत स्नान करून वाळवंटावर शंकराच्या सुवर्णलिंगाची पूजा केली व तो त्या लिंगापुढें हात लांब करून गाऊं-नाचूं लागला. इकडे नर्मदेंत जलक्रीडा करणाऱ्या सहस्रार्जुनानें आपल्या हजार बाहूंनीं नदीचें उदक अडविलें, तेव्हां तिचा प्रवाह उलटा वाहावयास लागून रावणाची सर्व पूजा वाहून गेली ! हा उद्योग सहस्रार्जुनाचाच, असें कळल्यावर रावण त्याच्यावर धांवून गेला. दोघांचें भयंकर द्वंद्वयुद्ध झालें. सहस्रार्जुनानें रावणास आपल्या हजार बाहूंनीं बांधून माहिष्मति नगरीस नेलें ! तेव्हां नगरवासी जनांनीं आपल्या राजावर फुलें उधळलीं. रावणाची ही दुर्दशा ऐकल्यावर त्याचे पितामह पुलस्त्य ब्रह्मर्षि सहस्रार्जुनाकडे आले. त्यांनीं विनंति केल्यावरून सहस्रार्जुनानें रावणास सोडून दिलें. "

इतकें सांगून अगस्त्य पुढें म्हणाले, " हे रघुनंदना, रावणाची खोड जिरविणारा त्याला आणखी एक वीर भेटला. तो किष्किंधेचा वानरराज वाली हा होय. कोणीहि मनुष्य व राक्षस आपल्याहून बलाढ्य आहे, असें ऐकतांच रावण त्याच्याकडे जाऊन त्याला युद्धाची हांक देई ! एकदां किष्किंधेस जाऊन त्यानें वालीला युद्धास पाचारण केलें. तेव्हां वालीचा सासरा व प्रधान तार वानर रावणास म्हणाला, ' वाली चारी समुद्रावर संध्या करण्यास गेला आहे. तुला घाई असेल, तर तूं दक्षिणसमुद्रावर जा ! ' तेव्हां रावण पुष्पक विमानांत बसून दक्षिणसमुद्राकडे गेला. तेथें संध्या करीत असलेला वाली दृष्टीस पडल्यावर त्याला पाठीमागून धरण्यासाठीं रावण पाऊल न वाजवितां त्याच्याकडे गेला. वालीच्या हें लक्ष्यांत येतांच त्यानें हाताच्या टप्प्यांत आल्याबरोबर रावणास पाठ न फिरवितां धरलें व तो आकाशांत उडाला ! रावणास तसाच बगलेंत धरून वाली दक्षिणसमुद्राकडून पश्चिमसमुद्रास

आणि तेथून उत्तर व पूर्व समुद्रास गेला. त्या चारी ठिकाणीं यथाविधि संध्योपासना केल्यानंतर तो रावणास घेऊन किष्किंधेस आला. हतबल झालेला रावण त्याला म्हणाला, ' हे कपिश्रेष्ठा, एकाद्या पशूप्रमाणें तूं मला चारी समुद्रांवर फिरविलेंस ! तेव्हां तुझ्या सामर्थ्याची कमाल आहे ! मी अग्नीसमक्ष तुझ्याशीं सख्य जोडूं इच्छितों ! ' यावर अग्नि पेटवून त्याच्या समक्ष वाली व रावण यांनीं एकमेकांस आलिंगन दिलें आणि त्यांचें सख्य झालें. ”

अगस्त्यमुनींचें हें भाषण ऐकल्यावर राम त्यांना हात जोडून म्हणाला, “ वाली व रावण यांचें सामर्थ्य अनुपम तर खरेंच; पण हनुमानाशीं त्यांची तुलना होऊं शकणार नाहीं, असें मला वाटतें ! असा हा हनुमान् सुग्रीवाचा मित्र असतां व सुग्रीवाला वालीनें अतिशय छळलें असतां हनुमानानें वालीचा वध कां केला नाहीं, हें कळत नाहीं ! तरी हे मुनिश्रेष्ठा, त्या संबंधीं खुलासा करावा. ”

## ९. हनुमानाचा पूर्ववृत्तांत

यावर अगस्त्यमुनि हनुमान् व इतर मंडळी तेथें उपस्थित असतांनाच म्हणाले, “ हनुमान् अतुल पराक्रमी आहे, यांत शंका नाहीं ! पण एका शापामुळें त्याला आपल्या बलाची जाणीव राहिली नाहीं ! तो प्रकार मी तुम्हां सर्वांस सांगतों. हनुमानाचा पिता केसरी व माता अंजना. अंजनेस वायूपासून हनुमान् झाला. जास्वंदीच्या फुलाच्या ढिगाप्रमाणें दिसणाऱ्या बालसूर्यास पाहून हें फळच आहे कीं काय, असें लहानग्या हनुमानास वाटलें व तो सूर्यास धरण्यासाठीं उडाला ! त्याचवेळीं राहूहि सूर्यास धरावयास आला होता. हनुमानास पाहून घाबरलेला सिंहिका पुत्र राहू इंद्राकडे गेला व म्हणाला, ' सूर्य चंद्र माझ्या क्षुधेसाठीं दिले असतां तूं तें आणखी कोणास दिले काय ? ' हें ऐकून इंद्र ऐरावतावर बसून सूर्याकडे जाण्यास निघाला. याचवेळीं राहू हनुमानास दिसून येतांच हेंहि एखादें फळ आहे कीं काय, असें समजून हनुमान् राहूवर धांवून गेला ! सूर्याकडे येणाऱ्या इंद्राचा ऐरावतहि त्याला फळच वाटला, म्हणून तो ऐरावताकडेहि धांवला ! हें अरिष्ट पाहून इंद्रानें हनुमानावर वज्रप्रहार केला, त्यानें तो पर्वतावर पडून त्याची हनुवटी मोडली ! या प्रकारानें वायु फार रागावला व तो वाहण्याचें बंद होऊन देवांसुद्धां सर्वांचा कोंडमारा झाला ! तेव्हां ब्रह्मदेवांनीं मध्यस्थी करून वायूस वाहण्यास लावलें ! नंतर

ब्रह्मदेवांच्या सांगण्यावरून मोठमोठ्या देवांनीं हनुमानास उत्तमोत्तम वर दिले. विश्वकर्म्यानें त्याला चिरंजीव होण्याचा वर दिला ! या वरांच्यामुळें हनुमानास गर्व चढून तो ऋषींच्या खोड्या करूं लागला ! तेव्हां भृगु व अंगिरस या वंशांतील ऋषींनीं त्याला शाप दिला कीं, ' तुला मोह पडून आपल्या बलाचें दीर्घकाल स्मरण होणार नाहीं ! ' या शापामुळेंच आपला परम मित्र सुग्रीव संकटांत असतांहि हनुमानानें वालीचें निवारण केलें नाहीं ! "

अगस्त्यांच्या या भाषणानंतर रामानें हात जोडून त्यांचे आभार मानले आणि आपण यज्ञ करूं त्यावेळीं येण्याची त्यांस प्रार्थना केली.

## १०. रामराज्य सुरूं झाल्यावर

रामाला विधिपूर्वक राज्याभिषेक झाल्यानंतर जी पहिली रात्र उजाडली, ती अयोध्येंतील लोकांचा आनंद वाढविणारी अशी होती ! ती पहिली रात्र उजाडल्यावर पहांटे राजा रामाला झोंपेंतून उठविण्यासाठीं भाट स्तुति करूं लागले. तिच्यामुळें राम जागा झाला. स्नान करून त्यानें होम केला व आपल्या कुळाच्या देवगृहांत जाऊन यथाविधि पूजन केलें. बाहेर चौकांत आल्यावर रामाचे तीन बंधु, वसिष्ठ वगैरे ऋषि व सुग्रीव, बिभीषण इत्यादि मित्र त्याच्याजवळ बसले. त्या ठिकाणीं धर्मास अनुसरून पुराण, कथा वगैरे गोष्टी चालत असत.

अशाप्रकारें कांहीं दिवस गेल्यानंतर राम आपला श्वशुर मिथिलेश जनक यास हात जोडून म्हणाला, " हे राजा, आपल्याच तेजानें मीं रावणास मारलें आणि आपणच आमचें आश्रयस्थान आहांत ! तेव्हां आपण हीं रत्नें घेऊन आतां मिथिलेस परत जावें. आपल्याबरोबर भरत येईल. " यावर जनक म्हणाला, " तुझ्या नीतीनें मी संतुष्ट झालों आहें ! तूं देणार असलेलीं रत्नें मी आपल्या मुलींना देतों ! " याचप्रमाणें रामानें आपला मातुल युधाजित, काशीचा राजा प्रतर्दन वगैरे राजकुलांतील श्रेष्ठ पाहुण्यांना नजराणे देऊन निरोप दिला. ते सर्व आपापल्या देशांस निघून गेले. याशिवाय सुग्रीव, हनुमान व बिभीषण यांना रामानें उत्कृष्ट अलंकार भेट म्हणून दिले आणि त्यांना प्रेमानें आलिंगन देऊन त्यांचीहि रवानगी केली.

नंतर कांहीं दिवसांनीं दुपारच्या वेळीं राम भ्रात्यांशीं वार्तालाप करीत असतां अंतरिक्षांतून मधुर वाणी ऐकूं आली. " हे रामा, कुबेराकडून आलेलें मी पुष्पक

विमान आहें. तुझ्या आज्ञेनें मी कुबेराकडे गेलों होतों. परंतु त्यानें सांगितल्यावरून मी तुझ्या सेवेसाठीं पुनः आलों आहें. " हें ऐकल्यावर रामानें लाह्या, पुष्पें व धूप यांनीं त्या विमानाची पूजा केली आणि तो म्हणाला, " आतां तूं जा आणि मी स्मरण करीन, तेव्हां ये. " यावर तें पुष्पक विमान गुप्त झालें. विमान गेल्यावर भरत हात जोडून रामास म्हणाला, " हे वीरा, तूं राज्य करूं लागल्यापासून मनुष्येतर प्राण्यांना मनुष्यवाणी प्राप्त झाल्याचें वारंवार दिसत आहे ! मानवांचें आरोग्य उत्कृष्ट असून वृद्धांनाहि मृत्यु येत नाहीं ! पर्जन्य वेळेवर अमृततुल्य वृष्टि करतो व सुखस्पर्श वायु वाहतो ! ' असाच राजा आम्हांस नेहमीं मिळो ! ' असें लोक बोलत आहेत ! " हें ऐकून रामास फार संतोष वाटला.

## ११. सीता-त्याग

धर्मवेत्ता राम दुपारपावेतों धर्मकार्यें यथाविधि आटोपून उरलेला दिवस अंतःपुरांत घालवीत असे. सीताहि सकाळचीं देवकार्यें आटोपून सासवांची समान पूजा केल्यानंतर रामाकडे जात असे. एकदां राम सीतेस म्हणाला, " हे वैदेही, तुझ्या अपत्यप्राप्तीचा समय जवळ आला आहे ! तेव्हां तुझा कोणता मनोरथ मी पुरवूं ? " यावर सीता हंसून म्हणाली, " हे राघवा, पवित्र तपोवनें पाहत गंगातीरीं राहणाऱ्या ऋषींच्या चरणांपाशीं कंदमुळें भक्षण करीत राहण्याची मला इच्छा आहे ! एक रात्र तरी असें वास्तव्य करावें, असें वाटतें ! " तेव्हां रामानें " ठीक आहे, तूं उद्यां खचित जाशील ! " असें म्हटलें.

नंतर राम मधल्या चौकांत सुहृदांमध्यें बसला असतां त्यानें भद्रास विचारलें, " नगरांत लोक आमच्याबद्दल काय विशेष बोलतात, तें सांग. " भद्र म्हणाला, " लोक आपली स्तुतीच करतात ! " यावर राम म्हणाला, " लोक जें वाईट बोलत असतील, तेंहि मला सांग ! म्हणजे, वाईटाचा मला त्याग करतां येईल ! " तेव्हां भद्र हात जोडून सावधपणानें म्हणाला, " हे राजा, लोक तुझ्यासंबंधीं बोलतात, तें असें : ' रावणानें सीतेला बलात्कारानें नेऊन अशोकवनांत पुष्कळ दिवस ठेवलें असतां तिचा रामानें स्वीकार कसा केला ? आतां स्त्रियांच्या बाबतींत असा प्रकार आम्हांलाहि सहन करावा लागेल ! ' हे राजा, चव्हाठे, बाजार, रस्ते आणि वन, उपवनें या ठिकाणीं लोक असें बोलतात ! ' हें ऐकून रामाला अतोनात दुःख झालें !

आपल्या जिव्हाळ्याच्या लोकांना " लोक असेच बोलतात काय ? " असें त्यानें विचारलें, तेव्हां तेहि " होय, भद्र सांगतो, तें खरें आहे ! " असें कष्टानें म्हणाले ! नंतर रामानें सर्वांस रजा दिली.

मनाचा निश्चय झाल्यानंतर रामानें लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांना बोलावून आणलें. संध्याकाळच्या प्रभाविहीन सूर्यासारखे रामाचें खिन्नमुख पाहून लक्ष्मणादिकांना दुःख झालें व ते नमस्कार करून उभे राहिले. अश्रु गाळीत व भ्रात्यांना आलिंगन देऊन राम त्यांना म्हणाला, " सीतेविषयींचा लोकापवाद माझ्या मर्माचा भेद करीत आहे ! हे लक्ष्मणा, सीतेसंबंधींचा सर्व खरा प्रकार तुला विदितच आहे ! सर्वांसमक्ष तिची शुद्धि करूनहि अपवाद यावयाचा तो आलाच ! तेव्हां, लक्ष्मणा, तूं उद्यां प्रातःकालीं सीतेला रथांत बसवून गंगेपलीकडे तमसा तीरावर वाल्मीकिमुनींच्या आश्रमाजवळ सोडून दे व परत ये ! माझें मन वळवण्याचा तुम्ही कोणी प्रयत्न करूं नका ! " असें म्हणून डोळे भरून येऊन राम भ्रात्यांसह अंतःपुरांत निघून गेला.

रात्र उजाडल्यावर लक्ष्मणानें सुमंत्र सारथ्यास रथ जोडून आणण्यास सांगितलें. तो येतांच लक्ष्मण सीतेस म्हणाला, " तुझ्या इच्छेप्रमाणें ऋषींच्या आश्रमाकडे तुला नेण्यास राजाज्ञेनें मी आलों आहें ! " सीतेनें " ठीक आहे ! " असें हर्षानें म्हटलें व ती लक्ष्मणासह रथांत बसली. जातांना सीतेला अपशकुन व्हावयास लागले ! त्या रात्रीं गोमती तटावर एका आश्रमांत वास्तव्य करून दुसऱ्या दिवशीं लक्ष्मण सीतेसह रथांतून पुढें निघाला. दुपारच्या वेळीं गंगातीरावर येऊन पोंचतांच लक्ष्मण उच्च स्वरानें रडूं लागला ! तें पाहून सीता दुःखित होऊन म्हणाली, " हे लक्ष्मणा, तूं रडत आहेस, हें काय आहे ? रामाच्या वियोगाचें तर तुला दुःख होत नाहीं ना ? " तिचें हें भाषण ऐकून लक्ष्मणानें डोळे पुसले व नावाड्यांना हांक मारली. नांव तयार होतांच लक्ष्मण सीतेसह गंगापार झाला. गंगेच्या पैलतीरीं गेल्यावर डोळ्यांत अश्रु आणून व हात जोडून लक्ष्मण सीतेला म्हणाला, " हे वैदेही, तुझ्यासंबंधींच्या लोकापवादामुळें रामानें चित्तक्षुब्ध होऊन तुझा त्याग केला आहे ! रामाच्या आज्ञेप्रमाणें मी तुला वाल्मीकींच्या आश्रमापाशीं सोडून देत आहें ! हे कल्याणि, माझ्यावर कृपा कर, मला दोष देऊं नकोस ! " लक्ष्मणाचें हें भयंकर भाषण

ऐकतांच सीता दुःखभरानें भूमीवर पडली ! नेत्र अश्रूंनीं भरून येऊन ती म्हणाली, "हे लक्ष्मणा, माझा देह विधात्यानें दुःखासाठींच निर्माण केला आहे ! म्हणून आज दुःखाची साक्षात् मूर्ति माझ्यापुढें उभी राहिली आहे ! मी शुद्धाचरणी असूनहि राजानें माझा त्याग केला, तेव्हां माझ्या हातून पूर्वी कोणतें पातक घडलें असेल बरें ? हे लक्ष्मणा, भरतार्थाच्या राजसंतानाचा नाश होऊं नये, म्हणूनच मला आज गंगेच्या उदकांत प्राणत्याग करतां येत नाहीं ! त्या राजाला असें सांग कीं, 'अपकीर्तीला भिऊन तूं माझा त्याग केलास ! तुझ्या लोकांमधील निंदेचा परिहार मला करणें अवश्यच आहे !" सीतेचें हें भाषण ऐकून लक्ष्मण उच्च स्वरानें रडूं लागला आणि तिला नमस्कार करून नावेवर बसून गंगेच्या ऐलतीरास परत आला ! तो जातांच सीता मुक्तकंठानें विलाप करूं लागली !

वाल्मीकिमुनींच्या शिष्यांनीं सीतेला रडतांना पाहिलें व ते लगेच त्यांच्याकडे जाऊन ती वार्ता त्यांना सांगूं लागले. त्याक्षणीं वाल्मीकिमुनि सीतेपाशीं येऊन म्हणाले, "हे सीते, तुझें शुद्धाचरण मी जाणतों; कारण त्रैलोक्यांत घडणारें सर्व कांहीं अंतर्ज्ञानानें मला ठाऊक होतें ! तूं निश्चिंत माझ्याजवळ रहा व हें आपलें माहेरच समज !" वाल्मीकींचें हें भाषण ऐकून सीतेनें त्यांना वंदन केलें व "ठीक आहे !" असें म्हणून ती त्यांच्या मागें गेली.

सीतेची ही गति पाहून दुःखी झालेला लक्ष्मण रथांतून जातांना सुमंत्रास म्हणाला, "शुद्धाचरणी पत्नीच्या त्यागाहून दुसरी कोणती गोष्ट रामास अधिक दुःखप्रद होणार आहे ? दैवाचें अतिक्रमण करतां येत नाहीं, हेंच खरें !" यावर सुमंत्र म्हणाला, "हे लक्ष्मणा, राम सीतेचा, तुझा व भरत-शत्रुघ्नांचा त्याग करील आणि त्याच्या वांट्यास नेहमीं दुःखच येईल, हें भाकित ब्राम्हणांनीं यापूर्वीच तुझे वडील राजे दशरथ यांस कथन केलें होतें ! तो प्रकार असा. एकदां दुर्वास ऋषि वसिष्ठांच्या आश्रमांत पर्जन्यकालीं राहिले असतां दशरथ महाराज वसिष्ठांना भेटण्यासाठीं तेथें गेले. वार्तालाप होत असतांना दशरथांनीं दुर्वासांना आपल्या वंशाचें भाकित विचारलें. तेव्हां दुर्वास म्हणाले 'हे राजा, ऐक. पूर्वी देवासुरांच्या युद्धांत देव असुरांची निंदा करूं लागले असतां असुर भृगु-पत्नीच्या आश्रयास गेले व तिनेंहि त्यांना अभय दिलें. हें कळल्यावर विष्णूनें रागावून भृगु-पत्नीचें शिर चक्रानें उडविलें ! तेव्हां

भृगूनीं विष्णूस शाप दिला कीं, ' तूं मनुष्य जन्म घेशील व तुला अनेक संवत्सरें पत्नी-विरह होईल ! ' हे दशरथा, तो विष्णु म्हणजेच तुझा पुत्र राम होय !' याप्रमाणें सांगून दुर्वासांनीं राम हा सीता-वगैरेचा कसा त्याग करील, हें सर्व भविष्य दशरथांना कथन केलें ! हे लक्ष्मणा, माझ्या समक्ष सांगितलेलें हें गुप्त भाकित तूं कोणास सांगूं नकोस आणि सीतेसाठीं शोक करणें सोडून दे ! " असें बोलत असतां लक्ष्मणाचा रथ केशिनी नदीच्या तीरावर आला. तेथें रात्र काढून लक्ष्मण अयोध्येस येऊन पोंचला.

## ११. नृग, निमि व ययाति यांची कथा

सिंहासनावर बसलेल्या रामास अवलोकन करून लक्ष्मणाचे डोळे भरून आले व त्यानें झालेला सर्व प्रकार त्यास निवेदन केला. नंतर लक्ष्मण म्हणाला, " हे राजा, तूं शोक करूं नकोस ! कालाची गति अशीच आहे ! तूं शोक करीत राहिल्यास ज्या लोकापवदासाठीं तू सीता-त्याग केला, तो कायमच राहील ! " हें भाषण ऐकून राम म्हणाला, " हे लक्ष्मणा, तुझें म्हणणें यथार्थ आहे ! चार दिवसांपासून मी नागरिक जनांचीं कार्यें करीत नाहीं ! जो राजा प्रजेचें काम नित्य नेमानें करीत नाहीं, तो घोर नरकांत पडतो ! यासंबंधांत नृग राजाची कथा ऐक. नृगानें एका ब्राह्मणास दान दिलेल्या गायींत चुकून दुसऱ्या ब्राह्मणाची गाय दिली गेली. त्या दुसऱ्या ब्राह्मणास आपल्या गाईचा पत्ता लागल्यावर दोघांत तंटा माजला ! ते नृगाकडे गेले असतां नृगानें त्यांची गांठच घेतली नाहीं ! तेव्हां त्या ब्राह्मणांनीं त्याला सरड होऊन दीर्घकाल बिळांत राहण्याचा शाप दिला ! "

ही कथा सांगितल्यावर राम पुढें म्हणाला, " हे लक्ष्मणा, आपल्या इक्ष्वाकु कुळांतील निमि राजाची अशीच हकीकत आहे : इक्ष्वाकूचा मुलगा निमि राजा यानें वैजयंत नगर बसवून यज्ञ करण्याचें ठरविलें व वसिष्ठांस ऋत्विज् होण्यास विनविलें. वसिष्ठांना इंद्राचा यज्ञ करण्याचें आधींचेंच निमंत्रण असल्यानें त्यांनीं निमीला थांबण्यास सांगितलें. पण निमीनें गौतम ऋषींकडून यज्ञ करविला ! याचा राग येऊन वसिष्ठ निमीस भेटण्यास आले असतां तो निद्रामग्न असल्यानें तात्काळ भेट झाली नाहीं ! तेव्हां रागावून वसिष्ठांनीं निमीला अचेतन होऊन पडण्याचा शाप दिला ! पुढें जाग आल्यावर निमीनेंहि वसिष्ठास तसाच शाप दिला ! "

हें ऐकून लक्ष्मण म्हणाला, " हे रामा, निमीनें वसिष्ठांना शाप दिला, हें चांगलें केलें नाहीं ! " तेव्हां राम म्हणाला " हे वीरा, सर्वच पुरुषांच्या ठायीं क्षमा आढळत नाहीं ! ययाति राजासारखा क्षमाशील पुरुष एखादाच. ययातीच्या शर्मिष्ठा व देवयानी या दोन बायकांपैकीं शर्मिष्ठा व तिचा पुत्र पुरु यांच्यावर त्याचें जितकें प्रेम होतें, तितकें देवयानी व तिचा पुत्र यदु यांच्यावर नव्हतें ! यामुळें देवयानीचा पिता उशना ऋषि यानें ययातीस जरा येण्याचा शाप दिला ! आपली जरा घेण्यास ययातीनें यदूस सांगितलें असतां त्यानें तें मान्य केलें नाहीं ! पुरूनें मात्र बापाची जरा घेतली ! पुरूस त्याचें तारुण्य परत देऊन ययातीनें आपली जरा परत घेतली आणि पुरूस राज्यपद दिलें ! अशा प्रकारें ययातीनें ब्रह्मशाप शांतपणें सहन केला ! " रामानें ही कथा सांगितली असतां रात्र संपत येऊन आकाशांतील तारे विरल झाले आणि पूर्व दिशा आरक्तवर्ण दिसूं लागली. पुष्परसानें रंगविलेलें वस्त्र पूर्व दिशा नेसली आहे कीं काय, असें तेव्हां वाटूं लागलें !

## १३. लवणासुराचा वध

पहांट झाल्यावर रामानें आपलें आन्हिक संपविलें, तोंच च्यवन प्रभृति द्विज रामाला भेटण्यास आले. त्यांचें यथाविधि पूजन करून रामानें विचारलें, " आपली काय आज्ञा आहे, ती सांगा ! माझें जीवित ब्राह्मणांसाठींच आहे ! " हें ऐकून ते ऋषि संतुष्ट झाले. त्यांच्यांतील च्यवन ऋषि म्हणाले, " कृतयुगांतील लोलेचा पुत्र मधुदैत्य यानें शंकराकडून त्याच्या शूलापासून बनविलेला महाशक्तिमान् शूल मिळविला होता. मधुदैत्याच्या मागें तो शूल त्याचा पुत्र लवण याला प्राप्त झाला. शूलाच्या प्रभावानें लवणानें ऋषि-ब्राह्मणांना ' त्राहि भगवान् ! ' करून सोडलें आहे ! तरी हे राजा, लवणापासून आम्हांस अभय दे ! " हें ऐकून रामानें विचारल्यावरून शत्रुघ्न लवणासुरावर चालून जाण्यास सिद्ध झाला. तेव्हां राम म्हणाला, " हे शत्रुघ्ना, त्या असुरास मारून मधुपुरीचा तूंच राजा हो. " असें सांगून शत्रुघ्न ' नको ' म्हणत असतांहि रामानें त्यास तेथेंच मधुपुरीचा राज्याभिषेक केला ! मग मोठें सैन्य पुढें पाठवून शत्रुघ्न अयोध्येहून एका महिन्यानें एकटाच निघाला.

शत्रुघ्नानें दोन मुक्कामानंतर वाल्मीकींच्या आश्रमांत मुक्काम केला. वाल्मीकि

म्हणाले, " हे शत्रुघ्ना, हा आश्रम रघुकुलांतील पुरुषांचाच समज ! " नंतर शत्रुघ्नाला आश्रमाच्या पूर्वेस यज्ञविभूति दिसली, ती कोणाची, म्हणून त्यानें वाल्मीकींना प्रश्न केला. तेव्हां मुनि म्हणाले, " तुमचाच एक पूर्वज सौदास राजा होऊन गेला. त्याचे पाय काळे पडले होते, म्हणून त्याला ' कल्माष पाद ' हें नांव प्राप्त झालें होतें. त्या राजानें या आश्रमाजवळ यज्ञ केला होता, ती ही यज्ञ-विभूति होय. "

ज्या रात्रीं शत्रुघ्न त्या पर्णशालेंत मुक्कामास होता, त्याच रात्रीं सीतेला जुळे मुलगे झाले. ही शुभ वार्ता मुनिकुमारांनीं वाल्मीकींना सांगतांच ते आनंदानें त्या राजपुत्रांजवळ गेले. भुतें व राक्षस यांपासून त्यांचें निवारण होण्यासाठीं वाल्मीकींनीं दर्भांच्या कुशाची, म्हणजे शेंड्याची, व लवाची, म्हणजे बुडख्याची, एक एक मूठ घेऊन ते अभिमंत्रित केलेले दर्भ त्या नवजात बालकांच्या अंगावरून फिरविण्यास सांगितलें. जुळ्यांपैकीं आधीं जन्मलेल्या मुलाच्या अंगावरून कुशमुष्टि फिरविल्यानें त्याचें नांव ' कुश ' ठेवण्यांत आलें आणि नंतर जन्मलेल्या मुलाच्या अंगावरून लवमुष्टि फिरविल्यानें त्याचें नांव ' लव ' ठेवण्यांत आलें. त्या कुमारांचें गोत्र व नांवें उच्चारलीं जात असतां रामनामाचा उच्चार झाला. ही शुभ वार्ता मध्यरात्रीं शत्रुघ्नानें ऐकल्यावर " हे माते, फारच चांगली गोष्ट झाली ! " असें तो म्हणाला. पहांटे तो तेथून पश्चिमकडे निघाला.

जातांना च्यवनऋषींच्या आश्रमांत शत्रुघ्नानें मुक्काम केला असतां इक्ष्वाकु कुळांतील मांधाता राजाला लवणासुरानें शूलानें मारल्याचा जुना इतिहास शत्रुघ्नाला त्या ऋषींकडून समजला. च्यवन म्हणाले, " हे शत्रुघ्ना, उद्यांक सकाळीं लवणानें शूल हातांत घेण्यापूर्वीं तूं त्याचा वध करशील व विजयी होशील ! " दुसऱ्या दिवशीं शत्रुघ्न धनुष्य घेऊन मधुपुराच्या वेशीवर जाऊन ठेपला. लवण भक्ष्य आणण्यासाठीं बाहेर गेला होता, तो मध्यान्हीं परत आला. त्या उभयतांचें घोर द्वंद्वयुद्ध झालें ! शत्रुघ्नानें रामाकडून मिळालेला दिव्य बाण काढून लवणावर सोडला. त्यायोगें त्याचें वक्षःस्थल विदारण होऊन तो जमिनीवर पडला ! लवण मरतांच त्याचा दिव्य शूल रुद्राकडे निघून गेला ! शत्रुघ्नाचा हा विजय पाहून देवांनीं त्याची फार प्रशंसा केली. नंतर शत्रुघ्नानें मधुदैत्याची मधुपुरी पुनः

वसविली व त्या प्रदेशावर राज्य करून तो समृद्ध केला.

याप्रमाणें बारा वर्षे वास केल्यानंतर रामाला भेटण्यासाठीं शत्रुघ्न अयोध्येला जाण्यास निघाला. मार्गांत वाल्मीकि मुनींच्या आश्रमांत त्यानें वास्तव्य केलें. वाल्मीकींनीं शत्रुघ्नाच्या पराक्रमाबद्दल त्याच्या मस्तकाचें अवघ्राण करून त्याचा यथोचित आदर केला. तेथें असतां शत्रुघ्नाच्या श्रवणांत रामचरित्र आलें. वीणेच्या सुरावर मंद्र, मध्य व तार स्वरांमध्यें संस्कृतांत गाइलेलें तें तालबद्ध रामचरित्र ऐकून शत्रुघ्नाचे नेत्र भरून आले व क्षणभर त्याचें भान नाहींसें झालें! शत्रुघ्नाचे अनुयायी देखील हें गायन ऐकून मुग्ध झाले! त्या गायनाबद्दल वाल्मीकींना कांहीं विचारणें अयोग्य, म्हणून त्याबद्दल त्यांच्याशीं कांहीं न बोलतां शत्रुघ्न शयनस्थानाकडे गेला. परंतु त्याला रात्रभर झोंप आली नाहीं! दुसऱ्या दिवशीं पहाटे तो अयोध्येकडे निघाला. राम प्रभृतींची भेट झाल्यानंतर सात दिवसांनीं तो पुनः आपल्या राज्यास परत गेला.

## १४. शंबूक वध

राम राज्य करीत असतां एक वृद्ध ब्राह्मण आपल्या मृत पुत्रास घेऊन रामाच्या प्रासादापुढें आला व शोक करूं लागला. " हे राजा, माझ्या मुलास अकाल मृत्यु आला, त्याअर्थी तुझ्या राज्यांत कांहींतरी दुष्कृत्य घडलें असलें पाहिजे! माझ्या मुलास जीवंत कर, नाहींतर मी बायकोसह येथें प्राण देतों! ती ब्रह्महत्या तुला लागेल! " ब्राह्मणाचा हा शोक ऐकून रामास वाईट वाटलें व त्यानें वसिष्ठादिकांना सल्ला विचारला. वसिष्ठाबरोबर आलेले नारदमुनि म्हणाले, " हे रामा, मागील कृतयुग व त्रेतायुग यांत आणि सध्यांच्या द्वापर युगांत शूद्रांना तपश्चर्या करण्याचा मुळींच अधिकार नाहीं! असें असतांहि तुझ्या राज्यांत एक दुर्बुद्धि शूद्र सध्यां तप करीत आहे व त्याच पातकानें हा ब्राह्मणपुत्र अकाल निधन पावला आहे! त्या दुष्कृत्याचें तूं निवारण कर, म्हणजे हा बालक जीवंत होईल! " हें ऐकल्यावर रामाच्या आज्ञेनें मृत ब्राह्मणपुत्राचें शव तैलपात्रांत ठेवण्यांत आलें आणि पुष्पक विमानाचें स्मरण करून तें येतांच त्यांत बसून राम अयोध्येहून निघाला. सर्व दिशा शोधल्यावर राम दक्षिण दिशेस गेला असतां शैवल पर्वताच्या उत्तरेस एका सरोवराच्या कांठीं अधोमुख होऊन लोंबकळत

असलेला एक तपस्वी रामास आढळला. राम त्याला म्हणाला, " तूं कोण आहेस ? आणि, कोणत्या हेतूनें हें तप करीत आहेस ? " तो तपस्वी लोंबकळलेल्या स्थितींतच रामास म्हणाला, " मी शूद्र असून शरीरासह देवत्व प्राप्त होण्यासाठीं हें तप करीत आहें ! माझें नांव शंबूक आहे ! " हें ऐकतांच रामानें तरवारीनें शंबुकाचें मस्तक उडविलें ! तेव्हां इंद्रादि देवांनीं रामावर पुष्पवृष्टि केली ! इकडे मृत ब्राह्मणपुत्र आपोआप जीवंत झाला !

अयोध्येस परत येतांना राम अगस्त्यऋषींच्या आश्रमांत राहिला. अगस्त्यांनीं रामाचा उत्तम सत्कार केला आणि त्यांनीं एक दिव्य आभरण रामास भेट म्हणून दिलें. वैदर्भ देशाचा राजा सुदेव याचा श्वेत नामक पुत्र बापाच्या मागून गादीवर बसला. दीर्घकाल राज्य केल्यावर तो तप करण्यास निघून गेला. तपानें ब्रह्मलोक प्राप्त करूनहि त्याची भूक नष्ट झाली नाहीं, म्हणून ब्रह्मदेवानें त्याला " तूं पृथ्वीवरील आपलेंच शव खात राहशील ! " असा शाप दिला ! पुढें अगस्त्य मुनींच्या दर्शनानें तो या शापांतून मुक्त झाला. म्हणून त्यानें हें आभरण अगस्त्यांस दिलें होतें. रामाला हा पूर्ववृत्तांत मुनींकडून कळल्यावर तो म्हणाला, " भगवन्, वैदर्भ राजा तप करीत असलेलें हें वन निर्जन कसें झालें, हें आपण मला सांगा. " यावर अगस्त्य म्हणाले, " मनुपुत्र इक्ष्वाकु याच्या शंभर मुलांतील सर्वांत धाकटा दंड हा मूढ व विद्याहीन होता. म्हणून त्याला त्याच्या पित्यानें विंध्य व शैवल पर्वतांच्या मधला प्रदेश राज्य करण्यासाठीं दिला. उशना ऋषि त्याचा पुरोहित होता. एकदां ऋषिकन्या अरजा हिला पाहून दंड मोहित झाला व त्यानें तिच्यावर बलात्कार केला. तेव्हां उशनाऋषींनीं संतप्त होऊन शाप दिला कीं, ' दुर्बुद्धि दंडराजाचा सात दिवसांत परिवारासह नाश होईल, आणि त्याचा प्रदेश धूलिवृष्टीनें पशुपक्षी रहित होईल ! ' ऋषींशापाप्रमाणें दंड नाश पावून त्याचा प्रदेश निर्जन झाला ! तेव्हांपासून त्याला ' दंडकारण्य ' नांव पडलें. तेथें तपस्वी राहूं लागल्यानें पुढें तें ' जनस्थान ' म्हणून प्रसिद्ध झालें. " यानंतर राम अयोध्येस परत गेला.

## १५. रामाचा अश्वमेध यज्ञ

अयोध्येस आल्यावर रामानें राजसूय यज्ञ करण्याचा विचार आपल्या भ्रात्यांस

सांगितला. पण राजसूय यज्ञांत पृथ्वीवरील राजवंशाचा नाश होतो, असें भरतानें सांगितल्यामुळें लक्ष्मणाच्या सूचनेवरून रामानें पापनिवृत्ति करणारा अश्वमेध यज्ञ करण्याचें ठरविलें. लक्ष्मण म्हणाला, " हे रामा, पूर्वी वृत्र नामक दैत्य राजा राज्य करीत असतां त्यानें आपल्या मधुरेश्वर मुलास गादी देऊन उग्र तप केलें. त्या तपानें इंद्र वगैरे देव घाबरले ! इंद्रानें वज्रानें वृत्रास मारलें व त्याची ब्रह्महत्या इंद्राच्या मागें लागून त्यास वेड लागलें ! तेव्हां विष्णूनें इंद्राकरवीं अश्वमेध यज्ञ करविला. त्यानें त्याच्या मागची ब्रह्महत्या सुटली ! " हें ऐकून राम हंसून म्हणाला, " हे लक्ष्मणा, अश्वमेधाच्या माहात्म्याबद्दल तूं म्हणतोस तें खरें आहे. पूर्वी कर्दम प्रजापतीचा मुलगा बाल्हीक देशाचा राजा इल मृगया करीत असतां शंकर–पार्वती क्रीडा करीत असलेल्या वनांत शिरला. तेथें जाणारे सर्व प्राणी स्त्रीरूप पावत होते, म्हणून इल राजाहि स्त्रीरूप पावला ! शेवटीं अश्वमेध यज्ञ केल्यानें त्यास पुरुषत्व प्राप्त झालें ! "

याप्रमाणें अश्वमेध यज्ञ करण्याचें ठरल्यावर सुग्रीव, बिभीषण व इतर थोर थोर राजे यांना पाचारण करण्यांत आलें. नैमिषारण्यांत गोमती नदीच्या कांठीं यज्ञभूमि तयार झाली. भव्य यज्ञमंडप उभारला गेला. कृष्णवर्ण अश्व लक्ष्मणाच्या संरक्षणाखालीं संचारार्थ सुटला. यज्ञाचें अनुष्ठान चालू असतां रामानें अतोनात दानधर्म केला. अशा या अद्भुत यज्ञाची हकीकत ऐकल्यावर वाल्मीकि मुनि घाइघाईनें यज्ञस्थानीं आले. एका बाजूला एकांतांत त्यांच्या शिष्यांनीं झोंपड्या उभारल्या. मग वाल्मीकि कुश व लव यांना म्हणाले, " द्विज व ऋषि यांचीं वसतिस्थानें, राजमार्ग, उपमार्ग, राजांचीं गृहें वगैरे ठिकाणीं तुम्हीं ' रामायण ' काव्याचें पठण करा ! रामानें बोलावल्यास तुम्ही दोघे एकमेळानें गा ! त्यानें ' तुम्ही कोणाचे मुलगे ? ' असें विचारल्यास ' आम्ही वाल्मीकींचे शिष्य आहोंत ! ' असें सांगा ! धनाचा लोभ दाखवूं नका ! " यावर " आज्ञा प्रमाण ! " असें म्हणून ते सीतापुत्र बाहेर पडले. त्यांनीं ठिकठिकाणीं रामायण–काव्य गाऊन दाखविलें. त्यांची कीर्ति रामाच्या कानीं गेली असतां यज्ञविषयक कृत्य आटो-पल्यावर मिळालेल्या फुरसदींत राजे, महर्षि, द्विजश्रेष्ठ, संगीतशास्त्रवेत्ते, छंदशास्त्र-वेत्ते, व्यवहारज्ञ, तार्किक आणि विशेषतः पौरजन यांना त्यानें बोलावून आणलें.

कुश व लव यांनीं सुरवात केली असतां सर्वजण आनंदित होऊन आपल्या नेत्रांनीं त्या कुमारांना प्राशनच करीत आहेत कीं काय, अशा उत्कंठेनें पाहूं लागले ! सर्व श्रोते आपापसांत बोलूं लागले, " बिंब-प्रतिबिंबासारखे दिसणारे हे कुमार जटा-वल्कलें काढल्यास थेट रामासारखे दिसतील ! " राम सुवर्ण मुद्रा देत असतां त्या कुमारांनीं त्या नाकारल्या. विस्मित होऊन राम त्यांना म्हणाला, " हें काव्य कोणी लिहिलें ? त्याचा कर्ता सांप्रत कोठें आहे ? " यावर ते कुमार म्हणाले, " भगवान् वाल्मीकींनीं हें काव्य रचिलें असून ते यज्ञभूमिमध्यें आले आहेत. "

## १६ सीतेचा भूमिमध्यें प्रवेश

ते गायक आपलेच पुत्र आहेत, हें जाणून रामानें दूतांकरवीं वाल्मीकींना निरोप पाठविला कीं, " सीता निर्दोष असेल, तर तिनें येथें येऊन आपल्या शुद्धतेची शपथ घ्यावी ! " हा निरोप समजल्यावर वाल्मीकींनीं रामास कळविलें कीं, " सीता त्याप्रमाणें करील ! " नंतर दुसऱ्या दिवशीं ब्रह्मदेवादि देव, मोठमोठे तपस्वी, राजे, वानर, राक्षस, प्रजाजन वगैरे सीतेचा शपथविधि अवलोकन करण्यासाठीं जमले. वाल्मीकिमुनि सीतेसह सभास्थानीं आले. ब्रह्मदेवांच्या मागोमाग जाणाऱ्या श्रुतीप्रमाणें वाल्मीकींच्या मागून जाणाऱ्या सीतेला पाहून लोक " साधु ! साधु ! " म्हणूं लागले ! नंतर वाल्मीकि रामाला म्हणाले, " हे दाशरथे, लोकापवादानें माझ्या आश्रमाजवळ जिचा तूं त्याग केलास, ती ही महासती सीता ! तिला झालेले जुळे मुलगे तुझेच आहेत, हें मी तुला सत्य सांगतों ! मी प्रचेतसाचा दहावा पुत्र असून असत्य भाषण कधीं केल्याचें मला स्मरत नाहीं ! सीता दोषी असेल, तर माझी दीर्घ तपश्चर्या सफल होणार नाहीं ! " यावर हात जोडून राम म्हणाला, " हे धर्मज्ञ मुने, आपलें म्हणणें यथार्थ आहे ! केवळ लोकापवादामुळेंच मीं हिचा त्याग केला ! हिचे पुत्र कुश-लव माझे आहेत, हेंहि मी जाणतों ! " नंतर काषायवस्त्र परिधान केलेल्या सीतेनें हात जोडले आणि डोळे व मान खालीं घालून ती म्हणाली, " रामावांचून अन्य पुरुष मीं मनांतहि आणला नसेल, तर ही विष्णुपत्नी भूदेवी मला विवर देईल ! " सीतेनें अशी त्रिवार शपथ घेतांच भूमींतून नागांनीं मस्तकावर धारण केलेलें दिव्य सिंहासन वर आलें. त्यावर साक्षात् भूदेवी बसली होती. तिनें सीतेला

उचलून घेऊन सिंहासनावर बसविलें आणि पाहतां पाहतां त्या दोघींसह तें सिंहासन पाताळलोकास गेलें ! सर्व सभा आश्चर्यचकित झाली ! " धन्य ! धन्य ! " असे उद्गार निघूं लागले ! सीता रसातळास गेल्याचें पाहून दंडावर रेलून रामानें मान खालीं घातली व तो अश्रु गाळूं लागला ! तो म्हणाला, " हे भूदेवी, तूं माझी सीता परत दे ! नाहींतर, मी सर्व भूमीचा नाश करून टाकीन ! " तेव्हां ब्रह्मदेवांनीं रामाचें सांत्वन केलें आणि सर्व देव स्वर्गलोकीं निघून गेले. मग कुश-लवांचा अंगीकार करून त्यांच्यासह राम वाल्मीकींच्या पर्णकुटिकेस गेला व ती रात्र त्यानें शोकांत घालविली !

यानंतरचा आपला काळ रामानें राजधर्म पाळण्यांत व मोठ मोठे यज्ञ करण्यांत घालविला. त्यानें सीतेशिवाय अन्य भार्येचा स्वीकार केला नाहीं व प्रत्येक यज्ञाच्या वेळीं तो सुवर्णाची सीता करीत असे. रामराज्य चालू असतांना जिकडे तिकडे समृद्धि होती आणि प्रजा सुखांत नांदत होती ! पुष्कळ काळानंतर कौसल्या, सुमित्रा व कैकेयी या राजमाता स्वर्गलोकास गेल्या. त्या निमित्त रामानें तपस्वी ब्राह्मणांना मोठमोठीं दानें दिलीं.

## १७. भरत व लक्ष्मण यांच्या पुत्रांस राज्यप्राप्ति

कालांतरानें भरताचा मामा युधाजित् यानें गार्ग्यऋषींच्या बरोबर रामास बहुमोल नजराणा पाठविला आणि कळविलें कीं, " सिंधु नदीच्या दोन्ही बाजूंस समृद्ध गंधर्वप्रदेश आहे ! तो जिंकून त्यांत तूं आपलीं दोन नगरें निर्माण कर ! " यावर संतुष्ट होऊन रामानें भरताला त्याचे पुत्र तक्ष व पुष्कल यांसह गंधर्वप्रदेशावर पाठविलें. भरत व युधाजित् यांच्या संयुक्त सैन्यानें गंधर्वांचा पराभव केला आणि तेथें तक्षशिला नगरीवर तक्षाची आणि पुष्कलावत नगरीवर पुष्कलाची स्थापना केली. तेथील व्यवस्थेसाठीं पांच वर्षें राहून भरत अयोध्येस परत आला. यानंतर रामानें कारुपथ नांवाच्या देशांत लक्ष्मणाचा एक मुलगा अंगद याच्यासाठीं अंगदीया नगरी व दुसरा मुलगा चंद्रकेतु याच्यासाठीं चंद्रकांता नगरी वसविली, आणि तो देश त्या दोघांच्या ताब्यांत दिला. त्या दोघांपाशीं अनुक्रमें लक्ष्मण व भरत एकेक वर्ष राहून आणि तेथील बंदोबस्त करून अयोध्येस परत आले.

## १८. रामाची कालाशीं भेट

यानंतर प्रत्यक्ष काल तापसरूपानें रामाच्या भेटीस आला. त्याचें अर्घ्यपूर्वक कुशल विचारून राम त्यास म्हणाला, " आपण ज्यांच्याकडून आलांत, त्यांचा निरोप मला सांगा ! " काल म्हणाला, " तुला सांगावयाचा निरोप एकांतांत निवेदन करावयाचा आहे ! जो कोणी आपलें भाषण ऐकील, अगर आपल्याकडे पाहील, त्याचा तूं तात्काल वध करावा ! " " ठीक आहे ! " असें म्हणून रामानें लक्ष्मणास द्वारावर उभें राहण्यास व कोणासहि आंत न सोडण्यास सांगितलें. मग काल रामास म्हणाला, " हे राजा, ब्रह्मदेवांचा तुला असा निरोप आहे: ' मनुष्य जन्माची तुझी आयुर्मर्यादा संपली असून देवलोकीं येण्याचा समय प्राप्त झाला आहे ! ' " तेव्हां राम हंसत म्हणाला, " ठीक आहे; मी जेथून आलों, तेथें जाण्यास आतां सिद्ध आहें ! " दोघांचा असा संवाद चालला असतां दुर्वास मुनि तेथें आले व रामास ताबडतोब भेटावयाचें आहे, असें सांगूं लागले ! त्यांच्या शापाच्या भीतीनें लक्ष्मणानें पुढील परिणाम लक्ष्यांत घेऊनहि दुर्वास आल्याचें रामास जाऊन सांगितलें ! रामानें कालास निरोप देऊन " काय आज्ञा आहे ? " असें दुर्वासांस हात जोडून विचारलें. दुर्वास म्हणाले, " मी हजार वर्षें अनशन केलें ! त्याचें आज पारणें असल्यानें भोजनाची इच्छा आहे ! " तेव्हां रामानें त्यांस उत्कृष्ट भोजन देऊन संतुष्ट केलें. दुर्वास गेल्यावर कालाला दिलेल्या वचनाचें स्मरण होऊन रामास अत्यंत दुःख झालें ! पण त्याला लक्ष्मण म्हणाला, " हे रामा, माझा वध करून तूं आपली प्रतिज्ञा पाळ ! " मग पुरोहित व मंत्री यांना बोलावून रामानें त्यांच्याशीं विचार केला. नंतर तो लक्ष्मणास म्हणाला, " हे लक्ष्मणा, धर्महानि न होण्यासाठीं मी तुझा त्याग करतों ! कारण साधु त्याग व वध समानच मानतात ! " हें ऐकून लक्ष्मणाचे डोळे अश्रूंनीं भरले व तो स्वगृहीं न जातां परस्पर सरयूच्या तीरीं गेला ! तेथें स्नान करून त्यानें श्वासनिरोध केला आणि अखेर त्यास देहासह इंद्र स्वर्गलोकीं घेऊन गेला !

## १९. महाप्रयाण

लक्ष्मण सोडून गेल्यानें जीवित व्यर्थ वाटूं लागलें ! त्यानें भरतास राज्याभिषेक करून वनास जाण्याचा विचार केला. पण भरतानें राज्य नको असल्याचें

रामास निक्षून सांगितलें ! म्हणून त्यानें कोसल देश कुशाला व उत्तर कोसल लवाला देण्याचें ठरवून त्यांना राज्याभिषेक केला. उभय पुत्रांस अंकावर घेऊन त्यानें त्यांस विपुल धन दिलें आणि त्यांना त्यांच्या नगरांकडे पाठविलें. विंध्य पर्वताजवळ कुशावती नगरी कुशासाठीं आणि श्रावस्ती लवासाठीं निर्माण करण्यांत आली. अयोध्या जनरहित करून राम व भरत यांनीं स्वर्ग-गमन करण्याचें ठर-विलें ! लगेच शत्रुघ्नास तातडीनें पाचारण केलें. दूतांकडून सर्व हकीकत शत्रुघ्नास समजली आणि भयंकर कुलक्षय होणार असल्याचें जाणून शत्रुघ्नानें रामाकडे जाण्याची तयारी केली ! त्यानें आपला पुत्र सुबाहु यास मथुरानगरी व दुसरा पुत्र शत्रुघाती यास वैदिश नगरी देऊन त्यांना राज्याभिषेक केला. इतकें करून फक्त एक रथ घेऊन शत्रुघ्न अयोध्येस आला. महात्मा राम उज्ज्वल व तलम रेशमी वस्त्र नेसलेला त्यानें पाहिला. हात जोडून तो रामास म्हणाला, " हे वीरा, तुझ्या बरोबर येण्याचा मीं निश्चय केला आहे ! तेव्हां मला अन्य कांहीं आज्ञा करूं नकोस ! " त्याचा निश्चय पाहून राम " ठीक आहे ! " असें म्हणाला. रामाच्या स्वर्ग-गमनाची बातमी कळून सुग्रीव व बिभीषण आपापल्या परिवारांसह अयोध्येस आले. सुग्रीव म्हणाला, " हे रामा, अंगदास अभिषेक करून मीं तुझ्या बरोबर येण्याचें ठरविलें आहे ! " " ठीक आहे ! " असें सुग्रीवास हंसत म्हणून राम बिभीषणास म्हणाला, " जोंपर्यंत पृथ्वीवर प्रजा आहे, तोंपर्यंत तूं लंकेंत देह धारण करून रहा ! " बिभीषणानें " जशी तुझी आज्ञा ! " असें म्हणून रामाचें म्हणणें मान्य केलें. मग राम हनुमानास म्हणाला, " जीवंत राहण्याचा तुझा निश्चय असल्यानें जोंपर्यंत जगांत माझी कथा प्रचलित राहील, तोंपर्यंत तूं आनंदानें पृथ्वीवर रहा ! " हनुमानानेंहि ही आज्ञा मान्य केली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं रामाचा अग्निहोत्राचा प्रदीप्त अग्नि व वाजपेय यज्ञाचें छत्र ब्राह्मण घेऊन रस्त्यानें चालूं लागले. सूक्ष्म वस्त्र नेसलेला राम परब्रह्मचिंतन करीत सरयू नदीकडे निघाला. त्याच्या उजवीकडे पद्महस्ता लक्ष्मी, डावीकडे भूदेवी व समोर संहारशक्ति चालली होती. नानाप्रकारचे बाण, धनुष्य व आयुधें हीं मनुष्यदेह धारण करून चाललीं होतीं. ब्राह्मणरूपानें वेद, सर्वांचें रक्षण करणारी गायत्री, ओंकार व वषट्कार हेहि त्याच्याबरोबर होते. सर्व

स्त्रिया, पुरुष, वानर, राक्षस वगैरे रामाच्या मागून चालले होते. अयोध्येंत श्वासोच्छ्वास घेणारा एकहि प्राणी उरला नाहीं ! सहा कोस गेल्यावर पश्चिमाभिमुख सरयूच्या तीरीं राम दाखल झाला. भोंवरे असलेल्या त्या नदीच्या तीरानें सर्वत्र संचार करीत स्वर्गाला नेऊन पोंचविणाऱ्या ठिकाणापाशीं सर्व प्रजेसह राम आला. ब्रह्मदेव सर्व देवांबरोबर त्या ठिकाणीं प्राप्त झाले. आकाशांतून पुष्पवृष्टि होऊं लागली ! अशा वेळीं राम पायींच सरयूमध्यें उतरूं लागला असतां ब्रह्मदेव म्हणाले, " हे विष्णुरूप रामा, तूं विष्णुरूपांत मिळून जा, किंवा आकाशलोकांत मिळून जा ! तुला हव्या त्या रूपांत तूं मिळून जाऊं शकतोस ! " हें ऐकून रामानें आपण स्वतः व आपले बंधु यांसह विष्णुरूपांत मिळून जाण्याचा विचार करून त्यांतच प्रवेश केला ! नंतर महातेजस्वी विष्णु ब्रह्मदेवांस म्हणाला, " माझ्याबरोबर आलेल्या सर्व लोकांना तूं योग्य स्थान दे ! " हें ऐकून ब्रह्मदेव म्हणाला, " येथें आलेल्या सर्वांना ' संतानक ' लोक प्राप्त होईल ! " तदनुसार सरयूच्या उदकांत शिरलेले जीव संतानक लोकाप्रत गमन करते झाले ! मग ब्रह्मदेव देवांसह स्वर्गलोकीं निघून गेले.

## २०. उपसंहार

उत्तरकांडासह हें आख्यान येथें संपलें. तें ब्रह्मदेवांसहि मान्य झालेलें आहे. ' रामायण ' या अभिधानानें हें आख्यान लोकांत ख्याति पावलें असून तें वाल्मीकिमुनींनीं रचिलेलें आहे. रामानें स्वर्गलोकाप्रत गमन केल्यापासून हें रामायण काव्य त्या लोकांत देव, गंधर्व वगैरे ऐकत असतात. आयुष्याची वृद्धि करणारें आणि वैभव देणारें, पापाचें निरसन करणारें आणि वेदतुल्य असलेलें हें आख्यान श्राद्धाच्या वेळीं ऐकावें. यांतील एक श्लोक जरी पठण केला, तरी महापातक्याचेंहि पाप नाहींसें होईल ! गायी सोडण्याच्या वेळीं, दुपारीं किंवा सायंकाळीं हें काव्य वाचलें असतां वाचणारा नाश पावत नाहीं ! अयोध्या नगरी आजपासून अनेक वर्षें पावेतों जनशून्य व्हावयाची आहे ! तथापि ऋषभ राजा ज्यावेळीं राज्य करील, त्यावेळीं अयोध्येमध्यें पुनः लोकांची वस्ती होऊं लागेल ! उत्तरकांडानें युक्त असें हें आख्यान प्रचेतसाचे पुत्र वाल्मीकिमुनि यांनीं ग्रथित केलें असून तें ब्रह्मदेवांसहि मान्य झालेलें आहे.

– उत्तर कांड संपूर्ण –

# सचित्र वाल्मीकि रामायण

## ( मराठी भाषानुवादासह )

( १ ) बालकांड, ( २ ) अयोध्याकांड ( पूर्वार्ध ), ( ३ ) अयोध्याकांड, ( उत्तरार्ध ), ( ४ ) सुंदरकांड, (५) अरण्यकांड, (६) किष्किंधाकांड, ( ७ ) युद्ध-कांड ( पूर्वार्ध ), ( ८ ) युद्धकांड ( उत्तरार्ध ) हे ८ भाग छापून तयार आहेत.

वाल्मीकि-रामायणाचीं ७ कांडें आहेत. या सात कांडांचीं दहा पुस्तकें पुढें दिल्याप्रमाणें प्रकाशित करण्यांत येतील—

( १ ) बालकांड, ( २ ) अयोध्याकांड २, ( ३ ) अरण्यकांड, ( ४ ) किष्किंधाकांड, ( ५ ) सुंदर-कांड, ( ६ ) युद्धकांड ३, ( ७ ) उत्तरकांड, मिळून १० पुस्तकें. हें मुद्रण सर्वांगसुंदर व अत्यंत आकर्षक असें केलें जाणार आहे.

प्रत्येक विभागाचें मूल्य ४ रु० असून, ट. ख. ॥= आहे. समग्र १० विभागांचें मूल्य ४० रु० व ट. ख. ६। रु० होईल. ग्राहकांनीं ४६। रु. पाठवावे.

व्यवस्थापक

स्वाध्याय-मण्डळ, आनंदाश्रम

किल्ला-पारडी, ( जि. सूरत )

# मंगलमूर्ति गणेश

लेखक— पं. श्री. दा. सातवळेकर

गणेशपुराणाच्या आधारानें लिहिलेलें अत्यंत स्फूर्तिदायक असें हें चरित्र प्रत्येक घरांतील प्रत्येक तरुणानें वाचून याचें मनन करावें व गणेशाला अग्रपूजेचा मान कां मिळाला तें जाणावें. स्वराज्यांतील तरुणांनीं हेंच जाणलें पाहिजे. **मूल्य २ रु. ट. ख. ।॥. म. आ. नें २॥ अडीच रु. पाठवा.**

# श्रीमद्भगवद्गीता

( पुरुषार्थ-बोधिनी-टीकेसह )

लेखक— **पं. श्रीपाद दामोदर सातवळेकर**

गीतालंकार, साहित्य-वाचस्पति

वेद, उपनिषदें इत्यादि प्राचीन आर्य-ग्रंथांतील सिद्धान्तच नवीन पद्धतीनें गीतेंत कशा प्रकारें मांडले आहेत, हें '**पुरुषार्थ-बोधिनी**' नांवाच्या गीतेवरील या टीकेंत विस्तृत उतारे देऊन दाखवलें आहे. अर्थात् वैदिक सिद्धांतांसह गीतासिद्धांतांचें विशदीकरण हेंच या **पुरुषार्थ-बोधिनी टीकेचें** वैशिष्ट्य आहे. याचा हिंदी अनुवाद हिंदी प्रांतांत व गुजराती अनुवाद गुजराती प्रांतांत विशेष मान्यता पावला असून अत्यंत लोकप्रिय झालेला आहे. पृष्ठ-संख्या ९४५, मूल्य १२॥ रु. व ट. ख. २॥ रु.

**मंत्री—स्वाध्याय मण्डळ, आनंदाश्रम,**

**किल्ला-पारडी ( जि. सूरत )**